काव्यसंग्रह. ४६.

अनेककविकृत

# भक्तिपरमार्थपर कविता.



हें पुस्तक

नारायण चिंतामण केळकर, बी. ए.,

यांनीं

अनेक हस्तलिखित प्रतींच्या आधारानें शुद्ध करून व विपुल टीपा देऊन तयार केलें.

तें

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें

१९०३.

# अर्पणपत्रिका.



हें पुस्तक

परमवैराग्यसंपन्न आणि मुमुक्षुजनमार्गदर्शी

**श्रीमत् ब्रह्मचैतन्यमहाराज गोंदवलेकर**

यांचे चरणीं अत्यंत नम्रतापूर्वक

**अर्पण केलें आहे.**

नारायण चिंतामण केळकर.

KÂVYASANGRAHA. 46.

# A COLLECTION OF DEVOTIONAL AND OTHER MARÂTHÎ POEMS

BY

VARIOUS MARÂTHÎ POETS.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

[illegible]

NÂRÂYAN CHINTÂ[illegible] A.

PRINTED AND [illegible]

TUKÂRÂM [illegible]JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJ[illegible] PRESS,

Bom[illegible]

1903.

# प्रस्तावना.

महाराष्ट्रकाव्योदधींतील भक्तिपर व परमार्थपर अशीं लहान लहान पण स्वतंत्र [illegible] रत्नें नवीन हुडकून काढून त्यांची माला आम्ही आज आमच्या प्रिय वाचकांस अर्पण करीत आहों.

या भागांत एकंदर पंचवीस कवींचीं लहान मोठीं प्रकरणें आलीं आहेत. या कवींपैकीं कांहीं वाचकांच्या माहितीचे आहेत. कांहीं वाचकांस अगदीं अपरिचित होते [illegible]ची माहिती त्यांच्या प्रकरणांच्या आरंभीं या पुस्तकांत दिली आहे. दोन नवीन कवीं[illegible]ची माहिती पूर्वीं न मिळाल्यामुळें येथें सादरण्यांत येत आहे.

दाजी कविः—या कवीची कविता सुमारें ५० हजार असून तींतील निवडक [illegible]णांचा एक स्वतंत्र भाग करावयाचा आमचा विचार होता. आणि म्हणूनच या [illegible] प्रथम प्रकरण जें 'मनाचे श्लोक' त्यावर 'दाजी कविकृत कवितासंग्रह' असा [illegible] दिला होता. परंतु पुढें कांहीं अडचणींमुळें आमचा पहिला विचार बदलावा [illegible] भक्ति व परमार्थ या विषयांवरील इतर अनेक कवींच्या लहान लहान प्रकर[illegible] मासले एकत्र करून हा भाग पुरा करण्याचें ठरलें.

या कवीचे वंशज रा० रा० गोविंद नारायण गोळे (सातारा) यांजकडून आ[illegible] अशी माहिती मिळते कीं या कवीचे मूळपुरुष रा० मोरो गोपाळ गोळे हे [illegible]राव पेशव्यांचे नातलग असून सन १७७६ सालीं वारले. त्यांचे चिरंजीव गंगा[illegible]त यांजकडे कल्याणप्रांताची मजमू असून हेही सन १७७९ त निवर्तले. त्यांचे [illegible] माधवराव हे पेशवे अल्पवयी असल्यामुळें त्यांचे सन्निध पुरंदरास असत. [illegible] ग्रंथावलोकनाचा नाद असून कवित्वाचीहि अभिरुचि असे. ह्यांनीं लिहिलेली [illegible], साक्या व रुक्मिणीस्वयंवरादि आख्यानें आहेत. ह्यांस इ० स० १७८० साली [illegible]राव ऊर्फ दाजीमहाराज गोळे हे झाले. ह्यांच्या मातुश्रीनें सहगमन केल्यावेळी [illegible] अवघे ४ वर्षांचे होते. मोठे झाल्यावर पेशवाईत यांनीं सरकारी कामें केलीं. [illegible]यकवाड, होळकर व निजाम ह्यांजकडून येणारा सालाबाद वसूल करण्याचें [illegible]म यांजकडे असे. यांजकडे ५०० स्वार, शिबंदी, हत्ती, घोडे, पालख्या इत्यादि [illegible]जंगी इतमामही असे. यशवंतराव होळकरानें पुणें शहर फस्त केलें तेव्हां दाजि[illegible]स आपली सर्व दौलत सोडून पुण्यापासून दूर जावें लागलें. दुसऱ्या बाजीरावाच्या [illegible]रकीर्दींत यांनीं मक्त्याच्या मामलती केल्या. सन १८०२ सालीं दाजिबावर श्रीमं[illegible]ची गैरमर्जी झाल्यामुळें व नंतर लवकरच पेशवाईचा शेवट झाल्यामुळें दाजिबा [illegible]पल्या बंधूसह. साताऱ्याजवळील मर्ढें नांवाच्या आपल्या इनामगांवीं खाजगी व्यापार [illegible]रे करून राहूं लागले. हे दरसाल पंढरीस जात असत. तुकाराम नामदेव जना[illegible]यांचे अभंग त्यांना मुखोद्गत असत आणि त्यामुळेंच त्यांना स्वतंत्र कविता कर[illegible]ण्याची स्फूर्ति झाली. यांच्या कवितेमध्यें अभंगच पुष्कळ आहेत. तरी पण श्लोक, आ-

यांनीं संन्यास घेतला, तेव्हांपासून त्यांना दाजीमहाराज म्हणूं लागले. त्यांची भक्ति पांडुरंगाचे ठिकाणीं निस्सीम असे. ह्यांचें कवित्व भक्तिरसप्रधान आहे. आरंभीं यांची कविता सुमारें पन्नास हजार आहे म्हणून सांगितलें आहेच. यांचे वंशज मर्ढेकर गोळे यांचें साताऱ्यास जें घराणें आहे त्यांच्याच घरीं या कवीच्या साठ वह्या असू... ग्रहींत सरासरीनें एक हजार कविता आहे. यांपैकीं बराच भाग आप्पा व आबा दोघां शिष्यांनीं लिहिलेला आहे. हे दोघे शिष्य शंभुमहादेव येथील राहणारे ... 'मनाचे अभंग' म्हणून जें प्रकरण आम्हीं छापिलें आहे तें सन १८३१ सालीं लिहून तयार झालें असा उल्लेख सांपडतो. सन १८५१ च्या सुमारास प्रस्तुत कवि नाग... स्वरूप झाले. ह्यांची समाधि सातारा तालुक्यांत बोरखळ येथें कृष्णेच्या कांठीं आ...

**निरंजनबुवाः**—बाळाघाटीं वंजरा नदीच्या तीरावर परळी वैजनाथाच्या पूर्वे चार योजनें कळंब म्हणून एक गांव आहे. त्या गांवचे कुळकर्णी श्रीधरपंत ओ... म्हणून कोणी गृहस्थ होते, त्यांचे चिरंजीव अवधूत हेच निरंजनबुवा या नांवानें प्रसिद्ध झाले. यांच्या मातुश्रीचें नांव लक्ष्मी. अवधूत ह्यांस लहानपणींच घरच्या गरीबीमुळें गांव सोडून नौकरीकरितां पुण्यास रहावें लागलें. कळंबगांवीं नष्टे आडनांवाचा कोणी वाणी होता त्याच्या अडतीचें काम हे पुण्यास राहून करीत. यांची दत्तावर अतिशय भक्ति असे. पुण्यास एकदा एका कीर्तनांत ठाकुरदास बुवांनीं श्रीमद्भागवतांतील यदुराजा आणि दत्त यांच्या संवादाचें फार प्रेमळ विवरण केलें. त्या वेळीं संसारव्यथेनें तापलेल्या निरंजनबुवास अतिशय विरक्ति उत्पन्न होऊन त्यांनीं हरिदासाचे पाय घट्ट धरून 'मजला श्रीदत्ताचें प्रत्यक्ष दर्शन करून द्या' अशी विनंति केली. हरिदास म्हणाले, 'आम्ही फक्त कीर्तन करितों.' पण अवधूतांची तळमळ कमी होईना. श्रीरघुनाथभटजीनामक कोणी श्रीरामदासस्वामीसारखे ब्रह्मचारी साधुपुरुष नाशीक येथें असल्याचें ऐकल्यामुळें नौकरी सोडून ते तिकडे निघाले. वाटेंत चिंचवड, जुन्नर इत्यादि ठिकाणच्या साधूंचें दर्शन घेत घेत शके १७२३ प्रजापति संवत्सरीं कार्तिक वद्य चतुर्दशीस नाशकास येऊन ह्यांनीं रघुनाथभटजींचें दर्शन घेतलें. तेथेंच मार्गशीर्ष शु० एकादशीस भटजींकडून यांस गुरूपदेश झाला. निरंजनबुवा नांव उपदेश देतांना गुरूंनीं ठेविलें. कवित्वस्फूर्तीही गुरुकृपेनें याच वेळीं झाली. गुरुकडून योगसाधन आत्मज्ञान वगैरेची माहिती मिळाली, पण दत्तदर्शनाची इच्छा पूर्ण झाली नाहीं. तेव्हां गुरूची आज्ञा घेऊन बुवा गिरनार पर्वतावरील दत्ताच्या पादुकांचें दर्शन घ्यावयास निघाले. अवधूतवृत्तीनें सर्व मार्ग पायांनींच आक्रमण करून बहु कष्ट सोसून दत्ताचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन परत नाशकास येऊन यांनीं गुरूची गांठ घेतली. पुढें हे कुटुंबांतील मंडळीसह मिरजेस गेले. तेथें श्रीमंत थोरले बाळासाहेब (... हल्लींच्यांचे आजे) यांनीं बुवांस गुरु केलें व त्यांच्या वंशाकडे थोडेसें उत्पन्न...

# अनुक्रमणिका.

दिले. पुढें लौकरच बुवांनीं चतुर्थाश्रम घेऊन शके १७७७ सालीं भाद्रपद शुद्ध एकादशीस मिरजेस देह ठेविला. यांस रामकृष्ण, योगिराज, विष्णु आणि वासुदेव असे चार पुत्र होते, त्यांपैकीं वडील रामकृष्ण यांचे चिरंजीव वामनदादा हे दोन वर्षांपूर्वीं अजमासें ७० वर्षांचे होऊन वारले. त्यांचे चिरंजीव भास्करराव हे मिरज संस्थानापैकीं मोडनिंब येथें मामलेदार कचेरींत कारकून आहेत.

निरंजनबुवांनीं 'स्वात्मप्रचीति' (ओव्या ५६५), 'साक्षात्कार' (७१०), 'रघुनाथचरित्र' (२९६) 'केशवचैतन्यकथाकल्पतरु' (७६०) अशीं चार मोठीं प्रकरणें लिहिलीं. त्यांशिवाय मराठी व हिंदुस्तानी पदें आणि आरत्या भुपाळ्या वगैरे किरकोळ कविताही बरीच केली आहे. प्रसिद्ध 'अमृतानुभवा'वरही एक गद्यात्मक टीका या कवीनें केलेली [illegible] आहे. वरीलपैकीं 'पतिव्रताख्यान,' 'निरंजनपर ओव्या' आणि 'गोंधळी' अशीं तीन किरकोळ प्रकरणें आणि 'केशवचैतन्यकथाकल्पतरु' इतकी कविता या भागांत आम्हीं प्रसिद्ध केली आहे. बुवांची सर्वच कविता सोपी, रसाळ, प्रेमळ आणि भक्तिपूर्ण आहे. यांचीं पदें फारच गोड असून मिरजप्रांतीं पुष्कळांच्या पाठांत आहेत. जी कविता या भागांत प्रसिद्ध झाली आहे तिजवरून आम्ही कवीबद्दल जें म्हणतों आहों तें वाचकांच्या अनुभवास येईलच. बाकीच्या कविता आम्हांस तूर्त प्रसिद्ध करितां येत नाहींत याबद्दल दिलगिरी वाटते.

निरंजनबुवांच्या कवितेमध्यें वर सांगितलेल्या कवित्वगुणाशिवाय एक विशेष लक्ष देण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं ज्या ज्या ठिकाणीं ते गेले व ज्या ज्या पुरुषांचीं [illegible] त्यांनीं घेतलीं त्यांचें व इतर गोष्टींचें वर्णन खुलासेवार करण्यांत आलें आहे. [illegible] शके १७३३ च्या सुमारास पुण्यापासून नाशकास जाण्याचा व नाशकाहून [illegible]स जाण्याचा त्या वेळचा पायरस्ता, वाटेंतील गांवें व तेथील साधुपुरुष आणि इतर लोक या संबंधाचें वर्णन वाचून इतिहासांत किंवा बखरींत वाचावयास न मि[illegible] अशा एका विशिष्ट समाजस्थितीची माहिती आपणास मिळते. कवीचे समग्र [illegible]काईनें वाचून व ज्यास्त माहिती मिळवून या विषयावर एक स्वतंत्र निबंध लिहितां येईल. पण येथें या संबंधानें ज्यास्त लिहितां येत नाहीं.

कवीचे नातू कै० वामनदादा व त्यांचे चिरंजीव रा० भास्करराव यांनीं आपले संग्रहीं [illegible] वरील सर्व ग्रंथ आम्हांस दिल्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. 'केशवचैतन्यकथाकल्पतरु' हा ग्रंथ आमचे मित्र रा० रा० नीळकंठ बळवंत भवाळकर, बी. ए. (नागपूर), यांनीं फार श्रमानें तयार करून देऊन आम्हांस ऋणी करून ठेविलें आहे. [illegible] भागांतील प्रकरणांच्या पोथ्या ज्या गृहस्थांनीं आम्हांस दिल्या त्यांचा नामनिर्देश [illegible] त्या त्या प्रकरणांच्या आरंभीं केला आहेच. कांहीं प्रकरणांवरील टीपा देण्याचे [illegible] रा० महादेव चिंतामण शाळिग्राम आणि विश्वनाथ बळवंत [illegible] बी ए

# दांजिकविकृत कवितासंग्रह.



## मनाचे श्लोक.

**गणेश ब्रह्मेश सुरेश** ज्यातें वंदोनि भावें स्मरती पदातें, ।
त्यातेंच मी वंदितसें सुभावें गावोनिया गूण पवित्र नांवें. ॥
रमामंदिरा, सुंदरा, चिद्विलासा, नमो तूजला सर्वभूताधिवासा ।
मती देइंजे आपुले गूण गाया, कृपासागरा **यादवा कृष्ण**राया. ॥
मना तूजला सांगतों गूज गोष्टी, सदा सर्वदा गूण गाई [१]स्वओढीं ।
मना सूख नाहीं प्रपंचीं पहातां, [२]चढोवाढिनें वाढतो भार माथां. ॥
मना शोधितां शोधितां सार पाहीं, हरीवांचुनी सार कोठेंचि नाहीं, ।
[३]यदर्थी तया ध्याउनीयां रहावें, दिसे दृश्य हें त्याचियानें पहावें. ॥
सदासर्वदा अंतरीं वागुं देई, जनीं सूख नाहीं, वनीं सूख नाहीं, ।
मना सूख तें कृष्णपायींच राहे, पुरे रे मना तूंच शोधोनि पाहें. ॥
[४]दुखाकारणें यत्न होताति नाना, दिनें इच्छिती द्रव्य आणी सुमाना ।
परी रे मना सूख तें कृष्णपायीं, प्रचीती पुरी पाहुनी पाडि ठायीं. ॥
मना संग रे सोडिं या [५]संसृतीचा, समूळीं मना भ्रम वारी मतीचा ।
भ्रमाच्या मुळें सूख स्वप्नीं असेना, हरीवांचुनी साच कोठें दिसेना. ॥
मना साच रे **कृष्ण** कै[६]वल्यदाता, मना संशयो सोडिं रे सोडिं आतां, ।
यदर्थी जिवीं **कृष्ण**रूपासि ध्यायीं, तुझा तूंचि रे **कृष्ण** होवोनि राहीं. ॥
सुखाकारणें रूचला लोकधंदा, परी तो नये कांहिं कामासि मंदा, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥
तुला साच रे साच रे सांगताहें, नये रे नये कांहिं कामासि पाहें, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १
मना कल्पना सर्व जाळोनि टाकीं, न ठेवीं न ठेवीं कदा कर्मबाकी, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १
मना वोट मानोनियां संसृतीचा, विचारें वि[८]चारू करीं सद्गतीचा, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १

---

१. आपल्या ओढीनें. २. वाढत्या प्रमाणानें. ३. यासाठीं. ४. दीन झालेले लोकं. ५.

मना नायके नायके अन्यवार्ता, नको रे नको वागवूं भार माथां, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १३
करोनी त्वरा धीर गांठीस बांधी, मना कर्मधर्मादिकें पाडि सांधी,
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १४
मना काय देणार देतील तूतें, नसे शांति रे याचिया मानसातें, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १५
सदा सर्वदा आठवोनी हरीसी, तुझा तूंचि रे पात्र होई सुखासी, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १६
मना रुक्मिणीवल्लभीं साच शांती, तया सेवितां जोडताहे प्रचीती, ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी, मना जागवीं जागवीं या जिवासी. ॥ १७
मना साच रे साच रे व्यर्थ सारें, पुरें शोधुनी पाहिं रे सद्विचारें, ।
मना सूख तें कांहिं कोठेंच नाहीं, जनें हीं उगी वाहताती प्रवाहीं. ॥ १८
मना जोंवरी तूझिया अर्थ[3] गांठी, तुला मानिती धाकुलीं आणि मोठीं, ।
फुका अर्थ जातांचि कोणी पुसेना, तुझें बोलणें कांहिं कोणा रुचेना. ॥ १९
जयाचें तयानें हितातें करावें, मना रे विचारें मना आवरावें, ।
नये लावूं रे छंद नाना जिवासी, महादुःख रे मानसा मोहपाशी. ॥ २०
मना तूझियानें घडे लाभ सारा, मना तूझियानें हरे हा पसारा, ।
यदर्थी मना ध्यायीं तूं श्रीअनंता, मना साच रे सांगतों हेंचि आतां. ॥ २१
मना सोडिं रे वासना दैन्यवाणी, प्रपंचीं असे रे मना फार हानी, ।
मना स्वप्निंही लाभ कांहीं असेना, जयाचेनि रे कृष्ण जीवीं वसेना. ॥ २२
मना तूजला बोध हा मी करीतों, मना चंचळा तूजला आवरीतों, ।
मना वासना वाउगी ते त्यजावी, मनोवृत्ति हे सर्व रूपीं सजावी. ॥ २३
मना साजिरा गोजिरा कृष्णराजा, तयाच्या पदीं सर्व विश्वास माझा, ।
म्हणोनी तया सर्वभावें स्मरावें, तयाच्या पदीं सौख्य तें ऊमगावें. ॥ २४
मना सज्जना कृष्ण मोठा कृपाळु, असे मोक्षदाता पहा विश्वपाळू, ।
तया सेवितां न्यून कांहीं घडेना, जिवीं जाहला भाव कांहीं उडेना. ॥ २५
पहा गोपिका कामयोगें निवाल्या, रतीच्या भरें रूप होवोनि ठेल्या, ।
मना दैत्य हे वैरभावें पदातें, कसे पावले वारुनी आपदातें. ॥ २६
मना जाहला पूर्ण विश्वास मातें, म्हणोनी जिवें लाविलें दृढ नातें, ।
मना तूंहि रे क्षण त्यातें न सोडीं, चढोवाढिनें वाढवी प्रेमगोडी. ॥ २७

१. कोपऱ्यांत, बाजूला. २. दाते. ३. द्रव्य. ४. पदरांत, जवळ.

मना तोडिं रे तोडिं रे भ्रांतिजाळें, मना सोडुनी अंतरीचे कुचाळें[1], ।
मना काळ हा सिद्ध कीं न्यावयासी, यदर्थीं मना सोडवी या जिवासी. ॥ २८
मना काळ हा दृश्य सारेंच खातो, शुभाशूभ रे कर्म दृष्टी पहातो, ।
हरीवांचुनी नाहिं रे अन्य जागा, म्हणोनी सुधी[2] लागले ह्याचि नादा. ॥ २९
नको बोलण्याचा मना वीट मानूं, नको हें उगें कांहिं चित्तांत आणूं, ।
निदानीं तुझ्या बोध येईल कामा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३०
नको रे मना बाटवूं तूं सुवाचा, नको ठेवुं रे बोध नाना मतांचा, ।
विवेकें करोनी विभो पूर्णकामा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३१
नको रे मना आणिकाचे विचारू, करोनी मतीचे मना फार चारु[3], ।
नको घालवूं काळ कांहीं रिकामा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३२
दिसे हे परी साच कांहीं असेना, असे जें खरें त्यास कोणी पुसेना, ।
विचारें विवेकेंकरूनी अकामा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३३
मना साच रे सांगतों साच तूतें, अरे रे मना वाउगीं सर्व मतें[4], ।
मना प्रीति ठेवीं रुपीं गूण नामा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३४
मना जोंवरी तोंवरी हा पसारा, मना नाहिं रे साच कोठेंचि थारा, ।
नें[5] लिंपे न लिंपे कदा अन्यधर्मा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३५
मना देइना देह हा संग अंतीं, असें वर्णिलें सज्जनीं साधुसंतीं, ।
यदर्थीं मना नातळे[6] अन्य कर्मा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३६
मना पुत्रदारादिकें अर्थवादी[7], असे जाणुनी[8] वागवीतोसि खांदीं, ।
तरी रे मना सोडिं ऐशा कुनेमा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३७
मना रुक्मिणीवल्लभू सौख्यसिंधू, असा जाहला पाहिजे दृढ बोधू ।
नको नातळूं मानसा अन्यकर्मा, भजे आत्मया अच्युता सौख्यधामा. ॥ ३८
मना साच तें शोधितां शोधवेना, जनाच्या मना बोध कांहीं रुचेना, ।
जनें चालती आपुलाल्या प्रकारें, अनेका रितीच्या अनेका विकारें. ॥ ३९
धरूं रे नको मानसा संग त्यांचा, जया अंतरीं ध्यास ह्या लौकिकाचा, ।
धरीं रे धरीं संगती वैष्णवांची[9], जयेचेनि प्राप्ती घडे श्रीहरीची. ॥ ४०
नको रे नको सेवुं तूं त्या नरातें, विचारें करोनी खरा पामरातें ।
जया अंतरीं सर्वदा अन्य धंदा, जिवीं नाठवी कृष्णपादारविंदा. ॥ ४१

---

१. अविश्वास, कुटाळकी. २. शहाणे लोक. ३. निरनिराळे चार. ४. मतें. ५. चिकटूं नको, स्वीकार करूं नको. ६. शिवूं नको, संग करूं नको. ७. पैशावर नजर देणारे. ८. ठाऊक असूनही. ९. विष्णुभक्तांची.

मना सार रे कृष्णपाया स्मरावें, स्वरूपीं तयाच्या भरोनी रहावें, ।
नसे सूख रे पाहतां अन्य ठायीं, असे रे मना तें असे कृष्णपायीं. ॥ ४२
भ्रमें व्यापिलें पिंड ब्रह्मांड सारें, रुची लागली भ्रांतिनें ही असे रे ।
म्हणोनी मना भ्रांतिही सर्व जाळीं, चिदानंद आनंदमूर्ति निहाळी. ॥ ४३
मना कल्पना कासया वाढवीशी, मना दुर्गती ज्याचियानें जिवासी ।
मना भ्रांतिही ज्ञानयोगें निवारीं, सदा अंतरीं ठेवुनीयां मुरारी. ॥ ४४
मना जोंवरी जोंवरी हा पसारा, नसे तोंवरी रे सुखालागिं थारा ।
मना जोंवरी कृष्ण हा कीं स्वचित्तीं, नसे तोंवरी भोग हे दुःख देती.॥ ४५
मना साच रे सांगतों गूज तूतें, दिसे दृश्य हें सर्व राहील येथें, ।
असे शांति ते कृष्णपादारविंदीं, म्हणोनी मना राहिं तूं त्या मुकुंदीं. ॥ ४६
तुला बोधितों युक्ति नाना करोनी, अनेका मतालागिं या आवरोनी, ।
मना कृष्ण आद्यंत[1] आनंददायी, नसे ऊपमा द्यावया अन्य कांहीं. ॥ ४७
मना राहिं रे वृत्ति ही आवरोनी, अखंडीत रे मौन्य मुद्रा धरोनी, ।
मना सूकतें[2] आतुडें रे फुकाचें, जिवीं ध्यान या ठेविं रे केशवाचें. ॥ ४८
विचारें मना आंवरी आपणातें, जसा लोभिया सांठवीतो धनातें, ।
सदा त्या रुपीं मोह अत्यंत ठेवीं, समस्ता भुतीं भाव त्याचाच भावी. ॥ ४९
चतुर्भूज चक्रायुधें चार हातीं, मना कुंडलें कर्णि त्या ढाल[3] देती ।
असे रेखिला तीलकू कस्तुरीचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५०
मना मन्मथू त्याचियातें तुळेसी, न होती रुपा याचिया साम्यतेसी, ।
कसा शोभतो रत्नकीरीट ज्याचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५१
मना चंद्रकोटी मुखाच्या सरीतें, कसे लागती ते तरीतें जरीते ।
असे वत्सळू कृष्ण हा भाविकांचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५२
मना शृंगवेत्रु[4] असे कक्षपूटीं[5], मुखीं शोभते वेणु अत्यंत मोठी ।
नसे न्यून रे कोणता गूण ज्याचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा.॥ ५३
मना हेम पीतांबरू दिव्य कांसे[6], कशील्यावरी[7] कांचि[8] अत्यंत भासे[9] ।
किरीटावरी तो तुरा मोतियांचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५४
गरूडासनीं शोभतें ध्यान पाहीं, जयाच्या पदीं न्यून कांहींच नाहीं, ।
महाराज हा नाथ लोकत्रयाचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५५

१. आरंभापासून शेवटपर्यंत. २. वाळतें. ३. ढाळ=तेज (मोत्यांचें वगैरे). ४. वाजविण्याचें शिंग व हातांत धरावयाची काठी. ५. काखेंत. ६. कमरेला. ७. बांधल्यावर, नेसल्यावर. ८. कमरपट्टा. ९. चकाके, शोभे.

जयानें असा वाढवीला पसारा, जयाचे रुपीं सर्व लोकांसि थारा, ।
असे कोवसा[1] वत्सळू प्रेमळाचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५६

मना शेष ज्याच्या जयातें निजाया, जयाच्या रमा लुब्धली साच पायां, ।
तुरा मूकुटीं ज्याचिया तूळशीचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५७

मना रुक्मिणीवल्लभू चित्सुखाची, असे मूर्ति ते सर्व कीं रे गुणाची, ।
बहूतांमुखीं ऐकिला योग साचा, जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा. ॥ ५८

विचारें विवेकें अहंभाव सांडीं, करोनी असे आपुली स्वात्मजोडी, ।
अहंदेह हा जोंवरी दृढ आहे, मना तोंवरी दुःख पाठीस[2] राहे. ॥ ५९

सुखाकारणें साधनें आचरीती, सुखाकारणें यत्न नाना करीती, ।
परी सूख तें काय कैसें कळेना, हरी आवडीवांचुनि आकळेना. ॥ ६०

मना भाव हा पापतापा निवारी, मना भाव हा शोकसंताप वारी ।
मना भाव हा आकळीतो हरीतें, पहा भावनेवांचुनी सर्व रीतें. ॥ ६१

मना सुख तें सज्जनाचेनि संगें, मना सूख तें कीर्तनाचेनि रंगें, ।
मना सूख तें आत्मचर्चाप्रसंगें, मना सूख तें कृष्णप्रेमानुरागें. ॥ ६२

मना जोंवरी वासना दृढ आहे, मना तोंवरी सूख स्वप्नीं न लाहे, ।
समूळीं मना वासना नाश होतां, मना मूळ रे बीज येईल हाता. ॥ ६३

नको रे नको कीर्ति गाऊं नराची, अभाग्या अभक्ता नरा पामराची ।
विभू नायकू नाथ लोकत्रयाचा, तया कारणीं काळ घाली सुखाचा. ॥ ६४

नव्हे रे नव्हे कृष्ण हा एकदेशी, वळे पाहुनीं भाव रे भाविकाशी ।
म्हणोनि रुपीं मानसा तूं प्रवेशे, समस्तैककर्मैं त्यजीं हीं अशेषें. ॥ ६५

मना सूख तें एक कृष्णासि ध्यातां, असे सार कीं हेचि ग्रंथीं समस्ता, ।
बहु हेंदरे[3] शेंदरे देव नाना, कराया जना जाहले ते तनाना. ॥ ६६

खरा देव हा कृष्ण दाता निजाचा, जया वर्णितां शीणली वेदवाचा, ।
म्हणोनी मना गाइं ध्यायीं तयासीं, मना होइ रे भागि त्याच्या सुखासीं. ॥ ६७

मना भाव हा शुद्ध कृष्णीं धरावा, मना आपुला वेग तूंवा हरावा, ।
मना कामना लौकिकाची त्यजावी, मना वासना कृष्णरूपीं यजावी. ॥ ६८

सदा-सर्वदा राहिं एकांतवासीं, न राहीं मना कांहिं मोहीं कुपाशीं ।
घडीनेंघडी सार साधोनि घेई, मना पूर्ण आनंद होवोनि राहीं. ॥ ६९

---

१. रक्षण करणारा, पाठिराखा. २. बरोबर. ३. घाणेरडे, किळस उत्पन्न करणारे. ४. स्तोम, प्रस्थ. ५. भक्ताचा.

मना सोडिं रे सोडिं रे भ्रांति सारी, मना कामना अन्य हें दुःखकारी, ।
नको रे मना अन्य दृष्टीस पाहीं, मना पूर्ण आनंद होवोनि राहीं. ॥ ७०
मना पूर्ण आनंद स्वानंद दाता, रमावल्लभू ध्याइं रे ध्याइं आतां ।
मना शांति रे त्यापदीं दिव्य लाही, मना पूर्ण आनंद होवोनि राही. ॥ ७१
मना सांडि रे सांडि रे व्यर्थ चाळे, मना सौख्य दुःखादि येती अभाळे ।
मना नाणि रे नाणि चित्तांत कांहीं, मना पूर्ण आनंद होवोनि राहीं. ॥ ७२
मना कर्म हे धर्म हे व्यर्थ सारे, मना वाउगे वाउगे हे पसारे ।
मना जाणुनी नेणता तूं न होईं, मना पूर्ण आनंद होवोनि राहीं. ॥ ७३
मना हे नव्हेते नव्हे जे पाहासी, जयाचेनि तूं पात्र, दुःखास होसी, ।
असे शुद्ध आनंद तो कृष्णपायीं, मना पूर्ण आनंद होवोनि राहीं. ॥ ७४
मना चिंतनें वृत्तिचा दोष जातो, मना चिंतनें कृष्ण हा वश्य होतो ।
विचारी मना पाहुनी शोध पाहीं, मना पूर्ण आनंद होवोनि राही. ॥ ७५
हरीवांचुनी कांहिं चित्तांत नाणी, हरीवांचुनी सर्व हे दुःखखाणी ।
असें जाणुनी सर्व सोडोनि देईं, मना पूर्ण आनंद होवोनि राही. ॥ ७६
मना रुक्मिणीवल्लभीं ठेवि नातें, नको वांटु[1] रे कांहिं तूं आपणातें, ।
मना सर्वही सूख तें त्याच पायीं, मना पूर्ण आनंद होवोनि राही. ॥ ७७
सदासर्वदा चिंतनीं त्वां रहावें, मना पाहिलें ध्यान जीवीं पाहावें, ।
मना आपणा झीजवीं भक्तिकाजे, मना रंगणीं कीर्तनाच्या न लाजे. ॥ ७८
मना सेविं रे सेविं रे श्रीअनंता, मना सोडिं रे सोडिं रे सर्व चिंता, ।
मना सूख नाहीं प्रपंचीं पाहातां, मना साच हें साच हें मानि आतां. ॥ ७९
नव्हे धर्म तो कर्म रे सांग पाहीं, नव्हे तीर्थ तें यज्ञदानादि कांहीं, ।
समस्तांस शुद्धी असे कृष्णनामें, मना गाइं रे नाम प्रेमें सुनेमें. ॥ ८०
मना चिंतनीं काळ सारा हरावा, मना भक्तिचा पंथ सिद्धी करावा, ।
मना भाव हा शुद्ध जीवीं भरावा, स्वरूपीं मना वेग तूझा जिरावा. ॥ ८१
नको रे नको दीन होऊं जनातें, मना मानुनी दीन हे आपणातें ।
मना सार तें कृष्णपायां स्मरावें, स्वरूपीं तयाच्या भरोनी रहावें. ॥ ८२
मना कासया संग ऐसा धरावा, जयाचेनि योगें हरी दूर जावा ।
नसे सूख तें अन्य संगीं प्रसंगीं, हरी जोडतो वैष्णवाचे सुसंगीं. ॥ ८३
मना भाव हा येक पूरे हरीतें, जया भावनें दूर होती दुरीतें[2] ।
मना भाव हा सर्व संगास तोडी, करीं रे मना भाव गांठीस जोडी. ॥ ८४

१. वांटणी करूं नको, अनन्यभावानें रहा. २. पापें.

मना भाव हा ठेविं तूं कृष्णपायीं, नको चाचपूं अन्य कोठेंचि कांहीं ।
मना भावनेनें गती या जिवासी, मना भाव हा पूर्ण दावी सुखासीं. ॥ ८५
मना भावनेसारिखा कृष्ण आहे, ययाची प्रचीती बहूतेक पाहे, ।
जशासी तसा राखिताहे विचारु, मना दर्पणाचा जसा का प्रकारू. ॥ ८६
मना कीर्तनीं चिंतनीं काळ सारीं, मना गोमटें काय तें गा विचारीं ।
नसे शाश्वतू येथिंचा लोकधंदा, किती रे किती तूजला सांगुं मंदा. ॥ ८७
मना अंतरींच्या भ्रमालागिं जाळीं, नसे सार संसार हा कीं त्रिकाळीं ।
म्हणोनी समस्तांसि सोडोनि राहें, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहें. ॥ ८८
नव्हे एकदेशी नव्हे सर्वदेशी, नव्हे वश्य हा कोणत्या साधनासी, ।
बहूतां प्रकारें तुला सांगताहें, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहें. ॥ ८९
न चाले मना बुद्धिचा तर्क कांहीं, जया शोधितां वेद थक्कीत पाही ।
विचारें करोनी मना ठायीं राहे, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहें. ॥ ९०
नव्हे प्राप्तही युक्ति नाना करीतां, नव्हे प्राप्त हें साधनें आचरीतां ।
मना साच रे दाखवीलें तुला हें, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहें. ॥ ९१
मना सोडिं तूं सोडिं तूं भ्रांतिजाळें, मना वासनेचें असे तोंड काळें, ।
सुखें तूं बसें निश्चळें एक ठायीं, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहीं. ॥ ९२
नये रे मना कोणि कामास येथें, असे रे मना सर्व हें व्यर्थ नातें, ।
नसे शांति रे मानसा अन्यठायीं, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहीं. ॥ ९३
मना साच रे पाहतां एक नाहीं, दिसे जीतुकें तीतुकें मोघ पाहीं, ।
असें अनूभवें साच वाटे मला हें, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहें. ॥ ९४
मना दुर्गमू दुर्गमू बोध ज्याचा, नसे ठाउका पार कोणा तयाचा, ।
परी त्यांत रे गोमटें हेंचि आहे, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहें. ॥ ९५
मना रुक्मिणीवल्लभू वेदवेद्यु, असे साच रे आद्युआद्यू अगाधू, ।
मना नाहिं रे याविणें अन्य कांहीं, जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहीं. ॥ ९६
मना अक्षरू श्रीगुरू ज्ञानमूर्ती, परानंददाता चिदानंदज्योती, ।
तयाच्या पदीं सर्वदा तूंचि राहें, मना सर्व तें सूख तेथेंचि लाहे. ॥ ९७
मना पाहें पां लोक हे भ्रांत जाले, मनुष्यत्व पावोनियां व्यर्थ गेले, ।
जनें पाहुनी ऐकुनी मंद होती, परी पाठिची वाट ते चालताती. ॥ ९८

---

१. एकाच विवक्षितस्थळीं असणारा अथवा वाटेल तिकडे सांपडणारा असा नाहीं. २. (आश्चर्यानें) थक्क झालेला. ३. व्यर्थ. ४. वेदांना माहीत असा. ५. 'आद्यु' हें 'आद्य' (मूळचा 'अनादि') याचें जुन्या मराठींतील रूप आहे. येथील द्विरुक्ति निश्चयात्मकता दाखविते. ६. नित्य.

मना साच रे साच रे कृष्णराजा, तयाचेच पायीं असे भाव माझा, ।
नसे कामना भावना अन्य कांहीं, हरीवांचुनी प्रीय दूजेंचि नाहीं. ॥ ९९
मना साधिं रे साधिं रे योग पूरा, विचारें करीं दूर हा कीं पसारा, ।
नसे साच कांहीं तुला हें कळावें, कळोनी तुला कृष्णरूपीं वळावें. ॥ १००
नव्हे कर्म रे सांग कांहीं करीतां, नव्हे धर्म हा सांग रे आचरीतां, ।
मना अन्य सोडोनिया रे प्रकारू, मना गाइं रे नाम वाचे उदारू. ॥ १०१
मना भ्रांतिनें दुःख होतें जिवासी, बहू हिंडणें राहणें गर्भवासीं, ।
म्हणोनी मना भ्रांति कांहीं नसावी, रती[1] गोमटी[2] कृष्णपायीं असावी. ॥ १०२
मना शोधितां शोध कांहीं न लागे, मना रे तुला बोधितां बोध भागे, ।
असें काय रे मानसा तूज झालें, कसें रे मना हीत माझें न केलें. ॥ १०३
मना हे नव्हे ते नव्हे हीत कांहीं, नव्हे रे नव्हे दृश्य हें साच पाहीं, ।
मना साच तें साच जीवीं धरावें, मना आपुलें हीत तूवां करावें. ॥ १०४
मना हे नव्हे ते नव्हे तर्कु जातां, मना साच रे कांहिं नाहीं पाहातां, ।
मना साच रे कृष्ण हा एक आहे, ययाचेनि हें सर्व कीं भासताहे. ॥ १०५
मना भावने कृष्ण हा वश्य होतो, मना भावने सर्व इच्छीत देतो, ।
तरी रे मना भावना तूंचि होईं, मना भावनेवेगळा तूं न राहीं. ॥ १०६
भ्रमातें हरावें भवातें तरावें, हरीतें स्मरावें श्रमा वीसरावें, ।
अखंडीत रे कृष्णगूणा रिझावें[3], मना आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ १०७
व्रतातें त्यजावें, प्रपंचा खिजावें, परार्थी झिजावें, कथेतें रिझावें, ।
सदा सर्वदा कृष्णरूपीं रिझावें, मना आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ १०८
मना आपणें आपणा पारखावें, मना चिंतनीं सर्वदा त्वां रमावें ।
मना कृष्णरूपास संलग्न व्हावें, मना आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ १०९
मना हिंडणें सर्व सोडोनि द्यावें, मना भ्रांतिचें कर्म कांहीं नुरावें, ।
मना कृष्णरूपाविणें त्वां नसावें, मना आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ ११०
मना आपुलें हीत तूवां करावें, विचारें मना आपणा उद्धरावें ।
मना आवडीनें हरीलागिं गावें, मना आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ १११
प्रपंचीं नसावें विचारीं असावें, कथेच्या रसीं प्रेमयोगें घुसावें ।
रतीच्या बळें कृष्णरूपीं वसावें, मना आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ ११२

---

१. भक्ति. २. शुद्ध, चांगली. ३. आनंद पावावें.

तुझे रे! तुवां आपणा शीकवावें, मना! सर्व अज्ञान सोडोनि द्यावें, ।
मना ! कृष्णप्रेमें करोनी डुलावें, मना! आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ ११३
मना ! हें नमावें, मना! तें नसावें, मना! आपणामाजि तें गीवसावें, ।
अखंडीत रे! कृष्णरूपीं असावें, मना! आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ ११४
मना ! रुक्मिणीवल्लभावीण नाहीं, मना ! साच रे! सूख कोठेंचि कांहीं, ।
विचारें खरें आपणा शीकवावें, मना! आपुल्या मूळ ठायासि जावें. ॥ ११५
मना धन्य तो कृष्णप्रेमें निवाला, समस्तांपरी कृष्ण हा प्रीय ज्याला, ।
मना त्याचिया पादपद्मा स्मरावें, तयाचे प्रसादें श्रमातें हरावें. ॥ ११६
मना [1]चावुटी वावुगी कां करावी? नसे भ्रांति ते जीविं कां गा! धरावी? ।
हरीचा पदीं न्यून तें काय आहे? भजोनी तया सर्व स्वार्थास लाहे. ॥ ११७
मना वाउगी भ्रांति जीवीं नसावी, अखंडीत रे! वृत्ति रूपीं असावी, ।
मना दुःख रे! आदिअंतीं प्रपंचीं, फळें तीं जिवा येति त्या भावनेचीं. ॥११८
मना ! गाइं रे! गोमटे गूण त्याचे, मना! ध्याइं रे! रूप त्या माधवाचें, ।
मना वाहिं रे! आपणाशीं तयातें, नको रे मना! तोंड वासूं जनातें. ॥ ११९
तनू कृतार्थी सुकृतें लाधली ही फुकाची, अरेरे मना! तूजला मानवाची, ।
असी ते न वेंची[2] मना! अन्य ठायीं, स्मरोनी हरी मानसा! धन्य होईं. ॥१२०
मना नाहिं रे! नाहिं रे! येकवाणी[3], अनेका रितीं गाइलीसे पुराणीं, ।
मना सोडिं रे! सोडिं ऐशा मतातें, सदा मानि रे! वैष्णवीसंमतातें. ॥ १२१
मथीली मना! सर्व शास्त्रें प्रमाणें, नसे रे! नसे शाश्वतू अन्य पेणें, ।
म्हणोनी मना! धांव हा जीव घेतो, प्रकारें करोनी तुला शीकवीतो. ॥ १२२
मना! पाहतां सूख तें अन्य नाहीं, हरीवांचुनी जाण कोठेंचि कांहीं, ।
हरी हा असे पूर्णदाता सुखाचा, मना! घेइं रे! भाग त्याच्या सुखाचा. ॥१२३
मना ! तूजला बोधिलें या प्रकारा, तयाच्या करीं रे! करीं तूं विचारा, ।
अस मागुती योग कोठें घडेना, हरी हा जिवातें पुन्हा आतुडेना. ॥ १२४
असे साच तें लाधलें कर्मयोगें, मना! पाह पां वारिलीं सर्व सोंगें, ।
असा वा तसा गोमटा योग आला, न सोडीं मना! याजसाठीं तयाला. ॥१२५
मना ! जें तुवां आदरोनी वरीलें, मना ! तूज तें नाहिं कामास आलें, ।
यदर्थी मना! सोडिं तूं संग त्याचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥१२

---

[1] बडबड. [2] व्यर्थ खर्चूं नको, दवडूं नको. [3] एकच प्रकारचें वर्णन.

बंधुपुत्रादि दारादि नातीं, तुझीं तूज रे! कांहिं कामा न येती, ।
कासया संग व्हावा तयाचा? धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥१
येइना अर्थ हा कांहीं कामा, मना! भोग रे! साच सारा रिकापा, ।
हा जिवीं ठेविं रे! शोध त्याचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥१
ोकिकू कांहिं कामास पाही, मना! राज्यभोगादि शस्त्रादि कांहीं, ।
संग तो कासया ऐशियाचा, धरीं रे! धरी संग ह्या वैष्णवाचा. ॥ १
तर्क रे! सर्व सोडोनि देईं, मना! सार जें तेंचि काढोनि घेईं, ।
धीर रे! ठेवि पूरा सतीचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥ १
वीषयीं सूख कांहीं असेना, विचारें मना! साच कोठें दिसेना, ।
ंतरीं गोमटा संग त्याचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥ १
हीत तें सर्व काळीं करावें, मना! आपुल्या ऊगमा ऊमगावें, ।
कोणता संग नाहीं सुखाचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥ १
लौकिकाच्या भ्रमातें निवारीं, मना! आपणू आपणालागिं तारी, ।
धन्य तो संग त्याला हरीचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥
मना! सर्व शोधोनि काढी, मुळा जावया मार्ग तो सर्व झाडी, ।
ाण रे! जीव तूझ्या जिवाचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा.॥ १
संगती सज्जनाची असावी, मना! संगती दुर्जनाची नसावी, ।
ोणता पार ह्या वैष्णवाचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥ १
संतसंगें कुसंगास तोडी, मना! संतसंगें करी स्वात्मजोडी, ।
! नको अन्य संगू फुकाचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥१
संतसंगू भ्रमातें हरीतो, मना! संतसंगू जगा उद्धरीतो, ।
परी संतसंगू सुखाचा, धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥ १
हीत जाणोनि आधीं करावें, मना! रुक्मिणीवल्लभातें वरावें, ।
योग रे! हाचि साचा त्रिवाचा, । धरीं रे! धरीं संग ह्या वैष्णवाचा. ॥१
ा स्मरावा, भवाब्धी तरावा, विचारू करावा, श्रमू संहरावा, ।
आचरावा, क्रमासी धरावा, मना! आवडी रुक्मिणीशू वरावा. ॥ १
! तरी कांहिं धंदा नसावा, मना! प्राक्तनानें घडो का फसावा, ।
ो न मीळो जिवासी विसांवा, परी अंतरीं कृष्ण माझा वसावा. ॥१
नुवां रे मना! ध्यान योगी, अखंडीत रे! रंगुनी प्रेमरंगीं, ।
मना! अन्यवाटेस कांहीं, असे सूख रे! साच तें कृष्णपायीं. ॥ १

रें तें दिसेना जनातें, नसे जें तया लाविती सर्व नातें, ।
ा! भ्रांति झाली जनाला, रुचेना कदा बोध त्याच्या मनाला. ॥१४२
सेना, दिसे तें असेना, खरें सद्गुरूवांचुनी गीवसेना, ।
ना! सद्गुरूच्या पदातें, भजे रे! भजे शुद्धभावें तयातें. ॥ १४
रे! यातना गर्भवासीं, अनेकारिती दुःख या कीं जिवासी, ।
नें आंधळे जीव झाले, मनुष्यत्व पावोनियां व्यर्थ गेले. ॥ १४
ीची, अनेका गतीची, मती जाहली ते तरी त्या रितीची, ।
व तें साच तें एक नाहीं, म्हणोनी मना! त्रासला जीव पाही. ॥ १४
णालागिं कोणी न जाणे, असे वर्तती सर्व लाजीरवाणे, ।
ना! त्रास आला तयाचा, असे साच तो भाव ज्यातें हरीचा. ॥१४
सना दुष्टही वाढताहे, मना! सूख जें स्वप्निंही तें न लाहे, ।
रे! तूझिया हिंडण्याचा, सुटेना अरे! पाश ह्या कीं भ्रमाचा.॥ १४
ा! पान नामामृताचें, नको रे! नको मत्त नानामताचें, ।
कृष्णनामें गती या जिवासी, असे गूज रे! ठाउकें त्या शिवासी.॥१
ी मना! कासया व्यर्थ चिंता? महाराज राजेंद्र हा कृष्ण दाता, ।
ो अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू. ॥१
र गंभीर पूर्ण प्रतापी, गुणें आगळा चिद्घनू ज्ञानरूपी, ।
ी अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू. ॥ १
! दैत्यपुत्रें कसा हाट केला? तयाचा पहा रक्षकू कृष्ण झाला, ।
ी अनन्या. कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू. ॥१
आर्तिनें ध्यान योगासि केलें, तयाचें पहा दुःख वारोनि गेलें. ।
ी अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू. ॥ १
आर्तिनें आठवीलें जयातें, मना! धावणें प्राप्त झालें तयातें, ।
ी अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू. ॥१
म्याचिया खाउनी तंडुलाशी, तया भाग्य दीलें नसे जें सुरांसी, ।
ी अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू.॥ १
! अर्जुनें दीधलें काय त्यातें, पहा आवडी धूतलें त्या हयातें, ।
शी अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू.॥१
! द्रौपदीकारणें हा मुरारी, उडी घालुनी सर्व संताप वारी, ।
अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकारू. ॥

मना! रुक्मिणीवल्लभाचे पवाडे, बहू ऐकिले, पाहिले म्यां निवाडे, ।
नुपेक्षी अनन्या कदां हा उदारू, असा कीर्तिचा ज्याचिया रे! प्रकार
मना! ध्यानयोगें तुं रे! ध्यान होई, स्वरूपाविणें मानसा! तूं न राही,
मना! हेंचि रे! सार या संसृतीचें, मना! सार्थकू हेंचि तूझ्या मतीचें.
मना! कृष्ण हा देव देऊ उदारू, असे साच रे! कृष्ण हा वेदसा
जिवा माझिया फार विश्वास झाला, सदानंद आला असे प्रत्ययाला. ।
नये काम तो कांहिं कामास तूतें, मना! अर्थ रे! सर्व राहील येथें,।
असे साच रे! साच हा कृष्ण येकू, करीं रे! जिवीं आपुलीया विवे
तुझा तूंच रे मानसा! हीतकारी, तुझा तूंचि रे! शत्रु नानाप्रकारी, ।
असे रे मना! सर्व तूझ्याच माथा, नसे साच रे! शब्द कोणा पहात
हरीच्या रुपामाजि संलग्न होई, मना! बंधनापासुनी मुक्त राही, ।
मना! कारणू तूंचि रे! बंधमोक्षा, ययाची असे सर्व ग्रंथांत साक्षा. ।
मना! जन्मकोटी तुझ्यानेंच होती, तुझ्यानें मना! शांति निर्वाण मु
नसे रे! नसे तूझियावीण कांहीं, यदर्थीं हरीच्या स्वरूपींच राही. ॥
नसे कामना भावना अन्य जीवा, नसे रे मना! अन्य कोठें विसावा, ।
असें जाणुनी वासरूपीं करी तूं, समस्तैक भावें तयाला वरी तूं. ॥
मना! तूझियानें घडे हीत माझें, तुझी रे! खरी ऊपमा तूज साजे, ।
यदर्थीं नको अन्य वाटेस जाऊं, नको रे! हरीवांचुनी अन्य दावूं. ॥ १
हरी हा दयाळू तुवां आठवावा, जिवाच्या जिवा माझि तो सांठवावा, ।
मना! होइ रे! धन्य तूं कृष्णध्यानें, समस्तैक रे! तूज होतील पुण्यें. ॥ १
असे भक्तिचा मार्ग रे! फार मोठा, जयाचेनि हा मोडतो कर्मसांठा, ।
यदर्थीं मना! भक्तिपंथेंचि जाई, चिदानंद ती मूर्ति चित्तांत ध्यायीं. ॥ १
करूणास्वरें आवडी नाम गाई, चिदानंद ते मूर्ति चित्तांत ध्यायीं, ।
समस्तांपरी कृष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १
मना! दुःख तें आदि अंतीं प्रपंचीं, असे वर्णिलें सज्जनीं साधुसंतीं, ।
समस्तापरी कृष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १
ना! प्रेमरंगांत रंगूनि जाई, सदा अंतरीं चित्सुखानंद पाही, ।
मस्तापरी कृष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १
ना! प्राक्तनीं लीहिलेलें चुकेना, मना! संचितापासि कांहीं विकेना, ।
मस्तापरी कृष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा

मा, नये काम कामा, नसे भोग रे! कांहिं कामा रिकामा, ।
ष्णपादारविंदा स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १७२
पाहिलें,काय थोडें, मना! पूसतों तूजलागीं निवाडे, ।
णपादारविंदा स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १७३
ानसा! आपणातें, नको रे! करूं अन्य कांहीं मतातें, ।
ष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १७४
! न्यून तें याजपासीं, ऑहे रे! ऑहे सर्व आनंदराशी, ।
ष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १७५
ोवल्लभीं साच पेणें, असें जाणुनी साधिजे या जिवानें, ।
ष्णपादारविंदा, स्मरे रे! स्मरे सर्व सोडोनि धंदा. ॥ १७६
नाम गाई तयाचें, असे रे! दिनानाथ हें नाम ज्याचें, ।
नामयोगें निवाला, महामृत्युपाशांतुनी मुक्त केला. ॥ १७७
ानंत होती जयाचे, असे लक्षणें पूर्ण संपूर्ण ज्याचे, ।
व्या पदीं न्यून कांहीं, रमावल्लभू चित्सुखानंद पाही. ॥ १७८
सर्व टाकोनि देई, अरे! वेदसारासि काढोनि घेई, ।
त्रीं ठेवि स्वानंदमूर्ती, नको पाहुं रे! या जनाची प्रचीती. ॥ १७९
स्वप्नीं असेना तयासी, असे संशयो ज्याचिया रे! मनासी, ।
ा सर्वही दूर होतां, पहा साच रे! गूज येईल हातां. ॥ १८०
' राही विश्वास पूरा, न राही मना मानसा! नीदेसूरा, ।
ाळ हा पाठिमागें, तुला न्यायया हें पहा तूज सांगे. ॥ १८१
सर्व अज्ञान तोडीं; मना! अंतरींच्या भ्रमालागिं मोडीं, ।
पूर्ण विज्ञान होतां, पहा सार रे! हेंचि वेदीं समस्ता. ॥ १८२
ंचभौतीक आहे, यया वेगळा होउनी यास पाहे, ।
जीव हा शुद्ध बुद्धु, असे साक्षिआत्मा विभू कीं प्रबुद्धू. ॥ १८३
ा! वाद घालूं जनासीं, मना! साच रे! शीकवी आपणासी, ।
, वैभवू हेंचि आहे, भ्रमा वारुनी चित्सुखामाजि राहे. ॥ १८४
कृष्णि विश्वास गाढा, असे गाइला वेदिं ज्याचा पवाडा, ।
! तर्क संपर्क जेथें, अशापें मना! ठेविं रे! सर्व नातें. ॥ १८५

---

झोपेंत असलेला. २. अशाशीं.

मना ! जोंवरी संशयो तूजपासीं, नसे तोंवरी सूख कांहीं जिवासी
मना! संशयो सोडुनी अंतरींचा, सदा सर्वदा राहि बा रे! सुखाच
अनेका परी त्वां मना! हें करावें, रमावल्लभालागिं जीवीं धरावें, ।
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडीं मना! याजसाठीं तया
प्रकाराप्रकारें करोनी हरीतें, स्मरे रे मना! सर्व मारोनि लातें, ।
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडीं मना! याजसाठीं तयाल
असी वेळ रे! दुर्लभी प्राप्त झाली, समस्तैक पुण्यें फळालागिं आ
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडीं मना! याजसाठीं तयाल
असे जोंवरी तोंवरी हा पसारा, मना! नाहिं रे! अन्य कोठेंचि ९
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडीं मना! याजसाठीं तया
मना! वेदसारासि काढोनि तूतें, विचारी मना! दाविलें या मतातें
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडीं मना! याजसाठीं तयाल
मना! तूजला वाट हे दाविताहे, त्वरें जाउनी त्या पथें मूळ पाहे
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडी मना! याजसाठीं तयाल
अनेकाप्रकारें विचारें विचारी, मना! आपुलें दुःख सारें निवारीं,
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडी मना! याजसाठीं तयाल
पुन्हा मागुता योग ऐसा घडेना, मना! हे निधानू तुला [1]आतुडेना
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडी मना! याजसाठीं तयाला
मना! रुक्मिणीशू असे शुद्ध दानी, कटीं ठेवुनी राहिला दोनि प
बहू सुकृतें पूर्ण हा योग आला, न सोडी मना! याजसाठीं तयाल
मना! शोधिं तूं आपुल्या सर्व वाटा, मुळा जावया मार्ग ठेवोनि 
अनेका मतीनें जिवा दुःख वाढे, मना! [2]नाहिं तें संशयें दुःख जो
असे संशयो फार हा घातकारी, अनेका प्रकारें करोनी विकारी,
असा संशयो कांहिं जीवा [3]तुठावा, श्रमू रे मना! साच सारा धैटा
मना! जागवी जागवी आपणासी, मना! जीव हा गुंतला मोहपा
विचारें तया सोडवी तूंच अंगें, अखंडीत रे! चिंतनाचेनि रंगें. ।
मना! आदिअंतू जयालागीं आहे, तया सेवि जो तोचि रे! मूर्ख प
नसे ठायिं रे! ज्याचिये द्वंद्व कांहीं, अशा तूं मना! दृढ चित्तांत ध्य

तरावें भवातें, हरावें भ्रमातें, करावें हितातें, ।
सदा संमतातें, समूळीं मना! जाळुनी संशयातें. ॥ २००
ांत रंगोनि जाऊं, नको रे! नको भावना अन्य भावूं, ।
तें तुला याजपासी, भजे रे! तया सिद्धि होतील दासी. ॥ २०१
ाळि तूं भ्रांतिजाळें, मना! सोडि रे! अंतरींचें कुचाळें, ।
! ध्याइं रे! श्रीअनंता, नसे सूख रे! कांहिं कोठें पहातां. ॥ २०२
ह मना! हें करावें, सदा अंतरीं रूप त्याचें धरावें, ।
अन्य कांहींच धर्मा, मना! सोडुनी अच्युता सौख्यधामा. ॥ २०३
! श्रीवरा पूर्ण नातें, नको अर्जवूं कांहीं तूं या जनातें, ।
वेश्वास तो सिद्धिदाता, नको वागवूं भार संसारमाथा. ॥ २०४
कृष्णिं सद्भाव होणें, असे साच रे! कृष्णिं निर्बाध [२]पेणें, ।
ऱें मना! हीत कांहीं, असे रे! असे सूख तें कृष्णपायीं. ॥ २०५
ही परी तूं हरीसी, भजोनी तरी पात्र होईं सुखासी, ।
' गोमटें त्वां करावें, जिवा माझिया श्रीवरा भेटवावें. ॥ २०६
काय रे! म्यां करावें, जरी रे! तयालागिं त्वां न स्मरावें, ।
वाउगें वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २०७
वाढली फार जीवीं, तया भेटुनी मानसा! त्यास दावी, ।
वाउगें वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २०८
क्ति कांहीं सुचेना, जिवा येथिंचा योग कांहीं रुचेना, ।
वाउगे वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २०९
या जनाची प्रचीती, प्रपंचांतली सर्व हे लोकरीती, ।
वाउगे वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २१०
होतसे या जिवासी, चढोवाढिनें वाढते ते उदासी, ।
वाउगे वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २११
ना, वनीं या गमेना, हरीवांचुनी कांहिं कोठें गमेना, ।
वाउगे वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २१२
र्म मी रे! करीतों, मना! नेमधर्मासि रे! आचरीतों, ।
वाउगे वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ॥ २१३
ीवल्लभावीण नाहीं, खरें सूख रे! अन्य कोठेंचि कांहीं, ।

---

. २. वसतीचें ठिकाण.

मना! सर्व हे वाउगे वाटताहे, असोनी सुखें त्याजवांचोनि पाहे. ।'
मना! लाभ तो कृष्ण विश्वासगाढा, मना बोध तो चिद्रुपाचा नि
मना! भाग्य रे! कृष्णभक्ती उदारू, मना! पूर्ण आनंद रे! सद्दि
मना! कृष्णभक्तीविणें व्यर्थ जीणें, असे कृष्णभक्तीविणें दुःख दृ
खरें गोमटें साच तें कृष्णप्रेमू, करूणा स्वरें गाइजे कृष्णनामू.
मना! नाम रे! सर्व तापा निवारी, मना! नाम रे! शोक संताप
नको बाटवूं आपुलीही सुवाचा, नये रे! पुन्हा जन्म हा मानवाच
सदा सर्वदा चिद्घनीं त्वां रहावें, मना! मीपणा आपुले त्वां त्यजावें
मना! वासना अन्य कांहीं नसावी, मना! भ्रांतिही सर्व निर्मूळ क
अरे! कृष्णनामें मना! कृष्ण होई, नको संशयू ठेवि बाकीस
असे कृष्णदाता पहा रे! निजाचा, नसे वेदशास्त्रासही पार ज्या
असे नामनौका तराया भवाब्धी, मना! नाम रे! तोडितें आधिव्य।
ययाचा पवाडा मुनी गर्जताती, मना! साच रे! साच नामीं प्रचे
मना! नाम रे! कृष्ण हे वर्ण दोन्ही, जयाची असे कीर्ति मोठी
मना! तूलितां नाम कांहीं तुलेना, अभाग्या नरा गूज याचें कळे
अशी गाइ तूं मानसा! नाममाळा, हरे कृष्ण विष्णो उदारा कृप
विभो अच्युता माधवा श्रीअनंता रघूनायका जानकीप्राणनाथा.
मना! हीत तें या जनासी कळेना, हरीभावनेवांचुनी आकळेना,
यदर्थीं मना! हीत आधीं करावें, सदा अंतरीं कृष्णपायां स्मरावें.
मना! धन्य झालों, मना! धन्य झालों, कथाचित्सुधासागरामाजि •
सदा अंतरीं ठेवुनीयां अनंता, मना! वारिली शोकसंतापचिंता. ।
मना! कृष्ण आनंद स्वानंदमूर्ती, परानंददात्री चिदानंदज्योती, ।
मना! ऊपमा अन्य जीतें न लागे, तये तें जिवीं ठेवि रे! लागवे
नको लागुं रे! देउं तूं कांहीं अंगा, नको नातळूं कांहीं ह्या अन्
सदा सर्वदा साच निर्लेप राहे, जळू ते जसे पद्मपत्रा न साहे. ॥
परीवार संपत्ति सेना उदंडू, मना! भाग्य रे! रावणाचें अभंडू, ।
परी रे! तया नाहिं कामासि आलें, मना! ते क्षणीं सर्व रे! व्यर्थ
मना! रुक्मिणीवल्लभासीच ध्यायीं, तया सोडुनी अन्य कोठें न
विचारें विवेकें मना! जा मुळाशीं, तुझा तूंचि रे! पात्र होई सुख
बहू आर्तिनें त्याजला हाक मारी, वदे हे विभो! हे हरे! कैटभा
म्हणे त्राहि रे! त्राहि रे! श्रीअनंता! हरे ज्ञानसिंधो सख्या प्राण

वनीं रक्षितो पाह पा जो पशूंतें, अनेकापरी पाहि रे! उद्भिजातें, ।
मना! पक्षियां पूरवी अर्थ त्याचे, असे रे! दिनानाथ हें नाम त्याचें. ॥ २३०
मना! जळ्चरू स्थळ्चरू जीव नाना, तयाची उपेक्षा कदा तो करीना, ।
उपेक्षी कसा सांग तो सेवकांतें, जयांचे तयापे असे सर्व नातें. ॥ २३१
मना! आर्जवी देवदेवा उदारा जगन्नायका अच्युता वेदसारा, ।
करूणास्वरें नाम गाई पवित्र्, असे आद्यवेद्यू विभू जो स्वतंत्रू. ॥ २३२
मना! तीर्थ तीर्थांतरें फार केलीं, परी रे मना! भ्रांति नाहीं निमाली, ।
म्हणोनी मना! त्रास येवोनि त्याचा, जिवें घेतला छंद राघावराचा. ॥ २३३
धनाच्याविणें दान कांहीं घडेना, रतीवांचुनी जीव रूपीं जडेना, ।
मना! हे असे शेवटींची सुवेळा, म्हणोनी मना! गाइं रे! नाममाळा. ॥ २३४
मना! तीर्थ होण्यास शक्तिप्रधानू, तसा पाहिजे रे! धनाचा गुमानू, ।
मना! हे असे शेवटींची सुवेळा, म्हणोनी मना! गाइं रे! नाममाळा. ॥ २३५
मना! योग हा साधितां दुःख होतें, पशूच्या वधें यज्ञयोगें समस्तें, ।
मना! हे असे शेवटींची सुवेळा, म्हणोनी मना! गाइं रे! नाममाळा. ॥ २३६
मना! पंडितू फार मानी चतूरू, शिरीं फार रे! वागवीताति भारू, ।
निजस्वार्थि रे! सर्व भूलोनि गेले, असे पंडितू लोकिं ह्या फार झाले. ॥ २३७
गुरू म्हणवी भ्रम ठेवोनि पोटीं, मना! ऐकवीं ज्ञानवैराग्यगोष्टी, ।
जयाच्या जिवीं फारसा दंभ मानू, असे साच तो ज्ञानवैराग्यशून्यू. ॥ २३८
असे सद्गुरू लोकिं ह्या लक्षकोटी, जना सिद्धता दाखवीतात मोठी, ।
जनें हीं अशा लागती फार पाठी, मना! ते करीं ध्यावयातें नरोटी. ॥ २३९
गुरू सद्गुरू बोलिजे कासयातें, असावें तरी काय ऐश्वर्य त्यातें? ।
मना! गूज हें नेणती कांहिं मूढें, जयाचें असे ठाकलें कर्म पूढें. ॥ २४०
जडीपूटि[२] जाणे गुरू तोचि मोठा, जया माळमुद्रादिकाच्याचि वाटा, ।
नसे भक्तिचें लक्षणू ज्याजपाशीं, गुरुत्वू असे प्राप्त झालें तयासी. ॥ २४१
गुरू अर्थकामी, असे कामकामी, गृहग्रामअश्वादिकीं ही कुनेमी, ।
अशा मानिती हेंदरे[३] जीव पाही, गुरू शिष्य ऐसे वहाती प्रवाहीं. ॥ २४२
गुरू धर्म तो नाहीं गूरूसि ठावा, कशानें मना! सेवकां बोध व्हावा? ।
गुरूच्या जिवीं भ्रांतिनें दुम्दुमीते, नसे शांति रे! ज्याचिया मानसातें. ॥ २४३
मना! अंधें अंधासि करणें उपायू; घडे तो उपायू किं रे! तो अपायू? ।
मना! शोधुनी गूज सांगे ययाचें, अशीया गुरूनें घडे काय साचे? ॥ २४४

---

१. त्याकडे. २. जडीबुटी(?)=औषधी वनस्पती. ३. अज्ञानी, भोळसर.

मना ! शिष्यसंताप जो कां न वारी, भवाब्धींतुनी जो जिवाला न तारी, ।
असा जो गुरू तो तरू दुष्कृताचा, नको होउं रे! देउं तूं स्पर्श त्याचा. ॥ २४५

जयाचेनि संगें जिवा होय भ्रांती, तयाचेनि संगें श्रमू जोडे खंती, ।
नको रे! करूं संग ऐशा जनाचा, जया भाव नाहीं खरा **श्री**वराचा. ॥ २४६

**वि**ठो सर्वदा रक्षितो भक्तपक्षा, पुसें हेंचि रे! **दै**त्यपुत्रासि साक्षा, ।
पुसें अर्जुनासी, पुसें द्रौपदीसी, पुसें रे! ध्रुवा, सुग्रिवा, त्या **ग**जासी. ॥ २४७

मना! पोटधंद्या जहालीं पुराणें, तयांतील रे! गूज कोणी न जाणे, ।
खरें बोलतां राग येती जनातें, तसा रे मना! लोभियां पंडितातें. ॥ २४८

खरा पंथ रे! कांहिं केव्हां रुचेना, खरें तें जना हीत कांहीं सुचेना, ।
असे जाहले साच हे भ्रांत लोकू, जयां अंतरीं कांहिं नाहीं विवेकू. ॥ २४९

सुटेना जिवाला पहा हे परंतू, जयेचेनि रे! जाहला सर्व घातू, ।
परंतू अशी दुष्ट चांडाळ आहे, जयेचेनि रे! कृष्ण हा दूर राहे. ॥ २५०

परंतू जळेना, परंतू टळेना, परंतू जिवा घातकारी कळेना, ।
परंतू असे व्यापुनी सर्व लोकां, जयेचेनि रे! वाटला फार धोका. ॥ २५१

मना! नीट रे! कोणि कर्में करीती, परंतू तरी त्यांत रे! मेळवीती, ।
मना! सांडिना कोणि रे! ईस पाहीं, भल्या पंडिता पाहिजे सर्वदा ही. ॥ २५२

परंतूविना कोणि कांहीं करीना, मना! ह्या मना कोणि रे! आवरीना, ।
मना! जाणुनी फार रे! अर्थ झाले, मनुष्यत्व पावोनियां व्यर्थ गेले. ॥ २५३

मना! तूं तरी सोडिं रे! हें परंतू, भ्रमासंशयाचा करीं साच घातू, ।
परंतूमुळें योग साचा घडेना, परंतूमुळें जीव रूपीं जडेना. ॥ २५४

परंतू मना! जैशि तैशी सरूं दे, भ्रमू संशयू कांहिं बाकी नुरूं दे, ।
मना! तीनही दूर होतांचि पाही, सहजू मना! पावसी कृष्णपायीं. ॥ २५५

परंतू असे हा महा [1]अंतरायू, न चाले ययाच्या पुढें गा! उपायू, ।
म्हणोनी मना! घात ईचा करावा, समस्तैकभावें हरी हा वरावा. ॥ २५६

करोनी मना! क्षेत्रसंन्यास वेगीं, करीं रे! करीं वास तूं पांडुरंगीं, ।
महाक्षेत्र हें पूर्ण स्वानंदखाणी, जयाच्या कथा वेदशास्त्रीं पुराणीं. ॥ २५७

मना! साच संन्यास संकल्प नाशू, तुझा तूटला पाहिजे सर्व पाशू, ।
सहजू नव्हे कर्मसंन्यास होणें, देहेभाव हा लागतांचि त्यजीणें. ॥ २५८

---

१. अडथळा.

मना! राहुनी सर्वदा एक गेहीं, गृहींचा धनी पाहिला साच नाहीं, ।
तरी रे! गृहीं काय राहून केलें, गृहेशा जरी नाहिं. रे! जाणियेलें. ॥ २५९
मना! जाणिलें पाहिजे.आपणाशीं, तसें रे! खरें प्रामिच्या त्या प्रभूशीं, ।
तया भेटुनी राहिजे त्याजपाशीं, मना! सहजू पात्र होई सुखाशीं. ॥ २६०
मना! ग्रंथ शास्त्रें पुराणें जहालीं, तयांची मना! भिन्न रे! भिन्न चाली, ।
नसे एकवाक्यू तयांचें पहातां, असें पाहुनी वाटे संताप चित्ता. ॥ २६१
तरी रे मना! मानवाची तनू हे, लहावी जरी कृष्णि भावार्थ राहे, ।
अभक्ताहुनी गर्दभादीक योनी, कशा वर्णिल्या पाहे त्या कीं पुराणीं. ॥ २६२
पशूहूनि आहे जयातें विसांवा, सुखाचा जया नाहिं कीं पंथ ठावा, ।
असे मानवाचे कशा देहभावें, जयातें नसे भक्तिचें वर्म ठावें. ॥ २६३
मना! जागत्या काय रे! जागवावें, अरे! काय रे! जाण त्याशीं कथावें? ।
मना! जाणशी सर्व तूं रे! प्रकारू, तुला शीकवूं कोणता मी विचारू? ॥ २६४
मना! यज्ञ हे दाविती स्वर्गवासू, असे तेथच्या साच सौख्यास नाशू, ।
फिरोनी मना! लागे एथेंचि येणें, घडे रे! प्रकारें अशा दुःख दूणें. ॥ २६५
जसें बैसुनी वृक्षशाखेवरीतें, जसे छेदिती शाख मागील हातें, ।
तसे हे जिवू सोडुनीयां मुळाशीं, निजू मानिती ह्या देहॉच्या कुळाशीं. ॥ २६६
अरे! पंचभूताविणें देह नाहीं, मना तूं तरी शुद्ध रे! बुद्ध पाहीं, ।
कशाकारणें मानिसी मी ययातें, बळें लावुनी पंचभूतांशि नातें. ॥ २६७
स्फटीकासि त्या रंगवीलें प्रकारीं, तरी याप्रकारीं नव्हे तो विकारी, ।
तसा जीव हा देहिं निर्लिप्त आहे, कसा रे! जिवू देह होईल पाहें. ॥ २६८
मना! धातु पाषाण वायूंत राहे, परी वायु तो धातुमाजी न राहे, ।
तसा जीव हा नांदतो या शरीरीं, देहे हे विकारी जिवू निर्विकारी. ॥ २६९
जिवाचा देहाचा नसे रे! समंधू, बळेंची मुढें बोलती देहवादू, ।
देहे हेंदरे[1] सर्वदा सर्व द्वारी, असे देहि संमंध हा निर्विकारी. ॥ २७०
देहे तूं न होशी त्रिकाळीं अरेरे! मना! दूर दृष्टी करोनी पहा रे! ।
देहे हे तरी सर्व भावें विकारी, मना! तूं चिदानंद रे! निर्विकारी. ॥ २७१
अरे! आपुलें रूप पाहोन ठायीं, समूळी मना! भ्रांत सोडून देईं, ।
मना! नातळे नातळे अन्य धर्मा, हरीवांचुनी अन्य कांहीं कुकर्मा. ॥ २७२
असे दृश्य हें पंचभौतीक आहे, प्रकाराप्रकारें वरी दीसताहे, ।
जसे मृत्तिकेचे खिलोणे करीती, जशी व्यापुनी राहते त्यास माती. ॥ २७३

१. घाण.

तसी रे मना! नृप आणी प्रजाही, समस्तैक रे! पंचभूतेंहि पाहीं, ।
गृहग्रामभूमी चतुष्पाद जाती, धनीसेवकू पंचभूतेंच होती. ॥ २७४
मना! देवदैत्यादि हे रावराणे, असे व्यापिले पंचकीं ह्या भुतानें, ।
समस्तांसि रे! राहिला देहभावू, मुळींचा यया नित्य जीला स्वभावू. ॥ २७५
बहूतापरी ऐकिल्या तूं सुगोष्टी, परी तूझिया वागलें काय पोटीं? ।
अनूताप झाल्याविना कार्य नोहे, असो हें मना! तूजला गूज ठावें. ॥ २७६
मना! **'बोधरत्नावळी'** ग्रंथ हा कीं,ययाचा जना सार्थ रे! अर्थ घोकी, ।
धरोनि यया सार्थ तूं अंतरासी, अरे प्राणिया! पात्र होईं सुखासी. ॥ २७७
असे ग्रंथ हा सार शास्त्रप्रमाणू, न लागे जना यास कांहीं समानू. ।
ययाचेनि योगें जिवा ज्ञान होतें, म्हणोनी पहावें जिवा सार्थ यातें. ॥ २७८
सदासर्वदा ग्रंथ हा रे! पहावा, ययाचा जिवीं अर्थ हा सांठवावा, ।
असें ज्ञान वैराग्य होण्यास येकू, उदेला असे पाहतां ज्ञानअर्कू. ॥ २७९
मना! तूजला बोध रे! फार केला, तयाचा मना! बोध रे! अर्थ ज्याला, ।
मना! तोचि रे! धन्य लोकीं विवेकी, जयाच्या मुखीं रुक्मिणीशू असे कीं.॥ २८०
**मनाचीं शतें** सार्थ कीं ज्या नरातें, कळूं लागती भ्रांति नव्हे तयातें, ।
सदासर्वदा कृष्ण राहील चित्तीं, तया प्राप्त रे! जाण निर्वाण मुक्ती. ॥ २८१[१]

## २. मुद्गलस्वामीकृत अभंग.

### अभंग १ ला.

नमन माझें आतां । चरणासी येकदंता! ॥ १ ॥
रंगा येईं गणपती! । संगें घेउनि सरस्वती. ॥ २ ॥
मूषक हंस वाहनें दोन्ही । यावें दंपत्यें बैसोनी. ॥ ३ ॥
उभे राहा पाठीमागें । कीर्तनासी द्यावा रंग. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे धुंडीराजा! । मनोरथ पुरवीं माझा. ॥ ५ ॥

### अभंग २ रा.

जिव्हा शिश्न दोन्ही जो कोणी आवळी । तोची येक बळी हरीदास. ॥ १ ॥
मोह माया काम क्रोध आशा तृष्णा । जाळोनी क्षमाना(?)राख केली ॥ २ ॥

---

१. मूळांत हे श्लोक सुमारें १३०० आहेत त्यांपैकीं वरील २८१ चांगले वाटले तेवढेच येथें घेतले आहेत. याच कवीचे अभंगवगैरे आणखी बरीच कविता आम्ही छापणार होतों पण कांहीं कारणामुळें तो बेत तूर्त रहित केला आहे.

जाणीव नेणीव लोभदंभ ऐसा। संसाराचा फांसा तोडीयेला. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे तोची हरीचा पैं दास। त्याचे पायपोस माझे डोई ॥ ४ ॥

## अभंग ३ रा.

विठ्ठल वदनीं नाचती रंगणीं। जाती लोटांगणी पंढरीसी. ॥ १ ॥
धन्य साधुसंत अवतार देवाचे। पावन महीचे केले तेणें. ॥ २ ॥
जेथें जाती तेथें उद्धरिती जीवा। लावुनीयां गांवा मोक्षाचीया. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे त्याचें वैकुंठीं नीशाण। सखा नारायण त्यांणीं केला. ॥ ४ ॥

## अभंग ४ था.

संताचीये मनीं भाव नाहीं दूजा। रंक दीन राजा सम त्यासी. ॥ १ ॥
चोर चाहॉड साव व्याघ्र आणी गाय। तृप्त करीताहे तान्हेलीया. ॥ २ ॥
वाटवीता धनी येती जाती लोक। सर्व छाया येक वृक्ष जैसा. ॥ ३ ॥
तैसीया संतासी भेटेल परदेसी। धरी पोटीं त्यासी, पुत्रासम. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे चित्त जैसें तें नवनीत। अखंड द्रवत, हृदय त्याचें. ॥ ५ ॥

## अभंग ५ वा.

साधूचीये चित्तीं दरीद्र संपत्ती। नेणें तो सर्वार्थीं कांहीं मनीं. ॥ १ ॥
प्रपंचाची आस्था नाहीं निरंतर। नारायणपर सदा सूख. ॥ २ ॥
आसन घालोनी येकांतीं तो बैसे। सेवी ब्रह्मरस प्रेमयुक्त. ॥ ३ ॥
अन्न आच्छादन प्रारब्धा आधीन। मेळवाया जाण प्रयत्न सांडी. ॥ ४ ॥
अजगराचे परी जयाची हे वृत्ती। तोचि सदा क्षीतीं मुद्गल म्हणे. ॥ ५ ॥

## अभंग ६ वा.

लावण्याचा गाभा त्रैलोक्याची शोभा। वीटेवरी ऊभा पांडूरंग. ॥ १ ॥
धरीयेला हरी पूर्ण अवतार। भक्ता नीरंतर तारावया. ॥ २ ॥
जेथें भाव तेथें ऊडी तो पैं घाली। संकट नीवारी नीजअंगें. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे करी कृपेची साऊली। विठ्ठल माऊली करुणाकर. ॥ ४ ॥

## अभंग ७ वा.

नाम हें चांगलें हृदयीं धरीलें।.................सदाशीवें. ॥ १ ॥
शीतळ शरीर झालें नामेंकरुन। गेलें तें शमून हाळाहळ. ॥ २ ॥
नारदासी शाप दक्षाचा पैं होता। रामनाम घेतां उद्धरला. ॥ ३ ॥
रामनाम घेतां गेली ब्रह्महत्या। प्रचीत तत्वता वाल्मीकासी. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे नामा पवीत्र पावन। मीही विश्वासून गेलों नामीं. ॥ ५ ॥

### अभंग ८ वा.

पुत्र वित्त धन नलगे मज कांहीं । मन तुझ्या पायीं असो देवा ! ॥ १ ॥
ऋद्धी सिद्धी मुक्ती नलगे वैकुंठ । क्षीरसिंधूबेट तुझें हरी ! ॥ २ ॥
मुद्गल म्हणे तूझें नाम मज देई । हेंच विठाबाई ! मागतसें. ॥ ३ ॥

### अभंग ९ वा.

करितां कीर्तन भक्तासी पावला । प्रऱ्हाद रक्षीला नाम घेतां ॥ १ ॥
संकटीं गजेंद्र स्मरतां नारायण । तयाचें बंधन तोडीयेलें. ॥ २ ॥
अधम चांडाळी राम आला ओंठीं । गणीका वैकुंठीं नेली हरी ! ॥ ३ ॥
केला तो निर्मळ नष्ट अजामीळ । प्रताप आगळा तूझ्या नामीं. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे माझे अवगूण काय । वेगीं धांव माय पांडुरंगा ! ॥ ५ ॥

### अभंग १० वा.

हरीचे चरण पवित्र हे मोठे । माथा नीळकंठ पायवंदी. ॥ १ ॥
अवचट लागला पाषाणा चरण । अहिल्योद्धारण केलें रामें. ॥ २ ॥
चरण आठवी गणीकाकुंटिणी । बैसवी विमानीं नारायण. ॥ ३ ॥
पवित्र चरण गंगेहुनी बहू । मुद्गल म्हणे राहो माझे मनीं. ॥ ४ ॥

### अभंग ११ वा.

नाम हेंची सार कलियुगामाझारी । येती मुक्ती चारी अनायासें. ॥ १ ॥
साधनें उडालीं तीर्थें हीं गळालीं । आवर्तनें मेलीं हरीनामें. ॥ २ ॥
पापाचे पर्वत जळती सकळ । नुरेची काजळ कापुर जैसा. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे नाम चहूं वरणासी । थोर साधन त्यासी नाहीं आतां. ॥ ४ ।

### अभंग १२ वा.

घेतां वाचे नाम देवा सूख वाटे । सोडोनी वैकुंठ येत असे. ॥ १ ॥
श्याम चतुर्भूज पीतांबरधारी । शंख चक्र करीं आयूधेंसी. ॥ २ ॥
सबाह्य अंतरीं प्रगटला राम । भक्तालागीं क्षेम देत असे. ॥ ३ ॥
वैकुंठींचा ठाव देउनी दासासी । ऐसा हृषीकेशी मुद्गल म्हणे. ॥ ४ ॥

### अभंग १३ वा.

आश्रमा आलीया पूजावा अतीत । तेणें भगवंत सुखी होय ॥ १ ॥
हाचि सर्व भूतीं भाव हो ! धरून । द्यावें त्यासी अन्न परीपूर्ण. ॥ २ ॥
विन्मूख गेलीया नेत असे पुण्य । जन्मींचें ठेवण सुकृतासी. ॥ ३ ॥
म्हणोनी भजावें हरीचीया दासा । मुद्गल म्हणे ऐसा भाव धरा. ॥ ४ ॥

### अभंग १४ वा.

छळी हरीदास निंदक दुर्जन । नरकाचें पेणें तया घडे. ॥ १ ॥
परनारी परद्रव्याचें हरण । कुंभपाक जाण त्यासी केला. ॥ २ ॥
असत्य बोळोनी स्नेहें उदरीं पाळी । यम देत सूळीं मुद्गल म्हणे. ॥ ३ ॥

### अभंग १५ वा.

कथेतें बैसोनी सांगे चांडाळ गोष्टी । नको माझे दृष्टी ऐसा प्राणी. ॥ १ ॥
येउनी नीजती उठोनीयां जाती । पुढें खर होती अजगर. ॥ २ ॥
गुडगुडीची नळी लावूनीयां ओढी । घेत बैसे [1]वीडी सभेमाजी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे त्याचा संग नको देवा । आईक केशवा! वचन माझें. ॥ ४ ॥

### अभंग १६ वा.

पंढरीसी जाती साधू संतजन । धरीन चरण धांवोनीयां. ॥ १ ॥
त्या हातीं नीरोप ····पाठवीला । कां मज दयाळा! मोकलीलें. ॥ २ ॥
चंद्र कैसा झाला उष्ण आजी फार । टाकीलें औदार्य समुद्रानें. ॥ ३ ॥
पृथिवीची शांती काय ती जाहाली । उदकें सोडीली शीतळता. ॥ ४ ॥
तैसें तूज झालें विठो! माय बहिणी । माता ते रुक्मीणी उभयतां. ॥ ५ ॥
धरूनी आठव नेई मज दीना । तुझाची पोसणा मुद्गल म्हणे. ॥ ६ ॥

### अभंग १७ वा.

विठ्ठलाचा दास सर्वस्वें ऊदास । धन जन त्यास तृणप्राय. ॥ १ ॥
उदक आवडे जैसें त्या मच्छासी । देवा! प्रीत तैसी हरीदासा. ॥ २ ॥
होय वारकरी जाय पंढरपूरा । ऐसा नेम खरा पांडुरंगीं. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे त्याच्या यातीं नाहीं काज । सांगतसे गूज भावीकासी. ॥ ४ ॥

### अभंग १८ वा.

रामनाम ज्याची सदा गर्जे वाणी । धन्य तो मेदिनीं प्राणी येक. ॥ १ ॥
देवासी हा हर्ष महीसी आनंद । लागलासे छंद नामघोषें. ॥ २ ॥
मातापिता त्याची बैसली वैकुंठीं । उभयतां पोटीं रत्न झालें. ॥ ३ ॥
जैसें बीज तैसीं फळें त्यासी येती । ज्याणीं हा श्रीपती सखा केला. ॥ ४॥
मुद्गल म्हणे त्याणीं तीर्थ केलें पावन । केवळ नारायण भूमीवरी. ॥ ५ ॥

१. विडा.

### अभंग १९ वा.

यशोदासुंदरी राधेसी पाचारी । नेई हा मुरारी मंदीरासी. ॥ १ ॥
कडेसी बैसोनी घेउनि गेली राधा । म्हणे 'तूं गोविंदा थोर होई'. ॥ २ ॥
शुद्धभाव पाहुन थोर झाला हरी । मनोरथ करी परीपूर्ण. ॥ ३ ॥
येक क्षणभरी वियोग सोसेना । रिता डेरा जाणा घुसळीला. ॥ ४ ॥
राधेचें अंतर पाहे यादवराय । बैल दोहि गाय म्हणोनीयां. ॥ ५ ॥
पूर्ण भक्त राधा हरीसी पावली । मुद्गल म्हणे जळीं लवण जैसें. ॥ ६ ॥

### अभंग २० वा.

पिल्याचें हें रेत मातेचे ऊदरीं । निर्माण शरीर होये तेथें. ॥ १ ॥
जठराग्नी माझी नऊ मास गोठलें । अंकूर निघाले हात पाय. ॥ २ ॥
गर्भामध्यें तया नाना दुःख पीडी । विष्टा नाकीं तोंडीं जंत झोंबे. ॥ ३ ॥
योनीद्वारें जन्म परमयातना । लागती वेदना सर्व अंगीं. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे देवा ! आतां जन्म पुरे । ठेवीं नीरंतर पायापासीं. ॥ ५ ॥

### अभंग २१ वा.

सर्व हें आयुष्य ग्रासीलें काळानें । बाळ हे तारुण्यें दशा नेली. ॥ १ ॥
वृद्धपणीं वेथा, कांपूं लागे मान । दांतासी पडून वाट झाली. ॥ २ ॥
जिव्हेसी बोबडी, नेत्रीं तेज जाये । नाक लोंबताहे ओंठावरी. ॥ ३ ॥
उभळ खोकला ऐकोनी शेजारा । म्हणती 'म्हातारा मरेना कां.' ॥ ४ ॥
पाळोनी पोशीली जन्मवरी ज्यासी । उबगली त्यासी वृद्धपणीं ॥ ५ ॥
मारीती थापड्या, वेटाव्या दावीती । बागुल म्हणती लहान थोर. ॥ ६ ॥
मुद्गल म्हणे ऐसी होत असे दशा । म्हणोनि जगदीशा भजा वेगीं. ॥ ७ ॥

### अभंग २२ वा.

धन्य तोची पुत्र नेणे अन्य तीर्थ । पूजी माता पीता येकनिष्ठें. ॥ १ ॥
राम नारायण तैसे मानी दोघा । अन्न वस्त्र नीगा करी सेवा. ॥ २ ॥
कुळाशीं तारीलें आपण तरला । देव ऋणी केला मुद्गल म्हणे. ॥ ३ ॥

### अभंग २३ वा.

अवज्ञा हेळणा भ्रताराची करी । कर्कशा अस्तूरी[1] नये कामा. ॥ १ ॥
ऐसे हे कांतेचा अवश्य त्याग करा । सोडोनी संसारा जावें त्याणीं. ॥ २ ॥
द्रव्यवस्त्रें देतां गोड बोलूं लागे । धर्म देखुनि मग कपाळ पीटी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे तीची टाकावी संगती । करील फजीती तीहीं लोकीं. ॥ ४ ॥

---

१. स्त्री.

### अभंग २४ वा.

काय देवा बोलूं कर्म बळीवंत । लिहीलें संचीत तुम्हीं भाळीं. ॥ १ ॥
पूर्ण सोळा कळीं निर्माण हा शशी । कळंक अंगासी लागलासे. ॥ २ ॥
जनकाची कन्या श्रीरामाची कांता । अशोकीं असतां दुःख भोगी. ॥३॥
कौरवीं सभेंत द्रौपदी गांजीली । अहिल्या छळीली वज्रपाणी. ॥ ४ ॥
शिवाचे अवतार पांचही पांडव । विराटाचा गांव सेवियेला. ॥ ५ ॥
मर्कटाचा जन्म हनूमंत झाला । गरुड सर्पाला भक्षीतसे. ॥ ६ ॥
सवालक्ष गांव सरितांचा नाथ । तयामध्यें मूत अगस्तीचें. ॥ ७ ॥
जन्मला सागरीं रमाबंधु शंख । मागतसे भीक घरोघरीं. ॥ ८ ॥
मुद्गल म्हणे ऐसें प्रारब्ध संचीत । न सोडी निश्चीत ब्रह्मादीकां. ॥ ९ ॥

### अभंग २५ वा.

भक्तांचीये घरीं काज देव करी । राहे त्याचे घरीं रंकरूप. ॥ १ ॥
धर्माचे आंगणीं काढी उच्छिष्ट पात्रें । कृष्ण राजिवनेत्र जगद्गुरू. ॥ २ ॥
कबीर मोमीन याची शाल वीणी । वेंचूं लागे शेणी जनीसंगें. ॥ ३ ॥
नरसिंहमेहत्याची भरीयेली हुंडी । पाणी वाहे श्रीखंडी येकोबाचें. ॥ ४ ॥
धना जाटा शेतीं पेरीयेला गहूं । आंगें झाला न्हाऊ सेन्यासाठीं. ॥ ५ ॥
थोंब्या तांटा कणस बोधल्याच्या आणी । रक्षी वह्या पाणीं तुकोबाच्या. ॥ ६ ॥
दामाजीपंताचा झालासे महार । भित ज्ञानेश्वर याची चोटी. ॥ ७ ॥
मुद्गल म्हणे तूज भक्ताचा कळवळा । ज्यांणीं हा अर्पीला जीवप्राण. ॥ ८ ॥

### अभंग २६ वा.

उदेपुरामाजी राणीयाचे पोटीं । जन्मली गोमटी मीराबाई. ॥ १ ॥
सर्वांगीं भूषणें ल्याली हरीभक्ती । ध्यानीं मनीं चित्तीं केशवराज. ॥ २ ॥

---

१. इंद्रानें. २. योजनें. ३. सरितांचा नाथ—नदीपति, समुद्र. ४. नरसिंहमेहत्याची थट्टा करण्याकरितां गांवच्या लोकांनीं त्याजकडे एका पांथस्थ ब्राह्मणास पाठविलें. त्या ब्राह्मणास हा सावकार वाटून, त्यानें मेहत्याकडून द्वारकेस श्रीकृष्णजीवर हुंडी घेतली. द्वारकेस गेल्यावर श्रीकृष्णानें त्या भक्ताच्या हुंडीची भरपाई करून दिली—अशी कथा आहे. ५. कृष्णापा श्रीखंडे असें एकनाथाच्या ब्राह्मणाचें नांव होतें. ६. जाट या नांवाचे लोकांपैकीं एक. ७. सेना न्हावी पूजेंत गुंतला होता तेव्हां बादशहाचें जरूरीचें बोलवणें आलें म्हणून विठोबा न्हावी होऊन बादशहाची स्मश्रू करून आला—अशी कथा आहे. ८. कापलेल्या. ९. जोंधळ्याच्या झाडाच्या कणीस व मूळ यांच्या मधील भागास ताट किंवा धाट म्हणतात. १०. पाण्यांत. (तुकारामाच्या अभंगांच्या वह्या पाण्यांत बुडविल्याची हकीकत सुप्रसिद्ध आहे.)

पिता हा कोपला विषवाटी दीली । घटघटां प्याली ब्रह्मरूप. ॥ ३ ॥
विषाचें अमृत केलें भगवंतें । हरिनाम गर्जत राजकन्या. ॥ ४ ॥
दासाचा साहाकारी भक्ताचा कैवारी । आलीं विघ्नें वारी मुद्गल म्हणे. ॥ ५ ॥

## अभंग २७ वा.

मंडुकबाळ सान कढईत गेलें । सर्वांग पोळलें तेव्हां त्याचें. ॥ १ ॥
संकट देखोनी म्हणे कृष्ण हरी । मज आतां तारीं दीनानाथा! ॥ २ ॥
पर्वतासमान काष्ट जाळी, मल (?) । नव्हे कांहीं केल्या कृशान तो. ॥ ३ ॥
टाकुनी जीवन पाहे मंडुकसान । मुखीं वदे कृष्ण राम हरी. ॥ ४ ॥
कृपाळु विठ्ठलें विमानीं बसवीलें । वैकुंठासी नेलें दर्दूरासी. ॥ ५ ॥
मुद्गल म्हणे तूझें कौतूक अपार । काय मी पामर वानूं हरी! ॥ ६ ॥

## अभंग २८ वा.

राजीयाचा घोडा तस्करानें नेला । झाला गलबला नगरांत. ॥ १ ॥
धावणें निघालें तयाचीये पाठीं । घोडा चरे तटीं नदीचीया. ॥ २ ॥
स्नान संध्या करुन केलें देवतार्चन । लावूनीयां मन जप करी ॥ ३ ॥
संकट पडलें तेव्हां भगवंता । घोडा शुभ्र होता बारकेला. ॥ ४ ॥
सावध होवोनि पाहे तस्करभक्त । मुखीं गुण गात हरीनामीं. ॥ ५ ॥
मुद्गल म्हणे देवा नामाची आवडी । लागतसे गोडी रमेहूनी. ॥ ६ ॥

## अभंग २९ वा.

विडा घ्यावा आतां तुम्हीं पांडुरंगा! । स्वामी अंतरंगा रुक्मीणीच्या. ॥ १ ॥
फळ आशा फोडी फोडोनीयां तीसी । वासनाशीरांसी काढीयेलें. ॥ २ ॥
जाळोनी टाकिलें अहो कठीणपणा । शुद्ध केला चूना वीडीयास. ॥ ३ ॥
शांती पक्क हींच नागवेलीपानें । वीडीसी करून देतों देवा. ॥ ४ ॥
श्रद्धा जायपत्री दया लवंगचूर । क्षमेचा कापूर वेलदोडे. ॥ ५ ॥
भाव हाची कात विड्यांत घातला । तांबूल अर्पीला मुखामाजी. ॥ ६ ॥
प्रसाद देऊनी पवित्र पीकासी । तारीं मुद्गलासी देवराया! ॥ ७ ॥

## अभंग ३० वा.

रत्नाचीये ताटीं प्रेमाचें भोजन । जेवी नारायण भावबळें. ॥ १ ॥
प्रसाद पावोनी झालों मी संतुष्ट । तूमचें उच्छिष्ट सेवोनीयां. ॥ २ ॥

---

१. बेडकाचें पोर. ही कथा ऐकिवांत नाहीं. २. अग्नि. ३. बेडकास.

बहु हा हव (?) झाला ललिताचा शेवट। झाले तुम्हां कष्ट पांडुरंगा ! ॥ ३ ॥
निद्रा करा आतां रखुमाईसहीत। उभी वाट पाहत मंचकावरी. ॥ ४ ॥
रचीयेला शेज पुष्पांची अरुवार[1]। लावीले सुंदर रत्नदीप. ॥ ५ ॥
पायघड्या भूमीवरी त्या घालोनी। चाले चक्रपाणी तयांवरी. ॥ ६ ॥
ऊठले विठ्ठल बोबडीया बोला। जयजयकार केला भक्तजनीं. ॥ ७ ॥
पहुडले देव माझ्या मंदिरांत। मुद्गल करीत चरणसेवा. ॥ ८ ॥

## अभंग ३१ वा.

साधनाचें सार गुह्याचें भांडार। राम निरंतर गात जावा. ॥ १ ॥
नामावीण थोर आणिक नसे कांहीं। हें त्रिलोकीं पाहीं धांडोळीतां. ॥ २ ॥
जप तप कोण कावाड वाहे ओझें। रामनाम गूज धरा वेगीं. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे करा आपूलें स्वहीत। नामावीण मुक्ति नाहीं नाहीं. ॥ ४ ॥

## अभंग ३२ वा.

श्रावण सुपुत्र कावड घेवोनी। हिंडत मेदीनी तीर्थाटणा. ॥ १ ॥
मातापिता दोघे चक्षूहीन वृद्ध। झाले निशीमध्यें कष्टी फार. ॥ २ ॥
तया दोघांजणां तृषा हे लागली। कावड ठेवीली वृक्षाखालीं. ॥ ३ ॥
उदक आणाया गेला सरोवरा। वाजे भरभर झारी तेथें. ॥ ४ ॥
व्याहाळी (?) खेळावया दशरथ आला। ऐकोनी विंधीला बाण त्यानें. ॥ ५ ॥
अकस्मात बाण लागला श्रावणा। तोडी पंचप्राण तये वेळीं. ॥ ६ ॥
रामनामस्मरण उत्तर ऐकूनी। भ्याला राजा मनीं दोपास्तव. ॥ ७ ॥
मातापिता वृद्ध शापीती दशरथा। होईल शोक आतां आम्हांऐसा. ॥ ८ ॥
ऐकोनी वचन राया झालें सूख। कधीं पुत्रमूख पाहीन मी. ॥ ९ ॥
तयाचीया शापें राजासि आनंद। झाला ब्रह्मानंद मुद्गल म्हणे. ॥ १० ॥

## अभंग ३३ वा.

अनंत जन्मीं तप केलें असे कोणीं। तरिच त्याची वाणी वदेल राम. ॥ १ ॥
प्रयागीं जाऊनी देहासी कर्वती (?)। तेव्हां भक्त होती विठोबाचे. ॥ २ ॥
पंच अग्नी घडे निराहारी चांग। तया होय संग साधूसंता. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे तोची दैवाचा पूतळा। ज्यासी लागे चाळा रामनामीं. ॥ ४ ॥

---

१. मऊ.

### अभंग ३४ वा.

वाहात खळखळी यमुना जीवनीं । गोपाळ ऐकोनीं धाविन्नले. ॥ १ ॥
मिळोनी गोपाळ नवलक्षगडी । बळकावीली थडी यमुनेची. ॥ २ ॥
हमाम्याची घाई करीती धूमाळी । मिळोनी गोपाळ येकदांची. ॥ ३ ॥
घालीती हमामा प्राण कासावीस । मुखासी खरस आली त्यांच्या. ॥ ४ ॥
कौतूक पाहूनी कृपाळु बा कृष्णा ! । यमुनाजीवन स्थीर केलें. ॥ ५ ॥
अगाध करणी तुझी वनमाळी ! । भक्तासी सांभाळी मुद्गल म्हणे. ॥ ६ ॥

### अभंग ३५ वा.

संताची छळणा न करावी कोणीं । हरीचे भजनीं लावा मन. ॥ १ ॥
वर्म कर्म ऊन बोलूं नये कदा । पाहावें गोविंदा सर्वांभूतीं. ॥ २ ॥
काम क्रोध वैरी घालावे बाहेरी । धरूं नये भारी अभीमान. ॥ ३ ॥
संसार क्षणीक टाकावे विषय । सावध बापा ! होय मुद्गल म्हणे. ॥ ४ ॥

### अभंग ३६ वा.

माझें हेंची ध्यान ऊभा समचरणीं । जघनीं ठेवोनी कर दोन्ही. ॥ १ ॥
मुगुट कुंडलें सर्वांगीं मेखळा । टिळक पींवळा रेखीयेला. ॥ २ ॥
येकावळी कंठीं कौस्तूभवनमाळा । कांसेसी कसीला पीतांबर. ॥ ३ ॥
रूप मनोहर सुंदर सांवळें । देखतांची मन निवयेलें. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे माझा सगुण विठ्ठल । धरीन पाऊलें हृदयांत. ॥ ५ ॥

### अभंग ३७ वा.

तीस योजनें लांब रुंद लंका । घरें कीती ऐका मोज्या तेथें. ॥ १ ॥
रत्नाचीं सुंदर पांचलक्ष घरें । सोन्याचीं मंदीरें सातकोटी. ॥ २ ॥
सप्तलक्ष घरें रुप्याचीं निर्मळ । तांब्याचीं नीखळ एककोटी. ॥ ३ ॥
वीटेबंदी घरें सवालक्ष तेथें । कांशाचीं शोभत साठसहस्र. ॥ ४ ॥
गोमटीं रत्नाचीं शिवालयें नवकोटी । होतो धूरजटी अभीषेक. ॥ ५
चौऱ्यांशीं योजन सिंहासन ज्याचें । सेवक सेवेचे सुरवर. ॥ ६ ॥
चौदा चवकड्या आयुष्य जयाशीं । अंतपार त्यासी असेचीना. ॥ ७ ॥
ऐंशीसहस्र कांता एकलक्ष सूत । सवालक्ष नातू ज्याचे पोटीं. ॥ ८ ॥
संतती संपत्ती असोनी रावण । सोडी जव्हां प्राण नाहीं कोणी. ॥ ९ ॥
मासाभरी सोनें मुखांत घालाया । मिळेना हो ! तया अंतकाळीं. ॥ १०
कोणाचें घरदार मृगजळ संसार । मुद्गल म्हणे खरा हरी एक. ॥ ११

## अभंग ३८ वा.

किती काकूळती येऊं पांडुरंगा! । तोडी भवभंगा फांसा माझा. ॥ १ ॥
आशा हे ममता करिती वोढावोढी । अहंकाराची बेडी पडली पायीं. ॥ २ ॥
मद हे मत्सर काम ते तस्कर । लागले दुस्तर पाठीं वैरी. ॥ ३ ॥
तृष्णा हे वासना पडियेली गळां । नाहीं तो जिव्हाळा प्रेमार्थाचा. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे आतां धांव पंढरीराया! । उभारोनी बाह्या कडे घेईं. ॥ ५ ॥

## अभंग ३९ वा.

संसारा येवोनी वीषय सेविले । नाहीं हीत केलें संतसंग. ॥ १ ॥
नाहीं ठेवीयेला माथा संतचरणीं । न पडे श्रवणीं हरीकथा. ॥ २ ॥
घेतलें तें नाहीं मुखीं रामनाम । नाहीं हातें⋯⋯पूजा केली. ॥ ३ ॥
तीर्थव्रत कधीं नाहीं केला जप । घडेल अमूप दोष मज. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे देवा! वांयां गेलों फार । झाला भूमीभार काय करूं? ॥ ५ ॥

## अभंग ४० वा.

मना! देईं मज दान । सखा होईं नारायण. ॥ १ ॥
हेंची काम करी मना। लागतसें तुझ्या चरणा. ॥ २ ॥
भिक्षा मज दीना देईं । निशीदिन गुण गाईं. ॥ ३ ॥
पूरवीं मनाची आस । म्हणे मुद्गल हरीदास. ॥ ४ ॥

## अभंग ४१ वा.

आम्हा पतीताकारणें । अवतार घेतला नारायणें. ॥ १ ॥
दुष्ट मारोनीयां फार । धरा केली निरवैर. ॥ २ ॥
सुखी केले साधू ऋषी । दग्ध झाल्या पापराशी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे दिलें सूख । हरलें गर्भींचें तें दुःख. ॥ ४ ॥

## अभंग ४२ वा.

आम्ही करूं आपुलें हित । गाउं रामनाम गीत. ॥ १ ॥
वेडे होउन गेलों आम्ही । कांहीं बोलूं नका तुम्ही. ॥ २ ॥
सेवीयेला ब्रह्मरस । तेणें झालों आम्ही पिसे. ॥ ३ ॥
बड बड करूं फार । मुद्गल म्हणे यम दूर. ॥ ४ ॥

## अभंग ४३ वा.

मायबहिणी विठाबाई । भीमातीरीं शेषशाई. ॥ १ ॥
गळां तुळशीच्या माळा । बुका लावी लोकपाळा. ॥ २ ॥

कासेसी [तो] पीतांबर । टोपी त्याला डोईवर. ॥ ३ ॥
विटेवरी सम पाउलें । कटीवरी कर ठेविले. ॥ ४ ॥
भक्त पडतांची दृष्टी । प्रेमळाशी देतो भेटी. ॥ ५ ॥
मुद्गल म्हणे बहू भोळा । विठो मनाचा कोंवळा. ॥ ६ ॥

### अभंग ४४ वा.

चला जाऊं पंढरीशी । हाकारीतो प्रेमळाशी. ॥ १ ॥
सोडा लौकीकाची आस । धरा पांडुरंगीं कास. ॥ २ ॥
रामकृष्ण बोला मुखीं । तेणें व्हाल तुम्ही सुखी. ॥ ३ ॥
अभयवचन बोला । मुद्गल म्हणे भावीकाला. ॥ ४ ॥

### अभंग ४५ वा.

संताचे चरण । तेंचि माझें देवतार्चन. ॥ १ ॥
संत गाइन वेळोवेळां । रूप त्याचें पाहिन डोळा. ॥ २ ॥
त्याच्या पायीं घालिन मिठी । जन्ममरणा होइल तुटी. ॥ ३ ॥
घरीं होवोनीयां दास । मुद्गल म्हणे झाडिन केश. ॥ ४ ॥

### अभंग ४६ वा.

मतिमंद पापराशी । हीनदीन महादोषी. ॥ १ ॥
पाव लवकरी मज दीना । शरण आलों नारायणा ! ॥ २ ॥
माझी अमंगळ वाणी । मूर्खांचाही शिरोमणी. ॥ ३ ॥
ब्रीद पाहें पंढरिराया ! । मुद्गल म्हणे जातों वांयां. ॥ ४ ॥

### अभंग ४७ वा.

काय माझ्या शिरीं दोष । तेणें जाहलासी ऊदास. ॥ १ ॥
सख्या माझ्या जिवलगा । कृपाळुवा पांडुरंगा ! ॥ २ ॥
अपार तारीयेले देवा ! । तेथें माझा किनुल्या केवा ? ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे हृषीकेशी ! । ठाव देईं पायांपाशीं. ॥ ४ ॥

### अभंग ४८ वा.

अभागी अमंगळ । करी माझा प्रतीपाळ. ॥ १ ॥
धांवुन येईं पंढरिराया ! । क्षेम देईं चहूं बाह्या. ॥ २ ॥
किती वाट पाहूं आतां । देवा लक्ष्मीच्या कांता ! ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे कासावीस । पाहें हरी तुझी वास. ॥ ४ ॥

### अभंग ४९ वा.

भागवत धर्म । जे कां आचरती कर्म. ॥ १ ॥
तोचि वैष्णवांचा राणा । वचन माझें सत्य जाणा. ॥ २ ॥
नम्र होये सर्वाभूतीं । एक हरी पाहे चित्तीं. ॥ ३ ॥
आकाश [ही] पडो अंगा । नित्य नेम नव्हे भंगा. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे कोणी येक । ब्राह्मण अथवा अनामिक[1]. ॥ ५ ॥

### अभंग ५० वा.

काळ ग्रासी काया । कां रे ! भुललासी वांयां. ॥ १ ॥
आतां सावध होईं । कांहीं हीत करोनी घेईं. ॥ २ ॥
बहूजन्मींचें सुकृत । तेव्हां नरदेह प्राप्त. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे धरीं मनीं । शरण जाय संतचरणीं. ॥ ४ ॥

### अभंग ५१ वा.

वचन अवधारीं । चित्त देईं बा श्रीहरी ! ॥ १ ॥
जावो माझा प्राण । तुझे न सोडीं चरण. ॥ २ ॥
विसर पडे ओठी । गोह (?) ल्या घडो कोटी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे मेघश्यामा । आम्हा विश्वास तुझ्या नामा. ॥ ४ ॥

### अभंग ५२ वा.

प्रयागीं केल्या वास । सरी नये रामनामास. ॥ १ ॥
सहस्त्र यज्ञ करी पुण्य । एक म्हणतां नारायण. ॥ २ ॥
दान देतां कनकरासी । नये येका हरिनामासी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे अच्युतनाम । चवदाभुवना न पुरे सम. ॥ ४ ॥

### अभंग ५३ वा.

प्रल्हाद पितृआज्ञा मोडी । बळी गुरू[2]डोळा फोडी. ॥ १ ॥
भक्ति कोणी अवरोधी । त्याचें वचन मोडा आधीं. ॥ २ ॥
बंधु टाकुनि बिभीषण । रघुवीरा गेला शरण. ॥ ३ ॥
भरत माता अपमानी । पति उपेक्षी द्विजपत्नी[3]. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे जोडे राम । आंगें करावा तो धर्म. ॥ ५ ॥

---

१. नांव न घेण्याजोगा; अंत्यज. २. शुक्राचार्यांचा. ३. यज्ञपत्न्याख्यानांत सांगितल्याप्रमाणें.

### अभंग ५४ वा.

सखे साजणि विठाबाई । सांवळे सकूमार/ आई. ॥ १ ॥
होसी उदार डोळस । किती पाहूं तुझी वाट ? ॥ २ ॥
काय आठवूं तुझे गूण । भूमि न पुरे लेखन. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे धांवुन येई । मज दीना भेटी देई. ॥ ४ ॥

### अभंग ५५ वा.

ज्याणें गुरू नाहीं केला । त्याचा जन्म व्यर्थ गेला. ॥ १ ॥
नव्हे पदरींची वाणी । व्यास बोलले पुराणीं. ॥ २ ॥
सदा सूत काळें (?) । करी जन्मासी विटाळें. ॥ ३ ॥
त्याचें सेवूं नये अन्न । विन्मुख त्यासी नारायण. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे कुचर खोटा । ऐसा जन्मला करंटा. ॥ ५ ॥

### अभंग ५६ वा.

तपव्रत योग दान । काय करूनीयां शीण ॥ १ ॥
एक विठ्ठल धरा चित्तीं । चुके चौऱ्यांशीविपत्ती. ॥ २ ॥
काय तीर्थक्षेत्र यात्रा । मन लावा राजिवनेत्रा. ॥ ३ ॥
विठ्ठल नाम हें अमृत । मुद्गल म्हणे शीव ध्यात. ॥ ४ ॥

### अभंग ५७ वा.

शिवाचें जीवन । रामनाम अक्षर दोन. ॥ १ ॥
तोची उपदेश उमा । मछिंद्र गोरख चौरंगी (?) नामा. ॥ २
नामजप थोर थोर । शुकादीक योगेश्वर ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे जप माझा । नामावीण नाहीं दुजा. ॥ ४ ॥

### अभंग ५८ वा.

कोणि साधो योगमुद्रा । आम्ही भजों रामचंद्रा. ॥ १ ॥
कोणी करो व्रततप । आम्ही घेऊं नाम सोप ॥ २ ॥
कोणि तीर्था क्षेत्रा जावो । आम्हा नाम हाची देवो. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे नामाविण । माझा जाऊं पाहे प्राण. ॥ ४ ॥

### अभंग ५९ वा.

आम्ही करूं तुझी सेवा । ऐसें दान देई देवा ! ॥ १ ॥
नाहीं आणीक मागत । तुझ्या पायांची शपथ. ॥ २ ॥

प्रारब्ध माझा भोग । सुखदुःख घडो संग. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे पांडूरंगा! । चित्त माझ्या बोला दे गा! ॥ ४ ॥

अभंग ६० वा.

असत्य बोलती । कोटि पूर्वज नरका जाती. ॥ १ ॥
म्हणोनीयां सत्य धरा । फुका लाभ येतो घरा. ॥ २ ॥
जरी झाला परोपकार । तरी न चुके नर्क घोर. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे सावध होई । क्रिया सुखदुःख देहीं. ॥ ४ ॥

अभंग ६१ वा.

राज्य करी तो पाताळीं । महाभक्त दैत्य बळी. ॥ १ ॥
डोळा फोडीला शुक्राचा । केवळ पुतळा सत्वाचा. ॥ २ ॥
मागें न सरे तो दाना । देह दीधला वामना. ॥ ३ ॥
हरी गोंवीला वचनें । उभा[1] केला मुद्गल म्हणे. ॥ ४ ॥

अभंग ६२ वा.

नाहिं चाड लौकीकाची । भक्ति करा वीठोबाची. ॥ १ ॥
एका पंढरीनीवासा । नाहीं दुजीयाची आशा. ॥ २ ॥
नाहीं भय कळिकाळाचें । रामकृष्ण नाम वाचे. ॥ ३ ॥
नाहिं चारि मुक्ती काम । मुद्गलासी भजनीं प्रेम. ॥ ४ ॥

अभंग ६३ वा.

पंचवीस ये मारक । गोडपरी कडूवीख. ॥ १ ॥
............... । ...................... ॥ २ ॥
............... । ......................... ॥ ३ ॥
............... । ......................... ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे जाणुन सेवा । पुढें दुःख येइल जीवा. ॥ ५ ॥

अभंग ६४ वा.

विठ्ठलनाम नाहीं मुखीं । त्यासी यम करी दुःखी. ॥ १ ॥
मोगर मारिती डोईवरी । वोढी असीपत्रावरी. ॥ २ ॥
जिंव्हा तोडीती सांडशी । आळंगविती तप्त खांबासी. ॥ ३ ॥
नेत्रीं दाभण रोवीती । कानीं सळया घालीती. ॥ ४ ॥

१. बळीच्या दारांत देव अक्षयी उभा आहे.

बुडवीती कुंभपाकीं । हातपाय मोडुन टाकी. ॥ ५ ॥
ऐसें दु:ख आहे जीवा । मुद्गल म्हणे भजा देवा. ॥ ६ ॥

अभंग ६५ वा.

गुरू शिष्या म्हणे ऐका । मज कांहीं द्यावा पैका. ॥ १ ॥
माझा बोध पद्महस्त । राज्यलक्ष्मी होय येत. ॥ २ ॥
अवघें ब्रह्म येकाकार । तेथें नाहीं लहान थोर. ॥ ३ ॥
एकाठायीं चारीवर्ण । पात्रीं करावें भोजन. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे येउन मेला । अंतीं लाभ नाहीं झाला. ॥ ५ ॥

अभंग ६६ वा.

विठ्ठल पाहे सर्वांभूतीं । तोचि येक हा परमार्थी. ॥ १ ॥
दुष्ट चांडाळ पुण्यशीळ । समयीं आला हरि केवळ. ॥ २ ॥
साधु राजा रंक दीन । अवघें पाहे तत्समान. ॥ ३ ॥
निरापेक्ष उदास वृत्ती । मुद्गल म्हणे मुख्य भक्ती. ॥ ४ ॥

अभंग ६७ वा.

विठ्ठल विठ्ठल म्हणा । तेणें चुकेल यमयातना. ॥ १ ॥
विठ्ठल भांडवल करीं । विठ्ठल नाम जोड बरी. ॥ २ ॥
विठ्ठल पाहे चराचरा । टाकुनि द्वैताचा पसारा. ॥ ३ ॥
सुखदु:ख विठ्ठल एक । मुद्गल म्हणे मागों भीक. ॥ ४ ॥

अभंग ६८ वा.

देव पुजी भक्त मूर्ती । भाव धरोनीयां चित्तीं. ॥ १ ॥
भक्त प्रल्हाद नारद । व्यास वाल्मिक रुक्मांगद. ॥ २ ॥
हरिश्चंद्र पाराशर । अंबऋषी सनत्कुमार. ॥ ३ ॥
बकदालभ्य शौनक । भरत विदुर गूहक. ॥ ४ ॥
उपमन्य बिभीषण । उद्धव अक्रुर हनुमान. ॥ ५ ॥
नित्यनेम भक्त पूजा । मुद्गल म्हणे अधोक्षजा. ॥ ६ ॥

अभंग ६९ वा.

नकळे देहाचा भरंवसा । केव्हां काळ घालील फांसा. ॥ १ ॥
सात वारां येके दिनीं । दिवस अथवा रजनी. ॥ २ ॥
प्राण न्यावयासीं काळ । कोणे घटके येइल मूळ. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे होइल रक्षा । म्हणोनी भजा सर्वसाक्षा. ॥ ४ ॥

### अभंग ७० वा.

नको पडूं मायाजाळीं । काळ नेईल अंतकाळीं. ॥ १ ॥
माता पिता दारा कुमर । अवघे सुखाचे सोयरे. ॥ २ ॥
सोडवीना काळा हातीं । आपुल्या स्वार्थासाठीं रडती. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे सावध होईं । निशीदिनीं विठ्ठल ध्याईं. ॥ ४ ॥

### अभंग ७१ वा.

आयुष्य जातें क्षणक्षणा । आतां सावध होईं मना ! ॥ १ ॥
न लाभे ऐसा देह । विचारोनी तूंची पाहें. ॥ २ ॥
नानापरी भोगुन योनी । कष्टि झालासी नीदानीं. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे माझ्या मना । नको सोडूं नारायणा. ॥ ४ ॥

### अभंग ७२ वा.

हरी माझा कैसा आहे । दास नुपेक्षीतो पाहे. ॥ १ ॥
जे जे शरण आले भावें । आपणासमान केले देवें. ॥ २ ॥
दास आवडे अंतरीं । लक्षुमीसी दूर करी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे नारायणा ! । कीर्तन गर्जती पुराणें. ॥ ४ ॥

### अभंग ७३ वा.

काम तेथें कुवासना । क्रोध तेथें निंदा जाणा. ॥ १ ॥
मदमत्सर असे जेथें । कुबुद्धी[ही] वसे तेथें ॥ २ ॥
अभीमान वीष आहे । मन दृश्य तेथें आहे. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे दंभवास । आशा तेथें येउन बैसे. ॥ ४ ॥

### अभंग ७४ वा.

साधुमुखीं देतां अन्न । कोटि पूर्वजां पावन. ॥ १ ॥
सुखें भक्षी एक शीत । घंटा वाजती अनंत. ॥ २ ॥
एक एक घेतां ग्रास । कोटियज्ञफल त्यास. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे साधू ध्याये । नारायणा सूख होये. ॥ ४ ॥

### अभंग ७५ वा.

चातक इच्छी मेघनीरा । कमळ पाहे त्या भास्करा. ॥ १ ॥
तैसि आम्हा विठ्ठल माय । न देखतां प्राण जाय. ॥ २ ॥
पतिव्रते जैसा कांत । लोभ्या आवडे हो ! वित्त. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे हरी ! । जीव जातो ये लवकरी. ॥ ४ ॥

### अभंग ७६ वा.

जन्मोनीयां उत्तम कुळीं । केली आयुष्याची होळी. ॥ १ ॥
पैका मेळवुनियां फार । पोशि दारा आणि कुमर. ॥ २ ॥
निंदा करी साधूसंता । देवधर्म नेणे कथा. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे भूमीभार । अंतीं भोगी नर्क घोर. ॥ ४ ॥

### अभंग ७७ वा.

संसार करी ठाकठोक । मुखीं नाम विठ्ठल येक. ॥ १ ॥
दया धर्म आवडे मना । प्रतीपाळ करी दीना. ॥ २ ॥
सर्वाभूतीं नम्र होय । संतां लोटांगणीं जाय. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे त्यास । वैकुंठीं केला वास. ॥ ४ ॥

### अभंग ७८ वा.

काय घेऊनीयां जोग । नट आणी जैसें सोंग. ॥ १ ॥
ब्रह्मज्ञान सांगे जनीं । शिश्नोदर पोसी दोनी. ॥ २ ॥
नीचाचिया जाय घरा । द्रव्यालागीं येरझारा. ॥ ३ ॥
निंदी स्तवी लोका । मुद्गल म्हणे गाढव देखा. ॥ ४ ॥

### अभंग ७९ वा.

तोचि येक संन्यास । करी साहा जणांचा नास. ॥ १ ॥
काम क्रोध हे वासना । जाळोनि टाकीली तृष्णा. ॥ २ ॥
लोभ दंभ हा मत्सर । आशा मारुनि केली चूर. ॥ ३ ॥
नाहिं उरला रज तम । मुद्गल म्हणे झाला राम. ॥ ४ ॥

### अभंग ८० वा.

मना लागे जैसा चाळा । तेचि स्वप्नीं देखे डोळा. ॥ १ ॥
अंतिं होय जैसी मती । प्राणि पावे तैसी गती. ॥ २ ॥
म्हणुनि भजा नारायणा । तोचि छंद लागो मना. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे सांगूं किती । धरा रखुमाईचा पती. ॥ ४ ॥

### अभंग ८१ वा.

परधन नको चित्तीं । परकांतेची संगती. ॥ १ ॥
चुकवी माझा घात । हेचि देवा पैं मागत. ॥ २ ॥
दुष्ट बुद्धी मन । नको देहीं अभीमान. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे पांडुरंगा! । तुझें नाम मज दे गा! ॥ ४ ॥

### अभंग ८२ वा.

देवा नाहीं अभीमान । झाला भिकारी वामन. ॥ १ ॥
थोरपण टाकुनि दिलें । गोपाळाचें उचिष्ट भक्षिलें. ॥ २ ॥
वनामध्यें गाई चारी । म्हणवी नंदाचा खीलारी. ॥ ३ ॥
नाचे गोपीकांच्या संगें । मुद्गल म्हणे भवभंग. ॥ ४ ॥

### अभंग ८३ वा.

एक विठ्ठल आमुचा धनी । त्याविण दुजा नाहीं कोणी. ॥ १ ॥
कोण लेखी थोर थोर । यम तेथें काय पामर. ॥ २ ॥
करूं कीर्तन प्रेमयुक्त । वैकुंठींचा मार्ग मुक्त. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे शरणागत । येती यमाचे हे दूत. ॥ ४ ॥

### अभंग ८४ वा.

गंगातिरीं धुतला खर । नव्हे अश्व जैसा बोर. ॥ १ ॥
तैसें चित्त नाहीं शुद्ध । तेथें करील काय बोध? ॥ २ ॥
सर्पा पाजिलें क्षीरघृत । काय होईल अमृत. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे रंभाफळ । उंट न सेवी केवळ. ॥ ४ ॥

### अभंग ८५ वा.

देव कैवारी निजभक्ता । रक्षीतसे नाम घेतां. ॥ १ ॥
गजेंद्रासी सोडविलें । प्रल्हादासी तारीयलें. ॥ २ ॥
द्रौपदीची लज्जा वारी । पांडवासी रक्षी हरी. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे भक्तासाठीं । कच्छ मच्छ जगजेठी. ॥ ४ ॥

### अभंग ८६ वा.

हरी कैसा हा कृपाळू । करी भक्तांचा सांभाळू ॥ १ ॥
ध्रुव मातेनें गांजिला । अढळपदीं तो स्थापिला. ॥ २ ॥
द्विजबाळ उपमन्य । क्षीरसिंधू दिला जाण. ॥ ३ ॥
कुब्जा वांकडी म्हातारी । केली रंभेहुनि सुंदरी. ॥ ४ ॥
मुद्गल म्हणे नारायणा! । केलें चिरंजिव बिभीषणा. ॥ ५ ॥

### अभंग ८७ वा.

एकलेंची जावें अंतीं । म्हणोनी भजा रमापती. ॥ १ ॥
स्त्री पुत्र घर वित्त । कोणि नाहीं संगें येत. ॥ २ ॥
खायासाठीं होती जमा । अंतीं नये कोणी कामा. ॥ ३ ॥
मुद्गल म्हणे मना ऐक । भजा रुक्मीणीनायक. ॥ ४ ॥

## ३. शिवरामस्वामीकृत

### अपराधस्तोत्र.[1][2]

(श्लोक.)

आधीं कर्मप्रसंगें करुनिच कलुषें, मातृकुक्षेस आलों,
विष्ठा मेध्यांत मूत्रीं बहुत कठिणता जाठराग्नीं जळालों. ।
जीं जीं तेथील दुःखें श्रमविति बहुशीं कोण बोले स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ १
बाळत्वें दुःख मोठें मलिन वपु सदा मातृदुग्धींच आशा,
नाहीं सामर्थ्य आंगीं करिति बहु मला मत्कुणादीक दंशा, ।
नाना रोगादि दुःखा रुदत विसरलों, मी तुला जी! स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ २
तारुण्यें प्रौढ झालों विषयविषधरीं दंशिलें मर्मसंधीं,
नाहीं केलें विवेका, सुतयुवतिधनीं लुब्धलों सौख्यबुद्धीं. ।
शैवी चिंता त्यजूनी, निज हृदयिं धरीं मान गर्वा, स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ३
वृद्धत्वीं इंद्रियांची गति मति चळली जे त्रितापेंकरूनी,
पापें रोगें वियोगें शरिरचि गळलें जाहली प्रौढ हानी. ।
मिथ्या मोहाभिलाषें भ्रमत मन, तुझें ध्यान ही न स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ४
स्मार्तें कर्में अशक्यें, परम कठिण तें श्रौतही आचराया,
वार्ता कैंची मला ते द्विजकुळविहित ब्रह्ममार्गा धराया? ।

१. या कवीविषयीं विशेष माहिती अनेककविकृत लघुकाव्यमाला–भाग १–पृष्ठ १८२ येथें दिली आहे ती जिज्ञासूंना पाहावी. २. हें प्रकरण श्रीमच्छंकराचार्यकृत अपराधस्तोत्राचें समश्लोकी भाषांतर आहे. ३. पापें. ४. ढेंकूण आदिकरून. ५. 'स्मरविषयफणीं' असा पाठ असेल तर बरा. स्मर मदन. फणीं–सर्पांनीं. ६. आधिभौतिक (पंचमहाभूतांच्या योगानें होणारा) जसा–भूकंप, अतिवृष्टि; आध्यात्मिक (मनाच्या क्षोभापासून अथवा शरीराच्या रोगापासून होणारा) जसा–खरूज, ताप; आणि आधिदैविक देवतांच्या क्षोभापासून होणारा) जसा–वीज पडणें–हे त्रिताप. ७. मोठी.

ाणों धर्मा म्हणावें श्रवणमन तुझें ध्यानही न स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ५
ा:स्नानें करूनी स्नपनविधिस म्यां नाणिलें गांगपाणी,
पूजेला बिल्वपत्रें बहुविध वनिंचीं साक्षपें तीं न आणीं. ।
ीता पद्ममाला सरसिं विकसिता, गंध पुष्प, स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ६
ज्यें दुग्धें मधूनें शत घट भरुनी स्नापिलें लिंग नाहीं,
नाना गंधादि लेपें कनकजकुसुमें पूजिलें म्यां न पाहीं. ।
ा कर्पूरदीपा, सरस न दिधलें भक्ष्य भोज्य, स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ७
तें ध्याना शिवाख्या, बहुत न दिधलें द्रव्य विप्रांस कांहीं,
शंभो! त्वद्बीजमंत्रें हुतवहवदनीं होमिलें हव्य नाहीं. ।
ातीरीं न केलें व्रत तप बहुसें रुद्रजाप्य स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ८
निःसंगशुद्धें त्रिगुणविरहितें मोह टाकोनि चित्तें,
नासाग्रें दृष्टियुक्तें, विदितबहुगुणें पाहिलें नाहिं तूतें. ।
मार्गी धरूनी विगतकलिमला न स्मरोनी स्वयंभो!
अन्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ ९
थानीं वसोनी प्रणवमय महा कुंभकें सूक्ष्म लक्षीं,
शांतीं स्वांतीं प्रलीनीं प्रकटित गहनीं ज्योतिरूपीं परोक्षीं. ।
ं ब्रह्मवाक्यीं सकल तनुगता न स्मरोनि स्वयंभो!
न्यायातें क्षमावें शिव शिव शिव भो! श्रीमहादेव शंभो! ॥ १०
ंद्रोद्भासितशेखरी स्मरहरी गंगाधरी शंकरी,
सर्पैर्शोभितकंठकर्णविवरी नेत्रोत्थ वैश्वानरी ।

ाकरितां. २. गंगेचें पाणी, गंगाजल. ३. सरोवरांत. ४. धोतऱ्याच्या फुलानें. धोत- शंकरास फार प्रिय आहे–अशी प्रसिद्धी आहे. या धत्तूराविषयीं 'धत्तूर धूर्ततरुणें- ये स्थाने पिशाचपतिना विनिवेशितोऽसि' अथवा 'महेशस्त्वां धत्ते शिरसि'–इ- तें सुप्रसिद्धच आहेत. ५. सत्व, रज आणि तम–हे त्रिगुण. ६. मल=पाप. ७. स- ं सुशोभित झाला आहे कंठ ज्याचा असा (शंकर).

हस्तीचर्मज सुंदरांबर धरी, त्रैलोक्यसारी हरी,
मोक्षाला करि चित्तवृत्ति अखिला प्रेमें नमूनी बरीं. ॥ ११

राजा! काय तुला तुरंग गजही द्रव्यें तुला काय? हीं,
कांता-गेह-सुपुत्र-मित्र-पशुहीं कार्यीं न तो काय हीं. ।
जाणोनी क्षणभंगुरें सकलही टाकीं मनापासुनी,
स्वार्थाला भज रे! सदा गुरुमुखें श्रीशंकरालागुनी. ॥ १२

हें आयुष्य विनाशतें प्रतिदिनीं तारुण्यही क्षीणलें,
गेलें जें वय तें न येतचि पुन्हां काळें जगा भक्षिलें. ।
लक्ष्मी तोयतरंगशी चपळ, हें जीवित्व वीजेपरी,
यालागीं शरणागता सदन तूं संरक्ष सर्वांपरी. ॥ १३

करचरणकृतें जें कर्म वा कायजें वा,
श्रवणनयनजें कीं मानसा दोष ठेवा. ।
उचितअनुचितांचा हा समूह क्षमावा,
जय जय करुणाब्धे! श्रीमहादेव देवा! ॥ १४

उद्धार हा सर्व जना कराया, संसारसिंधू सुलभें तराया. ।
स्तोत्राख्यनौका बहु थोर केली, जगीं उपेगा बहुतांसि आली. ॥ १५

## उपसंहार.

(श्लोक.)

सकळ गुरुवर श्रीशंकराचार्य यांचें
अभिनव **'अपराधस्तोत्र'** जें **शंकराचें**, ।
**क**लिमल अनुतेजें ज्याचिया आश्रयानें,
प्रगटचि **शिवरामें** बोलिलें प्राकृतानें. ॥ १६

---

१. विरा, घन. २. पाण्यावरील लहरीप्रमाणें क्षणभंगुर. ३. उपयोगास. ४. येथें 'प्राकृत' याचा अर्थ 'मराठी' असा आहे. **पं**तांनींही 'प्राकृतसंस्कृतमिश्रित' इत्यादि स्थलीं या शब्दाचा उपयोग 'मराठी' या अर्थानें केला आहे.

# ४. सोपानदेवकृत

## प्राकृतगीता.

(ओव्या.)

### अध्याय पहिला.

ॐ नमो जी श्रीभगवंता! । पुराणपुरुषा! अव्यक्ता! । परियसीं 'भगवद्गीता' । महापातकें हरतील. ॥ १ ॥ धृतराष्ट्रें प्रश्न केला । तो संजयो अनुवादला । कौरवदळभार देखिला । मग काय बोलिला अर्जुन. ॥ २ ॥ म्हणे, 'माझे सकळ सगोत्र बंधू । यांचा कैसा करूं वधू? । धर्मद्रोह महाबाधू । येणें राज्या चाड नाहीं.' ॥ ३ ॥ मोह उपजला पांडवा । धनुष्य ठेविला गांडिवा । म्हणे, 'अपराध गा! माधवा! । घडत घडत चुकला.' ॥ ४ ॥

### अध्याय दुसरा.

ऐकोन तयाचें बोलणें । काय म्हणे तो नारायण, । 'मारिजे मारिजे हे कोण । आत्मस्वरूप अविनाश. ॥ १ ॥ न तुटे न बुडे जळें । येतां जातांही नकळे । स्वेच्छे आपुलिये खेळे । माया वैष्णविचे निःसंग. ॥ २ ॥ यासी मी करितों, असें न म्हणें । अनादिसिद्ध हें कारण । फळउपदेश अकारण । मनीं संकल्प न धरीं पां. ॥ ३ ॥ न धरीं सुखदुःखाचा विचारू । अभंग भंगेना स्वरूप निर्धारू । ज्ञानदृष्टीं पाहे विचारू । पाप नाहीं युद्धाचें. ॥ ४ ॥

### अध्याय तिसरा.

पंचभूतांचा एकवटा । तें हें शरीर गा! सुभटा । कर्म करिती जे जे निष्ठा । ते तैसेंचि फळ पावती. ॥ १ ॥ जें जें रुचे या मना । तें तें पावती जीवभावना । यज्ञ करिती मनकामना । हें विपरीत ऐक पां. ॥ २ ॥ अनाश्रित कर्म करितां । कर्म करिती ते नव्हती । कर्मीं नाहीं फळ पावती । एक कल्पनेवांचूनी. ॥ ३ ॥ सत्व रज तम त्रिगुणी । अज्ञान प्रकृति गवसणी । ज्ञान लोपे द्वैतधसणी । कर्म इंद्रियांचें निःसंग.' ॥ ४ ॥

### अध्याय चौथा.

चक्रपाणी म्हणे, 'वीरा! । मज संख्या नाहीं अवतारा । अमित केलिया येरझारा । अर्जुनी नाहीं निमाले. ॥ १ ॥ मज ऐसेंच अवतरण । धर्म रक्षावया

१. अर्जुनाला. २. धसणें=जोरानें पुढें येणें.

कारण । माझ्रगतांप्रती पाळण । दुष्टां दुःख द्यावया. ॥ २ ॥ सहज देहीं कर्म निपजतां । तोंचि ब्रह्मार्पण करितां । आपुलें म्हणोनी न ठेवितां । यातायाती मग नाहीं. ॥ ३ ॥ तेणें तें सर्वस्वें श्रीजिव्हा (?) । तें मज एकांतचि अर्पिला । मज वेगळा नाहीं ठेविला । पुढती जन्मावया.' ॥ ४ ॥

## अध्याय पांचवा.

"जे कर्म करुनी मज अर्पिती । ते सायुज्यमित्र होती, । जे समसाम्य सर्वभूतीं । ते संन्यासी भागवत. ॥ १ ॥ इच्छा, दंभ, काम, क्रोध, । नाहीं हिंसअनुवाद । अनुभवी पावले स्वयंबोध । आत्मतत्वीं राहिले. ॥ २ ॥ चालणें कबोलणें । श्वासणें कां उश्वासणें । ग्रहणें अवग्रहणें । नाहींच कांहीं दंडिती ॥ ३ ॥ विचारी जे सांख्य योग । जीव जाती प्रकृतीसंग । आपआपणिय संग । सवेंचि झाला.' ॥ ४ ॥

## अध्याय सहावा.

गोविंद म्हणे, 'पंडुसुता! । योगी राहे पां निरुता,। जितेंद्रिय होय सर्वथा न करी चिंता देहाची. ॥ १ ॥ परतोनी आपणाकडे पाहीं । मनीं भीं तूं नको कांहीं । सदा स्वानुभवें राहीं । तरी ठायींच्या ठायीं निवसील. ॥ २ ॥ शब्द स्पर्श, रस, गंध, रूप, । यातें देखोनी तूं लप । दंभ, भेद प्रपंच करी निक्षेप भय नेदी आपणांत.' ॥ ३ ॥ धनंजयो म्हणे, 'हरी! । हें मन चंचल त्रिपुरारी!' । कृष्ण म्हणे, 'वैराग्य धरीं । तरी ठायींच्या ठायीं निवसील.' ॥ ४ ।

## अध्याय सातवा.

'अर्जुना! मी एकासी दुर्गम । मी एकासी होय सुगम । सांडीं सांडीं द्वैत भ्रम । आत्मारामो म्हणोनी. ॥ १ ॥ माझें साकारप्रकृतिभजन । पंचभूत आणी बुद्धी मन । मी सकळांचें जीवन । उत्पत्ती प्रळय हा मजमाजी. ॥ २ । दिव्य तेज अग्नि निश्चित । चंद्र सूर्य जेणें उजळत । ध्वनी आकाशीं उमटत ही ओळखी पैं माझी. ॥ ३ ॥ आनंदानंद लक्षण । माझें स्वरूप निर्वाण हेची माझी खूण । परब्रह्म तूंची होसी.' ॥ ४ ॥

## अध्याय आठवा.

'कां ब्रह्म निर्णयो कैसा? । देह जाता आपैसा । ....................
कैसेनी भेटी पाविजे?' ॥ १ ॥ देव म्हणे, 'सदा काळीं । मातें ध्याती हृदय कमळीं । त्यांसी भेट देईन अंतकाळीं । म्हणूनी मज स्मरावें. ॥ २ ॥ माझेनें

नांवें मज पावती । त्यांसी नाहीं पुनरावृत्ती । मजवांचोनी सुख चिंतिती । ते मज न पावती सर्वस्वें. ॥ ३ ॥ व्रत, दान, जप, तप, । जरी हे नकळे सोप । ते पाविजे येणें स्वरूप । गुरुकृपा झालिया.' ॥ ४ ॥

## अध्याय नववा.

'मी हे व्यापोनी आघव । माझें स्वरूप जगजीव । न लिंपे सुखाचें मी नांव । सह स्वभावचि असे. ॥ १ ॥ मज आधीन प्रकृती भूत । मजमाजी होत जात । संसार सांडितां कल्पित । मग होत न होत सहज. ॥ २ ॥ नाहीं मजवांचोनी दुजें । मजची कल्पोनी राहिजे । त्यांचे संसाराचें ओझें । मजवरी पडियेल. ॥ ३ ॥ पत्र, फळ, पुष्प, उदक । ते मज अर्पिती भाविक । आणिकही साहजीक । गुण, दोषही अर्पावे. ॥ ४ ॥

## अध्याय दहावा.

'मी विश्वंभर सृष्टी । तुम्हां वत्सालागीं किरीटी ! । या देवाचिया गोष्टी । मजहुनी काय वेगळिया.' ॥ १ ॥ देव म्हणे, 'मी एकला । विश्वंभर अवतरला । रिता ठाव नाहीं उरला । तेंची आतां सांगेन. ॥ २ ॥ मी विष्णु, रवि, शशि, सामवेदू । व्यास कपिलमुनि नारदू । गरुड, राम, अर्जुन, प्रऱ्हादू । अनंत नटवी स्वरूप. ॥ ३ ॥ म्हणोनी सकळां भूतीं येत जात । मीची साकार निश्चित । न धरी भिन्न भेद अद्वैत। सहज मुक्ती आहेसी.'॥४॥

## अध्याय अकरावा.

'मज उत्कंठ मनोरथ । मी निजरूप सकळार्थ.' । संतोषोनी म्हणे पार्थ । 'तें मज प्रत्यक्ष दावीं पां. ॥ १ ॥ वासुदेव म्हणे, 'पाहें । व्यक्ताव्यक्तीं भरला आहे । अनंत उपमा ऐसी नव्हे । दिसतें जें अद्भुत.' ॥ २ ॥ तें धनंजयास दाखविलें । तेणें त्रिवर्गत्र देखिलें । तें देखोनी मनीं निवलें । अनुवादू खुंटला. ॥ ३ ॥ कंप रोमांच उठिले । आनंदें वदन गदगदिलें । तदनंतरीं जें श्रुजिलें । तें अनुभवीये जाणती. ॥ ४ ॥

## अध्याय बारावा.

घातलें हो ! तंव दंडवत । उचलोनी अश्रु पुशित । म्हणे, 'हा सदैव भक्त । स्वानंदसुख लाधला.' ॥ १ ॥ यावरी म्हणे श्रीकृष्णू, । 'आणिक आहे प्रश्नू । भक्तयोगामधें विष्णू । न करी चिंता कासियाची. ॥ २ ॥ माझा धरिती नित्य नेम । मजचि अर्पती जाती धर्म । सहजचिलागीं करिती कर्म । मन इंद्रिया-

दिक. ॥ ३ ॥ कीं ते एक पुण्यें पाप अधर्म । मजहुनी नेणती विषम । सकळ जीव मजसम । ध्याती सप्रेम साकार.' ॥ ४ ॥

## अध्याय तेरावा.

'वर्म मागे मधुसूदना! । जें हें नकळे माझिया मना । अनुभवितां अनुमाना । आलिया काय करावें? ॥ १ ॥ हें शरीर अनित्य जाण । यासी वागविता कवण? । ऐसा भ्रांतीचा शीण । हरीं माझा केशवा!' ॥२॥ 'ऐक पांडुनंदना! । हें शरीर पांचभूतीक जाणा । मी आत्मयांत जाणा । जगजीवन नाम माझेनी. ॥ ३ ॥ माझे जीव तेथें शिव । हे गुरुमुखें पाहा अनुभव' । इतुकेन बुझावला पांडव । अनुभव देखिला. ॥ ४ ॥

## अध्याय चौदावा.

'पुढती ऐक पां निवृत्ती । मनीं पावला परम शांती । सकळ जीव योनी उत्पत्ती । मीच देही निज आत्मा. ॥ १ ॥ तिहीं गुणीं प्रकृती उपजे । सत्व उत्तम गती पाविजे । रज मध्येंची मोहिजे । तामस अधोगती. ॥ २ ॥ त्रिगुण तरी अनादिसिद्ध । येणेंचि शरीर झालें बद्ध । त्रिगुण विविध शब्द । गुणांचा द्रष्टा आहेसी. ॥ ३ ॥ म्हणोनी निर्विकार होय पां । संग अधमाचा सांडीं पां । तरी तत्वविचार हा सोपा । सहजमुक्त आहेसी.' ॥ ४ ॥

## अध्याय पंधरावा.

'आणिक एक सांगेन तुज । सकळ भोग भोगणें मज । माझिया स्वरूपाचा तेज । त्रैलोकीं पाहें पां. ॥ १ ॥ पापपुण्यें घडे देहीं । ते मी करितोंची पाही । मजवांचोनी कांहीं नाहीं । खरें चोखट माझेनी. ॥ २ ॥ माझेनी दिव्य हुताशन । शुद्ध इंद्रियें मूर्ति मदन । अष्टही भोग भोक्ता जाण । मीच साकार निराकार. ॥ ३ ॥ सकळ माझाची आकार । म्हणोनी आपणांत विसर । सर्वां देहीं विश्वाकार । मीच होवोनी राहें पां.' ॥ ४ ॥

## अध्याय सोळावा.

'नेणिया न धरितां जन्ममरणा । म्हणसी अधोगती कवणा । तरी प्रकृती याकारणा । असोनियां अलिप्त. ॥ १ ॥ मद लिंग देह जाण । कल्पना आस हेंचि खूण । मजवांचोनी दुर्जेपण । गर्भवासा यावया. ॥ २ ॥ यालागीं रचिला वेद । चालावया विधिनिषेध । आचार धर्म यातीभेद । सकळीं कर्मै न सांडावीं. ॥ ३ ॥ जंव जाणितलें नाहीं ब्रह्म । तंवचि लजील क्रियाकर्म । तो धर्म चुकलिया वर्म । पाखांडी पडियेला.' ॥ ४ ॥

## अध्याय सतरावा.

अर्जुन म्हणे, 'सांगावें । तेदीं काय बोलिला देव? । जे नेणोनी भजती भाव । त्यांसी काय फळ असे?' ॥ १ ॥ 'ऐसा सात्विक जे भजती । देवलोका जाती । दंभ प्रपंच भजन करिती । ते होती दैत्य राक्षस.' ॥२॥ धनंजय म्हणे, 'गा हरी! । हें मन चंचळ आहे भारी.' । कृष्ण म्हणे, 'वैराग्य धरी । तरी ठायींच्या ठायीं. ॥३॥ क्रोध तामस जे भजती । ते प्रत्यक्ष पिशाच्च होती । काया वाचा मनें भजती । तेची ते पहा उपदेशी. ॥ ४ ॥ म्हणोनी वेदाचें तोंड धरी । मग न करावें तेंही करी । बोभाट असो लोकव्यवहारीं । अभ्यंतरीं कळों नेदी.' ॥ ५ ॥

## अध्याय अठरावा.

'कर्म करोनी सकळी । आणि कल्पवेना कर्म फळीं । हेंचि भजें नवोग (?) निर्मळी । हा उपदेश ऐक पां. ॥ १ ॥ माझी भक्ती धरीं । चिद्वैत तूं धरीं । सर्वांभूतीं नमस्कारीं । अष्टभावें निवेदी.' ॥ २ ॥ पार्थ म्हणे, 'परमानंदा ! । विसरलों जी भिन्नभेदा । धाकुटपणींच्या अपराधा । क्षमा कीजे स्वामिया!' ॥ ३ ॥ म्हणोनी घातलें लोटांगण । आनंद आश्वर पुसोन । उचलोनी दिधलें आलिंगन । म्हणे, 'निवालों स्वामिया!' ॥ ४ ॥

## उपसंहार.

सकल शास्त्रांचें सार । उपनिषदांचें गव्हार (?) । हेंचि साकार निराकार । सगुण निर्गुण पैं. ॥ १ ॥ सकल आगमचि कथिलें । कृष्णें अर्जुनासी उपदेशिलें । थोडियाचें बहुत प्रकाशिलें । दिसे अध्यात्म निभ्रांत. ॥ २ ॥ मेरूमांदाराचेनि तुकें । जें हें केलीं महापातकें । तितुकीं जाती निमिष एकें । आत्मज्ञान जाहलिया. ॥ ३ ॥ इति श्रीप्राकृतगीता । सोपानदेव विनविता । ऐसी हे अध्यात्मगीता । श्रीकृष्ण विनविता पांडवांसी. ॥ ४ ॥

---

## ५. सोपानदेवकृत[१]

### पंचीकरण.

(ओंव्या.)

ॐ नमो गणा! अव्यक्ता । सुप्रसन्न व्हावें भक्ता। जे निजस्थिति विरक्ता । त्याचा अर्थ बोलवा. ॥ १ ॥ आदि गणपति तो निरंजन । त्याचें नाम ऊर्ध्व-

---

१. सोपानदेव हे प्रसिद्ध 'ज्ञानेश्वरी'कार ज्ञानेश्वर महाराज यांचे कनिष्ठ बंधु. यांचा जन्म शके ११९६ चे सुमारास जाहला. यांची समाधी सासवडास आहे असें कळतें. समाधि-

शून्य । जीवेश्वरीं मध्यशून्य । हें श्रोतीं जाणावें. ॥ २ ॥ मूळ माया ते सरस्वती । ती जाणावी निजप्रकृति । अर्धशून्य ते माया म्हणति । आत्मज्ञाते सज्ञान. ॥ ३ ॥ सर्व शून्य तो हा देहो । पांचवें शून्य प्रपंच निःसंदेहो । वदों सत्वरजतम त्रिगुण पाहा हो! । विस्तारेंसी. ॥ ४ ॥ रजोगुण ब्रह्मा जाण । सत्व विष्णुनारायण । तमोगुण प्रमाण । रुद्र देखा. ॥ ५ ॥ तमोगुणें आकाश जन्मलें । आकाशें वायूतें व्यापिलें । वायूपासाव जाहलें । अग्निरूप. ॥ ६ ॥ अग्निपासाव जीवन जाहलें । जीवनें पृथ्वीतें व्यापिलें । पंचभूतिक विस्तारलें । ऐशिया परी जाण पें. ॥ ७ ॥ पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, । पंचभूतें ज्ञाली सावास । पंच विषय हे विशेष । आहाति कैसे. ॥ ८ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, । हे पंच विषय प्रसिद्ध. । आतां सांगेन यांचा भेद । श्रोत्या जनांसी. ॥ ९ ॥ शब्द आकाशीचा जाण । स्पर्श वायूसी प्रमाण । रस आप संपूर्ण । रूप गंध पृथ्वी. ॥ १० ॥ पंच विषय येणें प्रमाणें । पंच भूतांचे पंचवीस गुण । त्यांचें करूं निरूपण । श्रोतीं परिसावें. ॥ ११ ॥ पृथ्वीचे पांच गुण । अस्थि नाडी त्वचा केश जाण । आपाचे पांच गुण । लाळ शुक्र मूत्र शोणित श्लेष्मा. ॥ १२ ॥ तेजाचे पांच गुण । क्षुधा निद्रा आलस्य उद्वेग मैथुन । वायूचे पांच गुण । आकुंचन चलन वलन स्पर्शन निरोधन. ॥ १३ ॥ लज्जा मोहो राग शांति भय । हे गुण आकाशाचे होय । याच ज्ञानाला स्थूल देह । जाणिजे पें गा! ॥ १४ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । हें देहचतुष्टय जाण । यांचेंही निरूपण । करूं आतां. ॥ १५ ॥ स्थूलदेह साकार । तेथें षट्चक्र मनोहर । पहिलें चक्र मूलाधार । गणेश वर्ते ते ठायीं. ॥ १६ ॥ तेथें चारी मातृका । रिद्धि सिद्धि शांति देखा । इतुका विस्तार आइका । आधारचक्राचा. ॥ १७ ॥ 'वं शं' दुसरें चक्र स्वाधिष्ठान । तेथें ब्रह्मा देव जाण । सावित्रि शक्ति आपण । जाणावी स्वाधिष्ठानीं. ॥ १८ ॥ 'वं लं' तिसरें मणिपूर नाभिस्थान । तेथें विष्णु देव जाण । लक्ष्मी शक्ति आपण । दश मातृका पाकोळिका. ॥ १९ ॥ 'डं फं' नीलोत्पल रंग त्याचा । नाद दश आंगुळांचा । एवं प्रकार तयाचा । तें मणिपूर जाणावें. ॥ २० ॥ चौथें

---

कालनिर्णय बरोबर समजत नाहीं. २. पंचीकरण म्हणजे सूक्ष्म किंवा शुद्ध (पंच) भूतांपैकीं प्रत्येक भूतांत, इतर चार भूतांचे कांहीं नियमित अंश घालून तयार केलेलें मिश्रण. [विद्यारण्यकृत सार्थ पंचदशी–तत्त्वविवेक–प्रथम प्रकरण पहा.] ३. मायारहित.

१. जीवात्म्यामध्यें. २. आहेत. ३. रेत. ४. रक्त. ५. कफ. ६. लिंगशरीर. ७. वर्ण. ८. या मूलाधार चक्राच्या ठायीं.

चक्र अनुहात[1] । तेथें रुद्र आदिदैवत । द्वादशांगुल अलिशोभित[2] । द्वादश दळ. ॥ २१ ॥ रंग श्यामवर्ण । पार्वती शक्ती जाण । सद्गुरू अधिष्ठान । मोक्षदाता. ॥ २२ ॥ 'कं ठं' पांचवें चक्र विशुद्ध । कंठस्थान प्रसिद्ध । षोडश जाण एवंविध । चक्र पांचवें. ॥ २३ ॥ 'अं अः' सहावें अग्निचक्र । दोनी पाकोळिया विचित्र । हंस परिसा पवित्र । नांदे तेथें. ॥ २४ ॥ 'हं क्षं' सातवें सहस्रदळ[3] । तेथें सद्गुरु आत्माराम केवळ । सूक्ष्म पवित्र सुढाळ । ज्योतिर्मय तें असे. ॥ २५ ॥ स्थूलदेह पीतवर्ण । रक्तमिश्रित औटहातप्रमाण[4] । लिंगदेह अंगुष्ठप्रमाण । श्वेतरक्तमिश्रित. ॥ २६ ॥ तिसरें देह कारण । पेर्वार्ध[5] त्याचें प्रमाण । तेथें अंधकार संपूर्ण । पडला असे. ॥ २७ ॥ मसुरीदलप्रमाण[6] । चौथें देह महाकारण । त्याचा असे सुनीलवर्ण । दैवत महामाया. ॥ २८ ॥ परम सूक्ष्म बिंदुस्वरूप । ज्योतिर्मय निर्गुण रूप । सद्गुरुकृपें तंव लक्षावें तें स्वरूप । ज्योतिर्मय. ॥ २९ ॥ इडा पिंगला सुषुम्ना । या त्रिकूटी जाणा । त्यांच्या सांगों अनंत खुणा । श्रोतयां जनांप्रती. ॥ ३० ॥ गंगा यमुना सरस्वती । इडा पिंगला सुषुम्ना मिळती । तोचि त्रिवेणीसंगम म्हणती । आत्मज्ञानें सज्ञान. ॥ ३१ ॥ ऐसा त्रिवेणीसंगम जाण । तेथें मनेंशीं करावें शुद्ध स्नान । शुद्ध जाहलिया निधान । मग दिसे डोळां. ॥ ३२ ॥ प्राण अपान व्यान उदान समान । हे जाणावे पांच प्राण । कोणाचें कवण स्थान । सावधान परिसावें. ॥ ३३ ॥ अपान असे गुदस्थानीं । समान वसे नाभिस्थानीं । व्यान सर्व फिरोनि । घस्त[7] करी. ॥ ३४ ॥ उदान असे कंठदेशीं । मुख्य प्राण नासिकीं । पंच प्राणांची स्थिति । ऐशी जाणिजे. ॥ ३५ ॥ आतां सांगों चारी वाचा । परा पश्यंती मध्यमा वैखरी यांचा । निवाडा करोनियां साचा । सांगीतला पाहिजे. ॥ ३६ ॥ स्थूलदेहीं वाचा वैखरी । लिंगदेहीं मध्यमा वैखरी । कारणीं पश्यंती निर्धारीं । महाकारणीं परा वाचा. ॥ ३७ ॥ अहं[8], बुद्धि, चित्त, अंतःकरण । हें मनाचें चतुष्टय जाण । यावरी ॐकाराची खुण । सांगेन आतां तुम्ही ऐका. ॥ ३८ ॥ अकार उकार मकार । चौथी अर्ध मात्रा पंचम व्यंजन साचार । एवं घडला निर्धार । सत्यत्वें पैं जाणावा. ॥ ३९ ॥ अकार ब्रह्मा आपण । उकार विष्णुनारायण । मकार

---

१. अनाहत. ज्यावर आघात झाला नाहीं तें. २ भ्रमरांमुळें सुंदर दिसणारें. ३. ब्रह्मरंध्र तालुस्थान. ४. साडेतीन हात. ५. बोटाच्या अर्ध्या पेराइतकें. ६. मसूरीच्या डाळीएवढें. ७. पाहारा. ८. अहंकार.

रुद्र जाण । सूक्ष्ममाया ते अर्धमातृका. ॥ ४० ॥ माथां उरलें जें व्यंजन तें जाणावें निरंजन । आतां अवस्थांची खुण । सांगतों पैं तुम्हीं ऐका. ॥ ४१ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती तुर्या । या चारी अवस्था गुणवर्या । आल्या; स्थूलदेहाच्या कार्या । जागृति आली. ॥ ४२ ॥ लिंगदेहीं स्वप्न पाहे । कारण मूढ सुषुप्ती राहे । तिन्हींची साक्षिणी आहे । महाकारण तूर्या. ॥ ४३ ॥ आतां त्रिगुणांच्या तीन शक्ति । ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, । इच्छाशक्ति, यांची त्रिगुणीं व्याप्ति । असते सबळत्वें. ॥ ४४ ॥ दशेंद्रियांचा निर्धारू आहे । पांच इंद्रियें विचारुनी पाहें । कर्मेंद्रियें तीं हे । परिसलीं पाहिजेतीं. ॥ ४५ ॥ चक्षु, श्रोत्र, जिव्हा, घ्राण, वाचा । ज्ञानेंद्रियपंचकाचा । आतां विचार कर्मेंद्रियांचा । केला पाहिजे. ॥ ४६ ॥ वाचा पाणी पाद शिश्न गुद । हीं कर्मेंद्रियें निश्चित । त्रिपुटीचा वृत्तांत । सांगों आतां. ॥ ४७ ॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञान । ध्येय ध्याता ध्यान । दृश्य द्रष्टा दर्शन । यातें म्हणती त्रिपुटी. ॥ ४८ ॥ सलोकता समीपता सरूपता । चौथी मुक्ती सायुज्यता । श्रोतीं जाणाव्या तत्वतां । मुक्ति चारी. ॥ ४९ ॥ काम, क्रोध, मद, मत्सर, लोभ, । हे तंव जीवेश्वरीं स्वयंभ । यांचा मानूं नये क्षोभ । यांतें गिळिलें पाहिजे. ॥ ५० ॥ विक्षेपता गतायाता । सुनिष्टता सुलीनता । यांच्या भूमिका तत्वतां । अनुभवाव्या हो ! ॥ ५१ ॥ ऐसें हें पंचीकरण । सारांश महावाक्य जाण । हें विचारितां सज्ञान । आत्मज्ञान दृढ होय. ॥ ५२ ॥ षट्चक्रांची गणती । इति श्रीमहावाक्यसमाप्ति । सद्गुरुकृपें करितां स्फूर्ति । शांति लाभेल पैं गा ! ॥ ५३ ॥ त्याचा प्रसाद कथिला । पंचीकरणाचा सारांश काढिला । श्रोतीं सज्ञानीं वंदिला । अनुभवसिद्ध जो. ॥ ५४ ॥ ऐका मुद्रा चारी । खेचरी भूचरी चराचरी । चौथी जाण अगोचरी । त्या चारी मुद्रा जाण पां. ॥ ५५ ॥ आतां ऐका पांचवी निर्गुणेश्वरी । सहावी ते षण्मुखी निर्धारीं । सद्गुरुकृपें निरंतरीं । परब्रह्मस्वरूप पूर्ण होय. ॥ ५६ ॥ सोपान करी विनवणी । कृपा कीजे संतसज्जनीं । वेदोक्त श्रीगुरूची वाणी । श्रोता वक्ता तोचि पैं. ॥ ५७ ॥ तयावीण दुजें नाहीं । तोचि बिंबला सर्वांठायीं । देहातीत असे पाहीं । जैसा घटीं रवि दिसे. ॥ ५८ ॥ जो निजसुखस्वरूपदाता । तोचि सद्गुरू जाण तत्वता । तोचि परमात्मा मानूनि भजतां । लाभे मोक्षपद त्यासी. ॥ ५९ ॥ इति श्रीपंचीकरण । ग्रंथ समाप्त करी सोपान । हें ऐकोनि ज्ञानदेव आपण । प्रेमें वोसंडले. ॥ ६० ॥ निवृत्ति मुक्ताई म्हणे

१. हात. २. अनेककविकृत लघुकाव्यमाला—भाग २ पृष्ठ ५९ टीप ३ पहा. ३. अनेककविकृत लघुकाव्यमाला—भाग २ पृष्ठ १२२ टीप १ पहा.

धन्य । सोलींवें ज्ञान पूर्ण । परब्रह्म निरोपिलें उर्वरीत जाण । बोलणें येथुनी खुंटलें. ॥ ६१ ॥ इति श्रीपंचीकरण ग्रंथ । ऐका संत साधू समर्थ । महावाक्यमथितार्थ । यथामति निरोपिला. ॥ ६२ ॥

---

## ६. नारायणबोवाकृत

### दत्ताष्टक.

(श्लोक.)

ज्या संगतीनेंच विराग झाला । मनोदरीचा जडभाग गेला ।
साक्षात्परात्मा मज भेटवीला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ १
सद्योगपंथें घरिं आणियेलें । अंगेंच मातें परब्रह्म केलें ।
प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ २
चराचरीं व्यापकता जयाची । अखंड भेटी मजला तयाची ।
परंपदीं संगम पूर्ण झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ ३
जो सर्वदा गुप्त वनांत वागे । प्रसन्न भक्तां निजबोध सांगे ।
वंद्यभक्तिभावाकरितां भुकेला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ ४
अनंत माझे अपराध कोटी । मानी मनीं घालुनि सर्व पोटीं ।
प्रबोध करितां श्रम फार झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥५
कांहीं मला सेवन ही न झालें । तथापि तेणें मज उद्धरीलें ।
आतां तरी अर्पिन प्राण त्याला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ ६
माझ्या अहंभाव असे शरीरीं । तथापि तो सद्गुरु अंगिकारी ।
नाहीं मनीं अल्प विकार ज्याला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥७
आतां कसा मी उपकार फेडूं । हा देह ओंवाळुनि दूर सोडूं ।
म्यां एक भावें प्रणिपात केला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ ८
जया वर्णितां वानिती वेदवाणी । म्हणे 'नेति नेति' तिला जे दुरोनी ।

१ शुद्ध. २. बाकी राहिलेलें. ३. अनेककविकृत लघुकाव्यमाला—भाग २ पृष्ठ ८२ टीप ६ पहा. ४. वैराग्य, विरक्ति. ५. मन हीच दरी (गुहा) तींतील जडभाग (दुर्वासना) गेला (नाहींसा झाला). ६. अरण्यांत. कारण एकांतवास साधुजनांना फार प्रिय असतो. ७. नवविधा भक्तीपैकीं 'वंदन' हा जो सहावा प्रकार त्याविषयीं फार भुकेलेला असा. नवविधाभक्ति त्या होतः—'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥'. ८. माझ्या हातून कांहीं सेवाही घडली नाहीं. ९. मीपणा, गर्व.

नव्हे अंत ना पार ज्याच्या रुपाला। विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ९
जो साधुच्या अंकित जीव झाला। त्याला असे भाव निरंजनाला।
नारायणाचा भ्रम दूर केला। विसरूं कसा मी गुरुपादुकांला? ॥ १०

---

## ७. रघुनाथकविकृत[1]

### शुकाष्टक.[2]

(अभंग.)

अज्ञान हेंची तिमिरें। जगीं अंध झाले सारे. ॥ १
अज्ञान अंधःकार जावा। तरि गुरु ध्यानीं ध्यावा. ॥ २
गुरुकृपा हे अंजन। ज्ञान शलाका ही जाण. ॥ ३
अंजितांची करी गुण। दिव्यचक्षू ततक्षण[3]. ॥ ४
गुरुसेवा ज्ञानसिंधु। रघुनाथ दीनबंधु. ॥ ५

अज्ञानाचा अंधःकार। ज्ञानांजनें जाय दूर. ॥ १
ज्ञानदृष्टी गुरुनाथ। दासा देतसे सामर्थ्य. ॥ २
अनन्यभावें शरण। गुरुपदीं लोटांगण. ॥ ३
गुरु श्रेष्ठ सर्वाधीक। गुरु धन्य तिन्ही लोक. ॥ ४
करी अनाथ सनाथ। दीनबंधु रघुनाथ. ॥ ५

व्यासपुत्र शुक[4] बोलिला अष्टक। जना प्रबोधक ज्ञानमार्ग. ॥ १
भेदाभेद झाले ज्याचे ते गळीत। पुण्य पाप कृत नसे मनीं. ॥ २
मायामोहादिक झाले ज्याचे नष्ट। संदेह तो स्पष्ट गेला सर्व. ॥ ३
शब्दातीत झाला त्रिगुणरहीत। तत्वबोध प्राप्त पूर्ण जया. ॥ ४
निस्त्रैगुण्य[5] पंथ विचरतां त्याला। विधीनिषेधाला स्पर्शेना तो. ॥ ५
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी। जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ६

---

१. ह्या कवीविषयीं कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. २. हें प्रकरण श्रीमद्भागवत–स्कंध २ अध्याय २ याचे आधारें रचिलें आहे. ३. तत्क्षण (डोळ्यांत घालतांच). ४. शुक हा कृष्णद्वैपायन व्यासाचा पुत्र. घृताची नामक अप्सरा शुकीचें रूप घेऊन पृथ्वीवर संचार करीत असतां, तिचें सौंदर्य पाहून व्यासाचें रेत स्खलन झालें आणि त्यापासून शुकाचा जन्म झाला–अशी कथा आहे. ५. सत्व, रज आणि तम हे त्रिगुण.

सकळ देहांत एक आत्मा पूर्ण । अंतर्बाह्य जाण प्रकाशित. ॥ १
स्वात्मा परमात्मा एकभाव ज्याचा । अचल वृत्तीचा तोची ज्ञानी. ॥ २
घटीं जळाआंत दिसती 'अनेक । रवीबिंब एक स्वर्गीं असे. ॥ ३
कारणपरत्वें दिसे रूप भिन्न । रवीबिंब जाण जैसें घटीं. ॥ ४
त्रिगुणरहित चाले नित्यविधी । तो विधीनिषेधीं प्रवर्तेना. ॥ ५
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ६

जैसें शुद्ध हेम केले अलंकार । करणी साचार भिन्न दिसे. ॥ १
क्षीरीमध्यें क्षीर मिळे एकपणीं । त्या समरसोनी तोय जैसें. ॥ २
एवं सर्वभावें समरस सदा । त्वंपद तत्पदा अभिन्नत्वें. ॥ ३
तोय समरस सर्व रसांतरीं । बाह्य अभ्यंतरीं समदृष्टी. ॥ ४
निस्त्रैगुण्यपर जयाचा संबंध । त्या विधीनिषेध कांहीं नसे. ॥ ५
ऐसीया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ६

सकळ हें विश्व चवदा भूवन । समरस जाण सर्वांभूतीं. ॥ १
ऊर्वी[1] आपानल[2] अनील[3] आकाश । जीवीं समरस अभिन्न ते. ॥ २
जैसें क्षीरतोय मिळे समभाव । जळांत सैंधव समरसें. ॥ ३
त्रिगुणासि पर जयालागीं बोध । विधी वा निषेध काय तया ? ॥ ४
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ५

सानथोर नद्या मिळाल्या सागरीं । सर्व भूतांतरीं जीवदशा. ॥ १
ऐसा भेदातीत परि लयगत । सच्चिदानंदांत समरसी. ॥ २
सच्चितस्वरूपीं सदा समरस । नाहीं देहभास पळमात्र. ॥ ३
त्रिगुणापर तो सदा रूपीं बोध । विधी वा निषेध तेथें कैंचा ? ॥ ४
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ५

दृष्टी ज्याची सदा लीन पूर्ण पदीं । स्वात्मरूपबोधीं निरंतर. ॥ १
आत्मवत सर्व अंतर्बहिःस्थित । सकळ भूतांत समजणें. ॥ २
स्वरूपीं प्रकाश असे सदोदित । तोचि देहातीत जीवन्मुक्त. ॥ ३

---

१. पृथ्वी. २. आप+अनल=पाणी+अग्नि. ३. वायु.

त्रिगुणीं निराळा नसे कर्मबंध । विधी वा निषेध सम जया. ॥ ४
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ५

कार्याकार्य कर्म घडे स्वाभाविक । संकल्पीं विन्मुख भाव नसे. ॥ १
जीवन्मुक्तस्थिती संकल्पाचा नाश । दग्धवस्त्राभास तद्वत तो. ॥ २
ऐसा देह आत्मा वेगळा जाणोनी । तोचि मुक्त[1] प्राणी निःसंशय. ॥ ३
त्रिगुणाबाहेर नसे कांहीं बंध । विधी वा निषेध कोण तया? ॥ ४
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ५

'कस्त्वं'[2] 'कोऽहं'[3] नेणे कोण होणें जाणें । भवभय[4] म्हणे कःपदार्थ. ॥ १
आपआपणासी गगनसदृश । पूर्णतत्व प्रकाश रममाण. ॥ २
आनंदांत मग्न समरस घन । बाह्यांतरीं जाण प्रकाशित. ॥ ३
त्रिगुणापर तो मग काय बंध । विधी वा निषेध भय नसे. ॥ ४
ऐसिया वृत्तीनें असे कोणी प्राणी । जावें लोटांगणीं रघुनाथा. ॥ ५

सत्य सत्य वाचा परम अमृत । सुखरूप शांत ज्ञानमार्ग. ॥ १
मायारण्यमळ[5] जाळोनि निर्मळ । शांति दीपमाळ कल्याणप्रद. ॥ २
तेजोरूप जाण निगमसदन । शुकाचें वचन प्रमाण हें. ॥ ३
पढे प्रातःकाळीं भक्ती प्रेमरंग । निर्वाण तो मार्ग प्राप्त तया. ॥ ४
दयें केला शुकें जगाप्रति बोध । तोडी भवबंध रघुनाथा. ॥ ५

**'शुकाष्टक'** हें गीर्वाण । वेदांतार्थ परिपूर्ण. ॥ १
**शुकाचार्य** गुरूमूर्ती । कृपें दीधली ती स्फूर्ती. ॥ २
मतिहीन बुद्धीहीन । नाहीं अनुभवज्ञान. ॥ ३
गुरु समर्थ बोलवीता । नव्हे बुद्धीची कवीता. ॥ ४
दश अभंगीं कथन । सार **शुकाचें** भाषण. ॥ ५
सज्जनासी श्रुत केलें । **रघुनाथकृपाबळें.** ॥ ६

---

१. 'मुक्त' कोणाला म्हणावें हें श्रीमद्भगवद्गीता–अध्याय ५ श्लोक २७–२८ यांत सांगितलेलें आहे. २. तूं कोण. ३. मी कोण. ४. संसाराचें भय. ५. मायारूपी अरण्यांतील मळ (पाप).

## ८. [1]मध्वनाथविरचित

## वाराणसीस्तुति.

(श्लोक.)

वाराणसीपुरपते भज विश्वनाथा! । माझा प्रणाम तुमच्या चरणास आतां ।
मी मागतों सहज पावन एक भिक्षा । द्यावी मला चरित शांभवि वेददीक्षा. ॥ १
श्रीबिंदुमाधव तुला स्मरतां स्वभावें । संसारसिंधु मग बिंदु तव प्रभावें ।
माझी कृपानिधि! कधीं न करीं उपेक्षा । ठेवीं मला निजपदांबुजिं, हे अपेक्षा. २
श्रीधुंडिराज गणनाथ गजानना रे! । [2]संसारपिंपळ समूळ विनाशना रे! ।
तूं देव सुंदर धुरंधर विघ्नहर्ता । वाराणसीस मज येथुनि[3] ने समर्था! ॥ ३
मी प्रार्थना करितसें तुज दंडपाणी! । माझे उदंड अपराध मनासि नाणीं ।
श्रीभैरवा! चुकविं रौरवयातना रे! । वाराणसीस मज ठेविं सनातना रे! ॥ ४
तूं स्वामिकार्तिक उमापतिनंदना रे! । सेनापती[4] करितसें तुज वंदना रे! ।
आनंद फार करितोसि महा स्मशानीं । त्वां मारिले असुर घाव दिला निशाणीं. ॥ ५
वाराणसी त्रिभुवनेश्वरराजधानी । भागीरथीतटिं जगद्गुरुसंनिधानीं ।
जे माणसास मरणीं गति दे निदानीं[5] । ते माय धन्य करि मुक्त पदाभिमानी. ॥ ६
भागीरथी! तव तटीं तनु हे पडावी । [6]सायुज्यमुक्तपदवी मज[7] सांपडावी ।
हे वासना हृदयिं उत्कट वाहताहे । धाडीं निरोप, घरिं वाटचि पाहताहे. ॥ ७
जे मानिली जननि केशव शांभवांनीं, । जे पूजिली मुनिजनीं निज वैभवांनीं, ।
ते सांडुनी इतर लोक कदंबपाणी! । अन्याय मी करितसें वरदे भवानी! ॥ ८
तूझा अगाध महिमा मुनि वर्णिती गे! । तूं भेट मायबहिणी मणिकर्णिके गे! ।
तूझ्या जळेंकरुनियां तनु हे भिजो गे! । संसारताप अवघा मनिं हा विझो गे! ॥ ९
श्रीमध्वनाथ लिखितार्थ अपूर्व वर्णी । विश्वेश्वरा! परिस सादर सर्व कर्णी ।
धाडूनि मूळ मज येथुनि[9] ने प्रयागा । दावीं गया, न करिं विष्णुपदा वियोगा. ॥ १०

---

१. ह्या प्रसिद्ध साधुकवीच्या उपदेशावरून अमृतरायकवि यांस उपरति झाली. हा साधु कान्होजी आंग्र्याच्या वेळेस होऊन गेला असें म्हणतात. ह्याचीं बरींच पदें प्रसिद्ध आहेत. २. भगवद्गीतेंतही संसारास अश्वत्थवृक्षाची (पिंपळाची) उपमा दिलेली आहे [गीता–अध्याय १५ श्लोक १ पहा.] 'संसारपादप' असा अन्य पाठ आहे. ३. 'येउनि' असा अन्य पाठ आहे. ४. कार्तिकस्वामी हा सर्व देवांचा सेनापति होय. ५. अंतकाळीं. ६. उपास्य देवतेमध्यें (ब्रह्मीं) मिळून लीन होण्याची स्थिति. ७. 'मजला मिळावी' असा अन्य पाठ आहे. ८. बोलावणें. ९. 'येउन' असा अन्य पाठ.

तूझा अगाध महिमा कथिला [1]महंतीं । तेणेंकरूनि हृदिं वाटत फार [2]खेंती ।
तारील कोण मजला तुजवीण अंतीं ? । हे मध्वनाथकविनें लिहिली विनंती. ॥ ११

---

## ९. [3]एकनाथस्वामीकृत

### [4]चिरंजीवपद.

(ओंव्या.)

चिरंजीवपद पावावयासी । अधिकाधिकार कैंचा साधकांसी ? । किंचित् बोलों निश्चयेंसी । कळावया साधकां. ॥ १ ॥ येथ पाहिजे अनुताप । त्याचें कैसें स्वरूप ? । नित्य मरण जाणे समीप । न मानी अल्प देहसुख. ॥ २ ॥ म्हणे नरदेह किमर्थ निर्मिला । तो म्यां विषयभोगीं लाविला । अहा ! परमार्थ स्वार्थ बुडविला । करी वहिला विचार. ॥ ३ ॥ ऐसा अनुताप वाहातां । वैराग्य ये त्याचिये हाता । त्या वैराग्याची कथा । ऐक तत्वता सांगेन. ॥ ४ ॥ तें वैराग्य बहुतांपरी । आहे गा ! अवधारीं । सात्विक राजस तामस या परी । [5]योगेश्वरीं बोलिजे. ॥ ५ ॥ नेणें वेदविधी आचार । नेणें सत्कर्म साचार । कर्मब्रह्मभ्रष्टाकार । तें अपवित्र तामस. ॥ ६ ॥ त्याग लोकपूज्य तें करणें । सत्संग टाकुनी पूजा घेणें । शिष्यममता धरूनि राहाणें । तें जाणिजे राजस. ॥ ७ ॥ ऐसें वैराग्य तामस राजस । तो त्याग न माने संतांस । तेणें न भेटे कृष्ण परेश । अनर्थास तो मूळ. ॥ ८ ॥ वैराग्य शुद्ध सात्विक । जें जगद्वंद्य मानी यदुनायक । तें तूं सविस्तर ऐक । मनीं [6]निष्टंक वसावया. ॥ ९ ॥ राग इच्छा विषयक । ते जो सांडी सकळिक । प्रारब्धें प्राप्त होतां देख । तेथुनी निष्टंक आंग काढी. ॥ १० ॥ जेणें धरिला शुद्ध परमार्थ । त्यासी [7]जनमान हाचि अनर्थ । तेणें जडे विषय स्वार्थ । ऐक नेमस्त विचार तो. ॥ ११ ॥ वैराग्यपुरुष देखोनी । त्याची स्तुती करिजे जनीं । एक सन्मान करुनी । पूजेलागीं पैं नेती. ॥ १२ ॥ त्याचें वैराग्य कोमळ कंटक । नेट न धरीच निष्टंक । देखोनी मानस्तुती अलौकिक । भुलला देख पैं तेथें. ॥ १३ ॥ जनस्तुती लागे मधुर ।

---

१. साधुसंतांनीं. २. दुःख. ३. लघुकाव्यमाला–भाग १ पृष्ठ १५८ टीप २ पहा. ४. चिरंजीवपद (मोक्ष) प्राप्त करून घेण्यास काय साधनें केलीं पाहिजेत हें ह्या प्रकरणांत सांगितलेलें आहे. ५. श्रीकृष्णानें. भगवद्गीता–अध्याय १७ पहा. ६. पूर्णपणें. ७. लोकांनीं दिलेला मान.

म्हणती हा उद्धरावया अवतार । आम्हांलागीं झाला स्थिर । तेणें धरी फार शब्दगोडी. ॥ १४ ॥ हा पांचांमाजी प्रथम । शब्दविषय उपक्रम । स्पर्श विषय संभ्रम । झोंबे परम तो कैसा? ॥ १५ ॥ नाना मृदू आसनें घालिती । विचित्र पर्यंक निद्रेप्रती । नरनारी शुश्रूषा करिती । तेणें धरी प्रीति स्पर्शाची. ॥ १६ ॥ रूप विषय कैसा गोंवी । वस्त्रें भूषणें देती बरवीं । तेणें सौंदर्य मानी जीवीं । देहभावीं श्लाघ्यता. ॥ १७ ॥ रूपविषय ऐसा जडला । मग,रसविषय कैसा झोंबला । ज्याची आवडी तयाला । गोडी गोडाला अर्पिती. ॥१८॥ आवडे सुगंध चंदन । आवडे बुका सुमन । ऐसे पांच विषय संपूर्ण । जडले जाण सन्मानीं. ॥ १९ ॥ मग जे वंदिती । तेचि त्याची निंदा करिती । परी अनुताप नुपजे चित्तीं । ममता निश्चितीं पूजकाची. ॥ २० ॥ म्हणाल विवेकी जो आहे । त्यासी जनमान करिल काय । हें बोलणें मूर्खाचें पाहें । ज्या चाड असे मानाची. ॥ २१ ॥ झाल्यासि प्रारब्धगती । मान झाला तरी नेघों[1] न म्हणती । परी तेथें गुंतोनी न राहती । उदास होती तात्काळ. ॥ २२ ॥ यापरी साधकाच्या चित्ता । मान गोडी न संडे सर्वथा । जरी कृपा उपजे भगवंता । तरी होय मागुता विरक्त. ॥ २३ ॥ तो विरक्त कैसा म्हणाल । जो मानलें टाकी स्थळ । सत्संगीं राहे निश्चळ । न करी तळमळ मानाची. ॥ २४॥ मांडीना स्वतंत्र फळ । जें आंगा येईल अहंता वाड । धरूनि जीविकेची चाड । न बोले गोड मनधरणी. ॥ २५ ॥ नावडे प्रपंचीं बैसणें । नावडे कोणाचें बोलणें । नावडे योग्यता मिरविणें । बरवें खाणें नावडे. ॥ २६ ॥ नावडे लौकीक पेरवडी[2] । नावडती लेणीं लुगडीं । नावडे परान्नगोडी । द्रव्यजोडी नावडे. ॥ २७ ॥ नावडे स्त्रिया पाहणें । नावडे स्त्रियांत बैसणें । नावडे स्त्रियांचें रगडणें । त्यांचें स्पर्शणें नावडे. ॥ २८ ॥ म्हणाल गृहस्थ साधकें । स्त्रिया सांडुनी जावें कें । याविषयीं उत्तर निकें । ऐक भावार्थें सांगेन ॥ २९ ॥ तरी स्वस्त्रीवांचोनी । नातळावी[3] आन[4] कामिनी । स्त्रियां सन्निध वाणी । आश्रयगुणीं न वदावी. ॥ ३० ॥ स्वस्त्रीसीही[5] कार्यापुरतें । बोलावें स्पर्शावें निरुतें । परी आसक्तता धरूनी तेथें । सर्वथा चित्तें न गुंफावें. ॥ ३१ ॥ जरी स्त्रिया सेवा करिती । भक्ती ममता उपजविती । तरी शुद्ध जो परमार्थी । तो त्यांचिये संगतीं

---

१. 'घेत नाहीं' असेंही म्हणत नाहींत. २. तऱ्हा. ३. स्पर्शावी. ४. अन्य, परस्त्री. ५. 'स्वदारा हो, परदारा हो, भुलणें हाचि अपाय'–असें प्रसिद्ध सोहिरोबानाथ आंबिये यांचेंही वचन आहे. [सोहिरोबानाथकृत पदसंग्रह. पृष्ठ ५६, पद १९ पहा.]

न बैसे. ॥ ३२ ॥ नको नको स्त्रियांची सांगात । नको नको स्त्रियांचा एकांत । नको नको स्त्रियांचा परमार्थ । करी अपघात पुरुषासी. ॥ ३३ ॥ अखंड एकांतीं बैसणें । प्रमदा[१]संगीं न राहणें । निःसंग निरभिमानें । त्यानें बैसावें सर्वदा. ॥ ३४ ॥ कुटुंबआहारार्थाकारणें[२] । अकल्पीत न मिळे तरी कोरान्न[३] करणें । ऐसें जें वर्तणें । वैराग्य जाणणें तें शुद्ध. ॥ ३५ ॥ ऐसी स्थिती नाहीं ज्यांसी । कृष्णप्राप्ती कैंची त्यांसी ? । म्हणोनियां हरिभक्तांसी । स्थिती ऐसी असावी. ॥ ३६ ॥ हे स्थितीवांचोन । कृष्णीं मिळेन म्हणेल जाण । तो सकल मूर्खांचें अधिष्ठान । लटिकें तरी आण[४] देवाची. ॥ ३७ ॥ हे बोल माझिये मतीचे । नव्हती गा! साचे । कृष्णें सांगीतले उद्धवहिताचे । मी वाचे बोलतों. ॥ ३८ ॥ साच न मानी ज्याचें मन । तो विकल्पेंचि न पावे कृष्णचरण । माझें काय जाईल जाण । मी सांगोन उतराई. ॥ ३९ ॥ सावध व्हाया वैराग्यज्ञान । मनुष्यदेहीं करावा यत्न । म्हणे एका जनार्दन । आणीक प्रयत्न असेना. ॥ ४० ॥

---

## १०. केशवस्वामीकृत[५]

### स्फुट श्लोक.

(श्लोक.)

प्रकाशलें जें श्रुतिच्या प्रवाहीं । प्रकाशलें जें गुरुभक्ति देहीं ।
प्रकाशलें जें सम सर्व ठायीं । तें रूप माझें मजमाजि ठायीं ॥ १
प्रकाशुनी जो जनवीजनातें । प्रत्यक्ष भासे निजलोचनातें ।
पाहें मना! रूपचि तें शिवाचें । जें मूळ आहे सकळां जिवांचें. ॥ २
चिन्मूर्ति डोळां मज दाखवीली । अपार बोधें घनतृप्ति[६] झाली ।
बोलों किती मी महिमा तयाचा ? । आत्माच तो प्राणसखा जिवाचा. ॥ ३
लक्षूनियां श्रीहरि सांवळा रे! । पादारविंदीं[७] सुमना![८] वळा रे! ।
तेणें मुके भेद, हरी विकारी । करी हरी सर्व सुखाधिकारी. ॥ ४

---

१. प्रमदा=जिला काम फार आहे अशी स्त्री. २. कुटुंबपोषणार्थ. ३. सुकी भिक्षा मागावी. ४. शपथ. ५. हा रामदासपंचायतनांतील प्रसिद्ध साधु. (अनेककविकृत लघुकाव्यमाला—भाग १ पृष्ठ १६४ टीप ९ पहा.) ६. पूर्णतृप्ति. ७. पदकमलीं. ८. हे चांगल्या मना.

अशनीं शयनीं गमनीं हो! । निरखितों परि मी नयनीं हो! ।
म्हणवुनी अति पावन झालों । सुखनिधी हरि सेवुनि धालों. ॥ ५
हृदयपंकजमंदिरवासिनी । सुखमयी जननी श्रमनाशिनी ।
जनमनीं नयनीं अति आदरें । निरखितां न दिसे मग दूसरें. ॥ ६
जो सेविजे संतजनीं वनीं रे! । जनीं वनीं तो निजलोचनीं रे! ।
पाहें हरी, भेद हरीं विचारें । राहें सुखें, सर्वकृपा पहा रे! ॥ ७
असूनि मायाभ्रमकाननीं हो! । मी बैसलों चिन्मयआसनीं हो! ।
यालागिं नेणें भवशोक कांहीं । झाली निजानंदसमृद्धि पाहीं. ॥ ८
नासूनि मायाममतामतीला । विलोकितां नित्य रमापतीला ।
जाली अती निश्चळ भारती हो! । आलिंगिला भारथसारथी हो! ॥ ९
विलोकितां चिन्मयब्रह्म डोळां । ब्रह्मार्णवीं मज्जति वेळवेळां ।
हें जाणती सर्वहि ब्रह्म पाहीं । त्यावेगळें आणिक ब्रह्म नाहीं. ॥ १०
ज्याच्या हातें सर्व चिन्मात्र होतें । सर्वात्मत्वें तुष्टले संत मातें ।
जेथें तेथें भेटतें तत्व पाहीं । नित्यानंदें मीपणा ठाव नाहीं. ॥ ११
साधूसंगें मानसीं राम दाटे । मायासिंधू सर्व तत्काळ आटे ।
जेथें तेथें अच्युतानंत भेटे । ब्रह्मानंदें सर्वही पूर लोटे. ॥ १२
करूनियां निश्चळ वृत्ति गायीं । विलोकितां अद्वय शेषशायी ।
यथार्थते मानव चित्प्रवाहीं । हें नेणती ते नर भारवाही. ॥ १३
सारूनि मायामयसर्पचेष्टा । जे लक्षती राघव सर्वद्रष्टा ।
निष्ठाबळें वश्य करीं तयासी । अवश्य तूं चिन्मय राम होसी. ॥ १४
विलोकितो गोकुळराव पाहीं । या गोकुळालागुनि ठाव नाहीं ।
या गोकुळीं योग फळासि आला । हें सर्वही गोकुळ तोचि झाला. ॥ १५
सेवूनियां संतपदाब्जतीर्था । विलोकितां सर्वगता अमूर्ता ।
यालागिं मायातमनाश झाला । मी तोचि हा प्रत्यय पूर्ण आला. ॥ १६
करी जरी कर्म अनेकधा रे! । योगी[६] तरी पूर्णसुखी सदा रे! ।
निःशेष हें साध्य कदापि नेणे । मी साध्य हा सिद्धप्रयोग जाणे. ॥ १७

१. खातांना, जेवतांना. २. तृप्त झालों. ३. सर्वांवर कृपा करणारा जो (देव) त्यास. ४. वाणी. ५. (गाढवांप्रमाणें) ओझें वाहणारे. ६. योगी=योगाभ्यास करणारा. योग म्हणजे चित्ताच्या वृत्तींचा निरोध. चित्ताच्या वृत्ति बाह्यपदार्थांवरून काढून त्यांचा रोंख आत्म्याकडे लावणें याचें नांव योग.

जो वर्णिला नित्य प्रभाकरानें । जो सेविजे सादर शंकरानें ।
तो दाविला देव दयाकरानें । आलिंगिजे केशवकिंकरानें. ॥ १८
विलोकनें लोकन सर्व नेलें । विलोकनें लोकन सर्व केलें. ।
विलोकनें लोकन लोचनीं रे! । यथार्थ तें लोकन, ते मुनी रे! ॥ १९
विलोकितां नित्य विलोकमाळा । विलोकितां पावन लोक झाला ।
विलोकनें लोक न तो न जाणे । विलोकनावांचुनि आन नेणे. ॥ २०
दयानिधी चिन्मयरत्न दावी । आत्मा हरी अद्वय शेषशायी ।
बैसोनियां निश्चळ सत्कुळीं हो! । म्यां देखिला गोपति गोकुळीं हो. ॥ २१
जे लक्षिती सर्व प्रकाशकासी । पदोपदीं होय तयांसि काशी ।
स्वयंप्रकाशी म्हणिजे तयाला । विलोकनें आत्मप्रकाश झाला. ॥ २२
ज्याच्या प्रकाशीं जन सर्व नाहीं । तो राम मी केवळ पूर्ण पाहीं ।
ऐसा मला प्रत्यय आजि आला । प्रसन्न हा सद्गुरुनाथ झाला. ॥ २३
आहे आहे अंतरीं राम आहे । पाहें पाहें अंतरीं त्यासि पाहें ।
राहें राहें तत्पदीं लीन राहें । लाहें लाहें सर्वथा सौख्य लाहें. ॥ २४

नरहरिचरणाचें ध्यान ज्याचे मनीं हो
त्रिभुवनिं जनकासी लक्षितो लोचनीं हो! ।
परम विमळ योगी पूर्ण ते या जनीं हो
चरणकमळिं त्याच्या उद्धरे मेदिनी हो! ॥ २५

दयाबळें चिन्मय लोक केला, बोलों किती? शोक लयासि गेला ।
यालागिं वीलोकन मात्र झालों, धालों सुखीं आत्मपदीं निमालों. ॥ २६
नेणोनियां अद्वय लोक नासी सुजन्म कां व्यर्थ विलोकनासी ।
धरूनियां पल्लव अंगनांचे, नानापरी देह धरूनि नाचे. ॥ २७
शमदमें करुनी मन गोळा, गुरुकृपें उघडीं मग डोळा ।
मग दिसे सगळा शिव पाहीं, म्हणउनी उरला जिव राही. ॥ २८
भवपुरीं करुनी शयनातें, उघडिली स्वरुपीं शय ना ते ।

१. केशवस्वामी हाच किंकर (ईश्वराचा दासानुदास). २. पाहणें. ३. 'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥.' [भगवद्गीता-अ० २ श्लो० ५६ पहा.] याचा भावार्थः-ज्याचें मन दुःखामध्यें संत्रस्त होत नाहीं; सुखाची ज्याला इच्छा होत नाहीं; आवड, भय, क्रोध हीं ज्याचीं नाहींशीं झालीं; अशा स्थिर बुद्धीच्या मनुष्यास 'मुनि' असें म्हणतात. ४. पृथ्वी. ५. पदर. ६. स्त्रियांचे. ७. शय=निद्रा, झोंप.

तव दिसे मज मी निजडोळां, प्रगटली बरवी शिव[1] वेळा. ॥ २९
सर्व काळ दिसतो शिव ज्यासी, सर्वकाळ बरवा शिव त्यासी ।
सर्व काळ शिव तो मग झाला, सर्व काळ वदतो शिव[2] त्याला. ॥ ३०
[3]भवपुरीं धरिली अतिगोडी, म्हणवुनी मति हा भव[4] सोडी।
क्षणक्षणा अवघा भव पाहें, [5]भवमयी मज हें गमताहे. ॥ ३१

## ११. [6]रंगनाथस्वामीकृत

### रंगाष्टक.

(श्लोक.)

जाणोनि तत्व मग जाणिवभाव नाहीं । स्वानंदतृप्त सकळाशय मुक्ति पाहीं ।
राहोऽथवा तनु पडो समता जयाला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ १
स्वप्नेंद्रजालवत मायिक सर्व आहे । यालागिं निश्चय मनीं भय कोण वाहे,।
स्वप्रत्ययें विविधभाव अभाव गेला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ २
ज्ञानानळें विविध संचित दग्ध झालें । वंध्याविलासवत तें क्रियमाण केलें ।
प्रारब्ध शेष उरलें जननिश्चयाला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ ३
कोणी उदास वनवास विहार खेळे । कोणी स्वकर्मरत आश्रमधर्म खेळे ।
स्वच्छंदतां रमत येक विकल्प गेला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ ४
रक्षू प्रजा मद गजारुढ राजभद्री । भिक्षू अकिंचन उदासिन हो दरिद्री ।
संकल्पशून्य मन आग्रहभाव टेला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ ५
जीवेश्वरा अणि जगाप्रति एक काळें । निर्धारिलें घटमठीं नभ जेंवि खेळे ।
वेदांत संत समतींत····याच बाला (?) । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ ६
सिंधूस सिंधुसम भास्कर भास्करातें । त्याहूनि चोज उपमा न दिसे तयातें ।
वर्णील कोण गुण वर्जुनि निर्गुणाला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ ७
ही चिद्विलास मुनि मानसहंस जाणा । विश्वीं वसे परि निजांकुर गम्य जाणा ।
रंगोनि निश्चय निजानुभवीं बुडाला । अद्वैतबोधपर निश्चय पूर्ण झाला. ॥ ८

१. शुभ वेळ, शुभकाळ. २. कल्याण. ३. संसारांत. ४. शंकर. ५. शंकरयुक्त, शंकरस्वरूपी. ६. हे रामदासपंचायतनांतील एक प्रसिद्ध साधु. (अनेककविकृत लघुकाव्यमाला–भाग १, पृ० १६५ टी० ६ पहा)

## १२. ज्ञानदेवकृत

### भक्तराज.[1]

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीज्ञानेश्वराय नमः ।[2] ग्रंथभक्तराजप्रारंभः । ॐ नमो जी अनादिसिद्धा । अनक्षरा आनंदकंदा । चिदानंदा अभेदा । अविनाशा तूं ॥ १ ॥ [3]अजरा अमरा अचळा । अद्वैत अखंड अढळा । अरूपा असंगा अकळा । अपरंपारा तूं ॥ २ ॥ नमो अलक्षा [4]अनाभासा । अनुपम्यें स्वयंप्रकाशा । [5]अप्रमाणा [6]आत्महंसा । निरंजना तूं ॥ ३ ॥ निरालंबा निरंतरा । निर्मोहा निर्विकारा । निर्गुणा निराधारा । निर्वैरा तूं ॥ ४ ॥ नमो व्यापका महदाकाशा । सदापूर्ण सदाभासा । सदोदिता सर्वेशा । सर्वादि तूं ॥५॥ प्रपंचाकार प्रकाशकूं । चराचरा आभासकू । उत्पत्तिनाशपाळकू । कारण तूं ॥ ६ ॥ एकचि परी अनेकू । अभेदपरी [8]अनंतवेखू । बहुव्यापी बहुनायकू । सर्वबीज तूं ॥ ७ ॥ आतां मृत्तिकेचा करुनि खेळू । उभविला हा ब्रह्मांडगोळू । संकल्पीं होय मेळू । विकल्पीं होय नासू ॥ ८ ॥ दावी लपवी [9]स्वभावें । परी अकर्ता [10]येणें नांवें । चराचर व्यापुनि आघवें । वेगळाचि तो ॥ ९ ॥ जैसा रवी नाना घटीं । प्रतिबिंबें [11]बिंबतो कोटी । परि रवि [12]तंव शेवटीं । अलिप्ततया ॥ १० ॥ कां काष्ठामाजी अग्नी । प्रत्यक्ष प्रगटे मथनीं । परी तो काष्ठीं असोनी । वेगळा जैसा ॥ ११ ॥ कां तरूमाजी बीज जैसें । सर्वांगीं व्यापुनि असे । परी वृक्षामाजी न दिसे । वेगळेंचि तें ॥ १२ ॥ चंद्र जळीं प्रतिभासे । परी [13]मुख्य तो गगनीं असे । तैसा परमात्मा असोनि [14]न दिसे । अलिप्त स-

१. या ग्रंथाच्या एकंदर तीन पोथ्या आम्हांस मिळाल्या. पहिली (अ) ही रा० रा० विश्वनाथ काशिनाथ राजवाडे बी. ए. यांजकडून, दुसरी (ब) रा० दामोदर वामन आठवले यांजकडून आणि तिसरी (क) रा० रा० निळकंठ बाबाजी रानडे बी. ए. यांजकडून. या तीन गृहस्थांचे आम्ही फार आभारी आहों. २. येथें (क) प्रतींत 'श्रीसीतारामाय नमः' असें आहे. ३. ओव्या २।३।४ (ब) प्रतींत नाहींत. ४. सत्यस्वरूपा. ५. प्रमाणरहिता, प्रमाणातीता. ६. आत्मरूप हंसा. हंस हा पक्षिवाचक शब्द असून त्याच्या दूध आणि पाणी हीं निरनिराळीं करण्याच्या विवक्षित गुणानुरोधानें (येथें आत्मानात्माचा विवेक करण्याचे शक्तिमुळें) हा शब्द योजलेला आहे. नीरक्षीरविवेक करण्याविषयीं हंसाची प्रसिद्धी आहेच. ७. (ब) प्रतींत असल्या उकाराच्या जागीं बहुतकरून आकार किंवा आकार आढळतो. ८. अनेक वेष धारण करणारा. ९. (क) विश्वभावें. १०. या. ११. (अ) बिंबति, (ब) बिंबली. १२. (ब) तया. १३. स्वतः. १४. (अ, ब) दिसे.

कळां ॥ १३ ॥ ना तरी वाद्याचिये ठायीं । ध्वनी व्यापूनि असे पाहीं । परि तयामाजी असोनियांही । न दिसे जैसा ॥ १४ ॥ कां कंठीं रांग[1] उमटती । परि कंठीं काय असती । तैसा परमात्मा सर्वाभूतीं । परि अलिप्त सकळां ॥ १५ ॥ अथवा आरिसांमुख[2] देखिलें । परि तें आरिसियां[3] नाहीं निर्घालें । आकाशीं अभ्र प्रगटलें । आकाश वेगळें ॥ १६ ॥ ऐसा सर्वां सर्व तूं । व्यापूनियां रहितू । भक्तिलागीं मूर्तिमंतू । अमूर्त हा ॥ १७ ॥ हा निर्धारितां न निर्धारे । जेंगंजुगन्नाथ जगदाकारें । जग तयामाजी[6] उभारे । विश्वंभर तूं ॥ १८ ॥ तेजीं[7] दीप कीं दीपीं तेज । बीजीं वृक्ष कीं वृक्षीं बीज । परमात्मा तो सहज । जग तया आंतू ॥ १९ ॥ वस्त्रीं तंतू कीं तंतीं वस्त्र । नीरीं तरंग किं तरंगीं नीर । कर्पूरीं परिमळ कीं परिमळीं कर्पूर । वेधिला सर्वांगीं ॥ २० ॥ हा निर्धारितां नातुडे । मनें पाहतां न सांपडे । कवणापरि न घडे । एकु कीं अनेकु ॥ २१ ॥ आतां[11] ऐसें मानलें । हें साभास दिसे जितुलें । तें आरिसाच उमटलें । प्रतिबिंब जैसें ॥ २२ ॥ कीं वृक्षीं छाया दिसे । ते[12] जयाचेनि प्रकाशे । तेजा वांचुनि अंधारीं असे । ऐसें नव्हे ॥ २३ ॥ हा[13] माया आकारु । मृगजळन्यायें विस्तारु । आभास परि साचारू[14] । म्हणों नये ॥ २४ ॥ कल्पांतीं सर्वहि सरे । सत्वीं[15] निजरूप उरे । जें वेदाचिया उत्तरें । बोलवेना ॥ २५ ॥ बिंबाधारें प्रतिबिंबलें । अनंत होउनि आभासलें । असत्य येव[16] रूढलें । अज्ञानियां ॥ २६ ॥ वोडंबरिचें[17] लेणें । नयनीं दिसे साजिरवाणें । परि तें जगीं मिरवणें । कैसेनि घडे ? ॥ २७ ॥ स्वप्नींची कवणा भेटि । चित्रींची काय बोलोनि उटि । दर्पणींचा हार कंठीं । कवण[18] मिरवी ॥ २८ ॥ मृगजळींचे जीवनें । तृषाक्रांतें[19] कैसें सेवणें । गंधर्व[20]नगरीं वसणें । हें काय घडे ? ॥ २९ ॥ नयनींची पुतळी । कैशी धरिजे अंचळीं[21] । गगनाचिये पोकळी । पांगुळ धांवे ॥ ३० ॥ वांझेच्या पुत्राचा विवाहो । मशकें[22] गिळिला ब्रह्मांडकटाहो[23] । हा शब्द जैसा वाव । विचारितां ॥ ३१ ॥

१. गायनाचे राग. २. आरशांत. ३. आरशापासून. ४. उत्पन्न झालें. ५. जगन्नाथ व जग यांची परस्पर व्यापकता दाखविली आहे. ६. जगन्नाथामाजी. ७. हे सर्व दृष्टांत परस्परव्यापकतेचे आहेत. ८. (ब) आन. ९. प्राप्त होत नाहीं, सांपडत नाहीं. १०. मुळींच. ११. (क) परि आत्मा. १२. (क) ते तेजचि निभासे. १३. हा अवघा संसारु. १४. खरें, सत्य, यथार्थ. १५. (क) शेखीं. १६. (ब) येव्रं. येव=एंव (सं. निश्चयार्थी अव्यय.) १७. वोडंबरीचें=खोटें, बहुरूपी विद्येचें. १८ कोण. १९ (क) तृषाक्रांतें केंवि निवणें. २०. आकाशांत दिसणारा निरनिराळ्या ढगांचा जो देखावा त्यांत. २१. पदरानें. २२. धुंगुरट्यानें. २३. कटाह=कढई, वाटोळें भांडें. (अ) महाकटाहो. २४. व्यर्थ.

आकाशाची साली काढिली । वारियाचि चिंधी फाडिली । अग्नीसी लाख मढविली । ऐसें काय घडे? ॥ ३२ ॥ अंधारींचे काळें । उष्ण देउनि वाळविलें । सर्पाचे पाय बांधिले । वाळुवेचेनि वेटीं ॥ ३३ ॥ ज्योतिचेनि रंगें । वस्त्रें रंगिलीं चांगें । वायोचेनि लागमागें । पांगुळ धांवे ॥ ३४ ॥ मोटें बांधिला मैळ्यानिळ । चंद्रकिरणीं पायपोळ । साच होये एवढा बोल । निर्धारितां मिथ्या॥३५॥ हे असत्याची मात । काय सत्य असे यांत । साच म्हणती ते भ्रांत । अज्ञानिये ॥ ३६ ॥ ऐसें असत्यचि वाढलें । असत्यचि रूढलें । मागिलां पुढिलीं दाविलें । देखा पां तें ॥ ३७ ॥ देखोवेखीचिये वाटे । मोडती कुकर्माचे कांटे । आत्माराम न भेटे । सद्गुरुविणें ॥ ३८॥ वादक निंदक दुष्ट । घातकी पातकी नष्ट । उन्मत्त क्रोधी गांवष्ट । आसति बहु ॥ ३९ ॥ मूर्ख आणि अनाचारी । मतिमंद अहंकारी । कामातुर मोहो भारी । नेणति सोयें ॥ ४० ॥ आधींच अविचारी आंधळीं । वरि नेत्रीं पेंढाळ बांधिली । सैराचि सोडुनि दिधलीं । सर्वेंद्रियें ॥ ४१ ॥ लागलीं असत्याचे वाटे । पाडिलीं प्रपंचपेंटें । दुःखिया दुःखी भेटे । तरी सुख कैचें? ॥ ४२ ॥ मुकिया मुकें भेटलें । तरी बोलणें सहजचि खुंटलें । आंधळिया आंधळें झगडलें । तेथें देखावें कोण? ॥४३॥ मिळाला पांगुळाचा पोहो । तरि मार्ग कवणें लंघावा? । गेले वेडियाच्या गांवा । तरि ज्ञान कवणा नावडे ? ॥ ४४ ॥ तैसें झालें जगा सकळा । परि एखादा ज्ञानी तो वेगळा । येरां द्वैतभाव सकळां । पथ कैंचा? ॥ ४५ ॥ मोरा सर्वांग डोळे । परि देखावयाचे वेगळे । तारांगणींचें तेज आथिलें । परि सूर्याचें नये ॥ ४६ ॥ पुष्पीं परिमळ आहे । परि तुळशी समान काय होये? । नद्या सरोवर वाहे । परि भागीरथी वेगळी. ॥ ४७ ॥ आचार चालवी नीचें याती । परि ते वेगळी ब्राह्मण याती । कळावंत गीत गाती । परि वैष्णवप्रेम वे-

१. वायूची. २. (ब) चौकी मोडिली. ३. दोरीनें, सांखळीनें. ४. (क) रंगविलीं. ५. मलय पर्वतावरील वारा. ६. माया. असत्यांत असत्यपरंपरेचा एक संस्कृत श्लोक आहे तो असा— 'मृगतृष्णांभसि स्नातः खपुष्पकृतशेखरः । एष वंध्यासुतो याति शशशृंगधनुर्धरः ॥'. (अ) सात (परंपरा). ७. दुसऱ्याचे अनुकरणानें. ८. खरेपणा. ९. पटल, वस्त्र. (अ) नेत्रीं परा (अज्ञान, माया.) बांधिली. (ब) नेत्र पाटा बांधिली. १०. मोकळीं. ११. पेठ–बाजार. १२. मेळा. १३. असलें. १४. श्रेष्ठ. १५. (ब) विजाती. १६. (अ) कलावंती गाति बोलती, (क) कलावंत गाती गीतीं.

गळें ॥ ४८ ॥ राव रंक एक नांव । परि वेगळाली पूर्व दैवें । वनोवनीं मृगें सर्व । परि [1]कस्तुरिया वेगळा ॥ ४९ ॥ पाषाण तरी एक जाती । परिस दगडा बहु भ्रांति । तैसे साधु जगीं होता । परि ते जगा वेगळे ॥ ५० ॥ [2]येरीं आंधळीं काय देखावें । पांगुळें काय चालावें । मुकीं काय बोलावें । देखिलें तरि? ॥ ५१ ॥ [3]मीनली ऐशी शक्ति । [4]देखोवेखी वर्तति । अविधियाची गति । एकचि दिसे ॥ ५२ ॥ पुढील नेणोनि [5]आड मार्ग धरी । मागिल देखोनि तैसेंच करी । परि कोणी न विचारी । भक्तिज्ञान. ॥ ५३ ॥ वेश्येची संगती । पतिव्रता चळे चित्तीं, । कां चांडाळाचि संगती । आचारु नासे. ॥ ५४ ॥ कां [6]कागाचेंनि सन्निधानें । राजहंस वेंचिला प्राणें, । [7]कां विष्ठास्पर्शें पावन । दुर्गंधि लाहे ॥ ५५ ॥ कां लोहासंगें अग्नी । जैसा पिटिजे घणीं । त्याचेनि सन्निधानीं । नाश होय ॥ ५६ ॥ कां चोराचिये संगती । सूळ पाविजे [8]पुढती, । कां स्त्रियेचे एकांतीं । संन्यासी बिघडे ॥ ५७ ॥ कां [9]भेडामाजी सुभटु । धैर्यासि होय पालटू, । कां आंबिलसंगें क्षीरघटु । नासे ॥ ५८ ॥ कां पावकाचेनि संगें । कर्पूर [10]वेंचे सर्वांगें, । परस्त्रीचेनि संगें । नासे पुरुषु ॥५९॥ जो व्याघ्रसंगें राहे । तया मरण तेंचि होये, । कां सर्पासि खेळों जाये । तोहि नुरे ॥ ६० ॥ नातरी [11]मैंदाचिये संगतीं । जिवें मेले नेणों किती, । कां भ्रष्टाचिये संगती । भ्रष्टचि होय ॥ ६१ ॥ ऐसे कुसंगा लागले प्राणी । तयां झाली जीवहानि, । [12]कुसंग जाणोनि सज्जनीं । वर्जिले असे. ॥ ६२ ॥ सहज बुद्धी विपरीत । न कळे हित अनहित । तयावरी शिकवित । [13]गुरु कर्मभेद ॥ ६३ ॥ जारण मारण मोहन। स्तंभन आणि उच्चाटण। वशीकरण विध्वंसन । शिकविति गुरू ॥६४॥ [14]मंत्र यंत्र उपदेशिति । तेचि जगीं मिरवति। वस्तु सारखी जाणति।तेहि गुरू ॥ ६५ ॥ [15]दंडायुधीं भेद जाणे । विद्यागर्वे स्फुंदणें। तयातें हि गुरुमानें। होय

१. कस्तुरीचा, कस्तुरी धारण करणारा. ‘या’ हा जुन्या भाषेंत षष्ठीच्या प्रत्ययाप्रमाणें योजिलेला आढळतो. २. इतर आंधळ्या अशा लोकांनीं. ३. मिळाली. ४. एकमेकांचें पाहून. ५. (अ) आन. ६. काग=कावळा. ७. (अ, ब) विष्ठ स्पर्शेण । दुर्गंधि जैसि ॥. ८. पुढें, सहजच, स्वाभाविकपणें. ९. भ्याडांमध्यें. १०. नाश पावतो. ११. फासेगाराच्या, घातक्याच्या. १२. (अ, ब) कुसंगाचे गुणवर्णीं । जे क्रीडती ॥. १३. (अ) गुरु भेद. १४. (क) मध्यें ही ओवी नाहीं. १५. (क) दंडयुद्ध भेदजाण । विद्या मती गती गाणें । तयासि गुरु मानणें । होय पूज्य तयासि ॥.

पूजा ॥ ६६ ॥ एक शिकवी एक शिके । घरोघरीं ऐसेंचि देखे । परि निरसति संसारदुःखें । ऐसा कैंचा ? ॥ ६७ ॥ जे जे विषयाचेनि गोडें । तयातें कौतुक कोड । परि न करिति मनतोड । विषयाहुनि. ॥ ६८ ॥ ऐका श्रीगुरुची ओळखी । जो गुंतेना संसारसुखीं । आपपर सारखी । दृष्टी तयाची. ॥ ६९ ॥ राव रंक सारिखा । आपुला आणि पारिखा । शत्रु आणि सखा । न म्हणे कांहीं. ॥ ७० ॥ भूक तान्हेनें न विलंबे । सुखें दुःखें न झळंबे । मानापमानगर्वडंबें । चाडचि नाहीं. ॥ ७१ ॥ आशा शंका भेदु लोभु बुडाला । सकळ विषयीं गळाला । गळित पत्र जाहला । विषयसंग जाणोनि. ॥ ७२ ॥ परि कृपाळुपणें जननी । जीवमात्र न दुखवि कोणी । निंदास्तुति दोन्ही । सारखी जया. ॥ ७३ ॥ कामिनी कांचना नातळे । प्रकृतिप्रपंचातें न मिळे । काळवेळेसि नाकळे । श्रीगुरु तो. ॥ ७४ ॥ सदास्वरूपीं सावचित्त । हारिखें विषादें नव्हति दुश्चित । विषयव्यापारीं किंचित । न पालटे बुद्धी ॥ ७५ ॥ विषयव्यापार होये । परि सहजस्वस्थिति न मोडे सोये । अथवा व्यापारभयें । नें डळमळी मन. ॥ ७६ ॥ धर्म आचार क्रिया चाले । फळउद्देशें उदार भले । जगदीशीं समर्पिलें । सकळ फळ. ॥ ७७ ॥ भूतें भूमि घालिति घाये । क्लेश न मानितां स्थिर राहे । तैसी जयाचा भाव होये । शरीरीं निष्ठा. ॥ ७८ ॥ भूत भविष्य वर्तमान । हें सेंकळैक असे जाण । परि न बोलति जाणोन । न दाविति लोकां. ॥ ७९ ॥ लोकीं लौकिक संपादिति । परि प्रगट न करिति आपुलि स्थिति । येहि लक्षणि होति । श्रीगुरु जाणावे. ॥ ८० ॥ कस्तुरी चोरिली । परिमळें हातवटि भरलि । अग्नी बोचकां बांधिली । ते कैसेंनि सांटे ? ॥ ८१ ॥ सूर्य गगनीं उगवला । तो तळहातें नव जाये आच्छादिला । पैरेसि मदोन्मत्त बांधला । तो लपेल कैसा ? ॥ ८२ ॥ गंगे महापूर आला । तो कवणासि जाये वारिला । तेंवि श्रीगुरू आच्छादिला । परि लक्षणें दाविति. ॥ ८३ ॥ राव न सांगे आपणियातें । परि जग जाणे तयातें, । वरुशलिया पर्जन्यातें । वरि कवण ? ॥ ८४ ॥

---

१. लुब्ध. २. (क) मान मोड. ३. (अ, ब) असंग. ४. (अ, ब) भूक तहान विलंबे, सुख दुःख न विलंबे ॥. ५. चित्तवृत्तीत विकार होत नाही. ६. अविद्यारूप प्रपंचांत. ७. आकळला जात नाहीं. ८. हर्षानें. ९. (अ, क) न दंडली मनें. १०. (अ) फळदेशीं. (ब) फळउद्यमीं. ११. (क) जैसा जयाचा भाव होय। शरीर निष्ठा तैसी ॥. १२. (अ, ब) देशकाळ असे ज्ञान । परि बोलति जाणोन ।. १३. (ब) समावे. १४. परसांत. १५. असा हत्ती.

सिंधु केंवि समावे घटीं, । मेरू केंवि लपविजे मुष्टीं, । वामनरूप संपुटीं । सानें कैसें म्हणावे? ॥ ८५ ॥ दुर्बळामाजि लक्ष्मीधरु । कृपणामाजि उदारु । अविचारामाजि चतुरु ।.लोपेल कैसा? ॥ ८६ ॥ पाडळी[1] फुला आली । ते भ्रमररंध्रीं ठाउकी झाली । मनीं[2] कल्पना उठली । ते श्रेष्ठासि[3] ठाउकी. ॥ ८७ ॥ तैशीं श्रीगुरूचीं लक्षणें । तीं प्रसिद्ध जगीं वाखाणणें । तें नलगे सांगणें । आतां कांहीं. ॥ ८८ ॥ येरें संसार आवडी । लागे विषयाचीं[4] गोडी । उदर शिश्नाची जोडी । करिताति जगीं. ॥ ८९ ॥ तनुधनाचेनि माजे । इंद्रियव्यापारु सदां गाजे । मुलीं म्हणती माझें माझें । करिती मिथ्या. ॥ ९० ॥ मक्षिका कुंश्चळीं रांते[5] । तेणें स्वादें तृप्ति आते । तैसा विषयसंतोष मातें । संतोष लोका. ॥ ९१ ॥ पशुवां तृणाची गोडी । गोचिडा रक्ताची जोडी । दर्दुर[6] चिखुल न सोडी । प्रीति करुनि. ॥ ९२ ॥ कर्‍हें[7] कांटियां खाये । तेणें तया सुख होये, । शूकरा दुर्गंधि लाहे । त्यासि हरुष बहु. ॥ ९३ ॥ खरा उकरडां[8] सराय मोटी । श्वान हाडालागीं लाळ घोटी । नष्टा अनाचारगोष्टी । आदर बहु. ॥ ९४ ॥ दुर्जना वर्म सांपडे । तेणें तया पारणें घडे । नरकीं किडा जरी पडे । हरुष बहुत तयासि. ॥ ९५ ॥ ऐसे विषयाचेनि सुखें । सुख मानिती मूर्खें । ते पचिजेती[9] नर्कें । बहुकाळपर्यंत. ॥ ९६ ॥ कर्णीं[10] नासला[11] मृगु । घ्राणें वेचला भृंगु[12] । दृष्टीनें जळला पतंगु । दीपकावरी. ॥ ९७ ॥ रतिरमणीं[13] व्याघ्र नासला । जिव्हे मीनें[14] जिवें गेला । स्पर्शें मातंगु[15] पडला । संसारबंदीं. ॥ ९८ ॥ ऐशी[16] विषयाची गोडी । ................................ ।

१. पाटलवृक्ष. (क) पडिली फुलामाजी आळी । ते भ्रमरासि आधीं ठाउकी जाली ।. २. सामान्य लोकांच्या मनांत. ३. (साधुवांचून) इतरांना. ४. वाईट पदार्थाचे ठिकाणीं. ५. रमते. (रा=रमणें.) ६. बेडूक. ७. उंट. ८. सवय, गोडी. ९. पडून राहतात. १०. श्रवणेंद्रियाच्या योगानें; ध्वनीच्या नादानें. ११. (क) वेचला. १२. भ्रमर. १३. याला कोठें आधार दिसून येत नाहीं. १४. मासा. १५. हत्ती. १६. विषयोपभोगाचीं प्राण्यांचीं इंद्रियें पांच:-कर्ण, त्वचा, चक्षु, जिव्हा आणि नाक. यांचीं उपभोगांचीं द्वारें अनुक्रमानें शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध, हीं आहेत. त्यांच्या अत्यंत नादीं लागल्यानें प्राण्याचा नाश होतो. जसें:- मृग हा स्वरलुब्ध असल्यानें गायनाच्या लोलुपतेनें जाळ्यांत धरला जातो. हत्ती धरण्याकरितां प्रथम एक हत्तीण शिकवून तयार करितात, ती रानांतील कळपांत जाऊन हत्तीच्या अंगावर आपली सोंड फिरविते, त्या बरोबर त्या स्पर्शसुखानें तो वेडा होऊन तिच्या मागोमाग येऊन खड्ड्यांत पडतो. पतंग हा दिव्याच्या ज्योतीला भुलून प्राणास आंचवतो. मत्स्य हा आमिषाच्या लोभानें धीवराच्या गळाला लागतो

तयासि कोण सोडी । भक्तिज्ञानेंविण? ॥ ९९. ॥ कामिक आणि विरोधी नेणती आपली शुद्धी । देखोवेखी बुद्धी येकचि सकळां. ॥ १०० मायाजाळें बांधिलीं । शेवटीं काळें खादिलीं । विषयकूपीं बुडालीं । शुद्धि हीनें हीं. ॥ १०१ ॥ विषयसुखाचिये चाडें । अविचार अज्ञान गाढें । म पडती दाढे । कृतांताचे. ॥ १०२ ॥ म्हणोनि या कारणें । वेदशास्त्रें पुराणें सांगताति धावणें । विचार करा. ॥ १०३ ॥ जाणोनि जाहले सावचित्त उमजोनि करिती आत्महित । तया भाग्य जाहलें उदित । उदासीन हे ॥ १०४ ॥ आचार विचार क्रिया । उपकार पुण्य दया । सत्व सत्य भक्ति जया । ते हे धन्य. ॥ १०५ ॥ मनुष्यदेह उत्तमयाति । सदाचार ज्ञान भक्ति कोंदणावरी जैशी दीप्ति । नवरत्नाची. ॥ १०६ ॥ गुणाचा वरी सुंदरु बरविया परी शिणगारु । लक्ष्मीवंत आणि उदारु । किती वाणिजे. ॥ १०७ । चंदन वरी मळयानिळु । सौरा आणि अति सवळु । छाया आणि सदाफळु निर्किया निकें. ॥ १०८ ॥ चोखद आणि अति गोडी । मिष्टान्न वरी व्याधि फेडी । आप आणि पापतोडी । गुणासी गुण. ॥ १०९ ॥ सुलक्षण आणि चतुर होय । गुणाचा आणि अति पढिय । सभाग्य आणि आरोग्य । तो हि निका. ॥ ११० ॥ तैसा नरदेह आणि भक्ति । जया असे सदां चित्तीं । तोचि अमृतमूर्ति । मूर्तिमंत. ॥ १११ ॥ कीं आनंदाचे फुटति कोंब ।

---

आणि भ्रमर हा वासाला लुब्ध होऊन कमलांत अडकतो किंवा केतकीवर उडी घालतांना आपले डोळे फोडून घेतो. असा एकेका इंद्रियाचा पगडा बसला असतां जर वरीलप्रमाणें प्राणी नाशास पावतो तर ज्या मनुष्याचीं पांचहि इंद्रियें प्रबल असतात त्याचा नाश निःसंशय झालाच पाहिजे. आचार्यांनी आपल्या 'विवेकचूडामणी' नामक ग्रंथांत खालील श्लोक दिला आहे:—
'शब्दादिभिः पञ्चभिरेव पञ्च पञ्चत्वमापुः स्वगुणेन बद्धाः । कुरंगमातंगपतंगमीनभृंगा हताः पञ्चभिरंचितः किम् ॥' याचें तात्पर्य वर आलेंच आहे. भृंगासंबंधानें खालील श्लोक आढळतो:—
'अहह बत पतंगो गंधलोभेन मूढः सुरससुरभिगंधां केतकीमाशु दृष्ट्वा । प्रविशति हि तदंतः कंटकैः पक्षभंगः पुनरपि न परागः सत्र एवाक्षिनाशः ॥'

१. स्वतः अनुभव न घेतां केवळ दुसऱ्याचें पाहून वागण्याची प्रवृत्ति. २. (ब, क) बाढे. ३. धावणें सांगताति=त्वरा करण्याविषयीं उपदेश करतात. (क) सांगताति वादावणें लावुनियां, (ब) सांगताति शोधावणें विचारका. ४. गुणवान. ५. वर, आणखी. ६. शृंगार. (ब) बरविया वरी शृंगार. ७. शूर (?). हिंमत असून बळवान. ८. निकें=चांगलें. निक=खरें. खरें असून चांगलें, उत्तमोत्तम (?). ९. पाणी. १०. पाप नाहीसें करणारें (गंगाजळाप्रमाणें.) ११. अधिकस्य अधिकं फलम्. १२. आत्मा.

कीं सुखाचा समारंभ । कीं धर्मकीर्तिचा स्तंभ । उभविला जगीं. ॥ ११२ ॥ कीं कल्पवृक्ष आंगणीं उगवला । कीं ठेवा माजघरीं सांपडला । तैसा नरदेहे लाधला । भक्तिलागीं. ॥ ११३ ॥ कां कामधेनू [1]वाडां आली । कीं लक्ष्मी माजघर रिघाली । कीं मेघीं वृष्टी घातली । अमृताची. ॥ ११४ ॥ वाटे चिंतामणी सांपडला । [2]कीं मनसंकल्पू फळा आला । कीं परिसु प्रगटला । घरामाजि. ॥ ११५ ॥ क्षीर ओघु गंगे आला । कीं लोहाचा साच कनक जहाला । कीं कुबेरु देउनि गेला । [3]नवहि निधि. ॥ ११६ ॥ कीं साधल्या अष्ट [4]महासिद्धि । कीं लाधला रत्ननिधी । रंक बैसिजे इंद्रपदीं । तैसें जाहलें. ॥ ११७ ॥ परि इंद्रादिकां हरिभक्ति कैंची । खटपट अमरपदींची । [5]आराणुक नाहीं घडीची । अमरलोकीं. ॥ ११८ ॥ एथें धर्म करिती लोक । उत्कृष्ट झालिया इंद्रासि धाक । त्यावरि दैत्याचा वचक । इंद्रपद जाईल म्हणोनि. ॥ ११९ ॥ आणि दिक्पाळें करावें श्रुत । चालवावें सृष्टिकृत्य । आसनीं असावें संतत । बैसोनियां. ॥ १२० ॥ म्हणोनि भक्ति दुर्लभ सुरवरां । हे जोडी एथेंचि करा । पुनरपि पाविजे संसारा । ऐसें कैचें? ॥ १२१ ॥ हा अवचित डाव पडे । मागुता [6]मोलेंहि [7]नातुडे । हा विघडलिया ना घडे । हें [8]सत्य सत्य. ॥ १२२ ॥ याचें दुर्लभ [9]साजणें । हें दुरील यात्रेचें [10]पेणें । एथें [11]परत्रींचें [12]केणें । भरुनि लाभे ॥ १२३ ॥ [13]हा भक्त वंद्यू होये । एऱ्हवीं निरर्थक जाये । संग तो मिळेल पां काये । मागतिल्या नाहीं ॥ १२४ ॥ हे यात्रा संसाराची । पुनरपि न लाभे ऐसीचि । अनायासें लाधली कैंची । जाणिजे ना. ॥ १२५ ॥ जरि अवतार जाहले । तरि ते मागुती नाहीं आले । एक वेळे भोगुनि गेले । एथुनियां ॥ १२६ ॥ जैसें वृक्षीं पान झडे । तें काय पुनरपि जाउनि जडे । कां पक्कफळ देंठींचें पडे । तें काय लागे मागुतें? ॥ १२७ ॥ कां नदी पाणी भरे । तें काय मागुति मुरडोनि फिरे । अथवा जळीं तरंग विरे । तो [14]गिवसिजे कोठें ॥ १२८ ॥ वस्त्र जीर्ण होउनि विरालें । उदक मृत्तिकेसि जिरालें । तें मागुति

१. वाड्यांत. २. (क) कीं मानसकल्प फुलों लागला. ३. 'महापद्मश्च पद्मश्च शंखो मकरकच्छपौ । मुकुंदकुंदनीलाश्च खर्वश्च निधयो नव ॥' हीं कुबेराच्या नऊ निधींचीं नांवें. ४. 'अणिमा लघिमा प्राप्तिः प्राकाम्यं महिमा तथा । ईशित्वं च वशित्वं च तथा कामावसायिता ॥' अशा आठ प्रकारच्या सिद्धी (अलौकिक शक्ति) आहेत. ५. समाधान. ६. द्रव्यानेंहि. ७. प्राप्त होणार नाहीं. ८. (अ, ब) देहि लटके. ९. यथार्थ रीतीनें घटना होणें, सज्ज होणें. १०. मुक्काम. ११. स्वर्गींचें. १२. जिन्नस. १३. हा भक्तीनें वंद्य होईल. १४. सांपडे.

नाहीं आलें । आकाशगामि ॥ १२९ ॥ कां भंगला घटु न घडे । फुटला नेत्र जोडे । तसा गेला जन्म न सांपडे । तिहीं लोकीं ॥ १३० ॥ बारा मासां म. फिरति । परि गेले ते केंचे येती ? । तसेच आणिक होति । परि गेले ते गे ॥ १३१ ॥ एक वस्त्रें फाटुनि गेलीं । दुसरीं सर्वेंच तैसींच केलीं । परी गेलीं गेलीं । तादृश आणिक ॥ १३२ ॥ प्रतिऋतूचीं तंव फळें । तरि काय मागिलीं फिरलीं वळें । हें आणिक नवें रचिलें । मागिलाचेनि ॥ १३३ ॥ तैर दुर्लभ संसारु । परि सर्व असत्याचा विस्तारु । जैसा नव्हे साचारु । चित्रींच रंग ॥ १३४ ॥ पाहतां शरीर हें अनित्य । अमंगळ अशुद्धजनित[2] । निरय नरकां अगम्य । पचिजे गर्भीं ॥ १३५ ॥ हे मळमूत्राची सांठवण । व्याधींचें अधिष्ठान । हें दुर्गंधीचें भुवन । सदां झरे ॥ १३६ ॥ नवांठायीं[3] फाटलें महाछिद्रांळें कोंदाळें । कामकर्में दाटलें । आंत बाहेरी ॥ १३७ ॥ हें न घडे जडिलें । मृत्तिकेचें असे घडिलें । योनीचें काढिलें । जग जाणे ॥ १३८ ॥ हें शरीर हाडांची मोळी । वरि मढिली शिराजाळीं । घातली चर्माची खोळी[6] दिधले बंध ॥ १३९ ॥ हें अविद्येचें मूळ । हें प्रपंचाचें स्थळ । हें व्याधियोग व्याकुळ । नासुनि जाये ॥ १४० ॥ हें योगियाचें साडें । हें निरय नरकाचें भांडें । हें अशुद्धाचें आंडें । शुद्ध केंचें ? ॥ १४१ ॥ हें त्रिदोषीं दंडिलें । मायाजाळीं गुंडिलें । हें जीवेशीं मांडिलें । फासां पडे काळाचिया ॥ १४२ ॥ रोग राहिले नीची संधी । जैसे जन्मांतरींचे दंदी । सांपडलिया कधीं । न राखति जिवें. ॥ १४३ ॥ निमित्य पाहति कांहीं । परि संयोग घडत नाहीं । राहिले असती ठायीं ठायीं । देहाचिमाजि. ॥ १४४ ॥ काळ खड्ग घेउनियां करीं । घाव उचलिला धरिला वरि । वेळ आलिया पळभरी । राहों नेदी. ॥ १४५ ॥ हा काळाचा ग्रासु । हा अनर्थाचा वांसु । हा स्वप्नींचा आभासु । ऐसें जाणे ॥ १४६ ॥ हें असत्याचें घर । हें दुःखाचें माहेर । वातपित्ताचें कोठार । नाशिवंत हें. ॥ १४७ ॥ हें शीततेजें[11] व्याकुळ । अन्नउदकेंवीण विकळ । दंभलोभें[12] सकळ । भरलें असे. ॥ १४८ ॥ यासि जन्ममरणाचे आवर्त[13] । पडिला विषयांचा पर्वत । हा अज्ञानाचा स्वार्थ । रचिला कोडें[15]. ॥ १४९ ॥

१. (क) अर्थ ऐसा. २. अशुद्ध=रक्त. ३. नऊ ठिकाणीं. (नऊ इंद्रियांचे ठिकाणीं.) ४. मळलें, घाण झालें. कोंट=मळ. ५. मढविली. ६. पिशवी. ७. ग्रस्त, पीडित. ८. जीवाबरोबर. (ब) हे जीवेसी मांडलें. (क) हे जीवासि मांडिलें. ९. शत्रु. (हिंदी) दंदी=भांडखोर. १०. राहण्याचें ठिकाण. ११. शीतोष्णानें. १२. दंभें, मोहें. १३. भोंवरा. १४. (ब) हा अज्ञानाचा सारथी । रचिला कोट असत्याचा ॥. १५. गमतीनें.

यासि ग्रह करिति दंड । सेखीं[1] मरणाचा खंड । ऐशिया[2] रचिलें उदंड । [3]विघ्नाचें गंड. ॥ १९० ॥ हा चाले तोंचि नवल जाणा । [4]हो घे क्षणक्षणां । हा दोदिसांचा पाहुणा । जाईल सेखीं. ॥ १९१ ॥ कां [5]जाईजणी वस्तु असे । मूर्ख राहे त्याचेनि आशें । कां स्वप्नीं राज्य तैसें । अवस्थातुर. ॥ १९२ ॥ तसें जाणे जन सकळ । माझें माझें म्हणति बरळ । परि हा उसणा असे गोळ । मृत्तिकेचा. ॥ १९३ ॥ मनुष्यजन्माची घडी । मागुति नये वेंचि[6]तां [7]कोडी । हे महापुण्याची जोडी । जोडिली असे. ॥ १९४ ॥ पूर्वीं किती एक होउनि गेले । परि मागुती नाहीं आले । पुण्य पुरुषार्थ उरले । अद्यापि जयांचे. ॥ १९५ ॥ एकीं अंतीं नांवाकारणें । वेंचले अर्थ आणि प्राणें । एकीं अंगिकारिलीं मरणें । परोपकारीं. ॥ १९६ ॥ [8]एकीं करवत घेतले । आपण [9]अवघडीं पडिले, । एकीं तुळे दिधलें । सुवर्ण दान. ॥ १९७ ॥ [10]एकीं आंगीचेनि मांसें । [11]एकीं मुखिचेनि ग्रासें । एकीं [12]सोमास उपवासें । [13]दंडले देहें

१. शेवटीं. २. (अ, ब) ऐशिया रचला उदंड. ३. (अ) आगड हें, (ब) अवघड हा. ४. अतिशय इच्छा. ५. जाणारी, जंगम. (ब) जाईणी. ६. खर्चिले तरी. ७. कोट्यवधि (रुपये). ८. मयूरध्वजानें. मयूरध्वजाचा पुत्र जो ताम्रध्वज यानें कृष्णार्जुनांस मूर्च्छित करून त्यांचा अश्वमेधाचा घोडा घरीं आणल्यावर, कांहीं वेळानें कृष्ण आणि अर्जुन हे ब्राह्मणरूप धारण करून मयूरध्वजाचे सत्वपरीक्षणार्थ त्याजकडे गेले आणि त्यांनीं त्याचें दक्षिणांग मागितलें. तें देण्यास तो कबूल होऊन त्याचें शरीर करवतानें कापलें जात असतां त्याच्या डाव्या डोळ्यांतून पाणी आलें. तें पाहून ब्राह्मण जाऊं लागले असतां राजानें संकेतानें कळविलें कीं दक्षिणांगाप्रमाणें वामांगाचें हि सार्थक झालें नाहीं. याशिवाय वाईट वाटण्याचें दुसरें कांहीं कारण नाहीं. हें ऐकतांच कृष्ण प्रसन्न होऊन त्यानें त्याचें शरीर पूर्ववत् केलें—अशी कथा आहे. ९. संकटीं. १०. शिबिराजानें. एकदां शिबिराजाचें सत्व पाहण्याकरितां कपोताच्या रूपानें अग्नि व त्याचा पाठलाग करीत बहिरीससाण्याच्या रूपानें इंद्र असे आले. कपोतास राजानें आपल्या पाठीशीं घातल्यामुळें आपलें भक्ष्य तोंडचें काढून घेतल्याबद्दल ससाणा राजास दोष देऊं लागला. तेव्हां राजा कपोताच्या वजनाचें आपल्या शरीराचें मांस देण्यास तयार झाल्यामुळें इंद्र व अग्नि त्याजवर प्रसन्न झाले—अशी कथा आहे. ११. रंतिदेवानें. हा एकदां भोजन करण्यास सिद्ध झाला असतां एका मागून एक असे तीन अतिथी येऊन त्याचें सर्व अन्न भिक्षेच्या रूपानें मागून घेऊन गेले आणि चौथ्यानें पाणी हि नेलें. परंतु सत्वाला न ढळतां संतुष्ट मनानें त्यानें ईश्वराची अशी प्रार्थना केली कीं, 'परमेश्वरा ! मी एवढेंच मागतों कीं मला दुःख झालें तरी हरकत नाहीं पण प्राणिमात्र सुखी असोत म्हणजे झालें.' इतकें म्हणतांच ब्रह्मादि देव त्यावर संतुष्ट झाले. १२. सहा महिने. १३. हा कोण? अंबरीषानें बारा महिन्यांचा उपवास केला होता.

॥ १९८ ॥ [1]ऐकीं समुद्र खाणितला । [2]ऐकीं ऐरावत आणिला । [3]ऐकीं रु
जिंतिला । तेहि गेले. ॥ १९९ ॥ [4]ऐकीं सिंधुजळ प्राशन केलें । [5]ऐकीं गं
सि आणिलें । [6]ऐकीं स्वप्न साच केलें । तेहि गेले. ॥ १६० ॥ [7]ऐकें कैला
आंवळिला [8]बाहीं । त्यांची [9]शुद्धी नेणवे कांहीं । विराले ठायींच्या ठायीं । अ
जैसें. ॥ १६१ ॥ युगा युगा लोम झडे । [10]तेंहि जाले [11]काळा [12]वेरपडे । इत
जीव बापुडे । कवण लेखी. ॥ १६२ ॥ चौदा कल्पें मार्कंडेयो [13]नेव
(वाचे?) । तें [14]लोमहर्षणाचे रोम एक वेचे । तेहि गेले ठायींचे । ठाव सोडोनियां
॥ १६३ ॥ ऐसे गेले असंख्यात । तयां काय करूं गणित? । सवालक्ष हो
जात । नित्य जेथें. ॥ १६४ ॥ जेथें ब्रह्मयासारिखे जाती । इंद्रादिक को
जाणे किती । विष्णु रुद्र [15]गणिती । आणिले काळें. ॥ १६५ ॥ म्हणोनि
जग जातें वाटे असे । मोडती ब्रह्मांडाचे [16]ठसे । तेथें रहावयाचें पिसें । लावुनि
घेईजे. ॥ १६६ ॥ जें जें दिसे तें तें नासे । जें जें भासे तें तें ग्रासे । या संसा
राचे आशें । ठकले बहु. ॥ १६७ ॥ यासि प्रमाण केलें । रविशशि [17]मापारी
भले । निमिषें निमिष आणिले । गणतीमाजि. ॥ १६८ ॥ साठी अक्षरां पळ
एक । साठी पळां एक घटिक । ऐशा साठी होती घटिका । ते अहोरात्र
येकी. ॥ १६९ ॥ ऐशा अहोरात्री तीस । याचा होय एकमास । ऐसे होती
दोन मास । एक ऋतूचे. ॥ १७० ॥ तीन ऋतू एक अयन । दों अयनीं वरुष
जाण । ऐशीं शतवरुषें प्रमाण । मनुष्या आयुष्य. ॥ १७१ ॥ शतवरुषें पूर्ण
अवधि । तयामाजी रात्रि गेली अरधी । बाळत्व गेलें मंदबुद्धी । वृद्धत्व पराधीनपणें. ॥ १७२ ॥ ऐसी हे पंचवीस जाती । मग उरले ते काय किती! । त्यांत व्याधी दुःखें नेती । कितेक काळ. ॥ १७३ ॥ कित्येक जाति उदरपूर्ती । मग कवणे समयीं करील भक्ति । आणि काळ तरि अहोरात्री । सवेंचि हिंडे. ॥ १७४ ॥ फावेल तेव्हां नेईल जाण । म्हणोनि धरी आठवण । घडी भोगिली ते आपण । जिंतिली [18]सही. ॥ १७५ ॥ त्याग भोग भक्ति-

---

१. सगरानें. २. भीमानें. ही गजगौरीव्रताची कथा प्रसिद्ध आहे. ३. अर्जुनानें. किरातार्जुनीययुद्धांत. ४. अगस्तीनें. ५. भगीरथानें. ६. हरिश्चंद्रानें. ७. रावणानें. ८. हातांनीं. ९. बातमी. १०. लोमेशासारखे कीं युगांतानें फक्त एक रोम ज्यांचा नाहींसा होतो. ११. (क) कारपडे. १२. प्राप्त, सांपडलेले. १३. वेचत नाहीं. नाश पावत नाहीं. (क) खडखचे. १४. (क) लोमहर्षांचे. १५. काळें गणितिं आणिले=काळानें मोजले, आपल्या आधीन केले, नाहींसे केले. १६. (अ) ठेसे. १७. मापाडे, माप घालणारे. १८. (ब) सत्य.

ज्ञानें । देहे असतां लाहो[1] घेणें । पुनरपि नरदेहा येणें । ऐसें काय घडे ? ॥ १७६ ॥ आम्ही मागुति येउनि । आपुलि ठेवेणी[2] घेउनि । हें साच म्हणोनि । मानिती मूर्ख. ॥ १७७ ॥ हा अवघा संसारु । स्वप्नामध्यें कनकमेरु । कां चित्रींचा नवरत्न हारु । कंठीं कवण मिरवी ? ॥ १७८ ॥ कां कागदींचें धन । जें वेश्येसि दिधलें जोडुन । कीं मेलियाचें बरवेंपण । कोण उपेगु[3] ? ॥ १७९ ॥ भुकिस्त मनीं[4] जेविलें । गेलें[5] स्वप्नीं देखिलें । कां विकिलें वस्तुशी आपुलें । म्हणे मूर्ख. ॥ १८० ॥ ऐशी शत वरुषें संख्या । यांची कायसी अपेक्षा ? । मेलिया होय रक्षा । मुष्टी एकी. ॥ १८१ ॥ कां माती होऊन मातीस मिळे । कां विष्टा करिती खाउनी कावळे । नातरी होती कृमीपोटळे[6] । अवसानसमयीं[7] ॥ १८२ ॥ शत वरुषें कैंची बापा ! । घडीमाजी बुडेल ताफा । हा बोल आला मापा । देवाज्ञेचा. ॥ १८३ ॥ आतां चार लक्ष बत्तीस सहस्र ऐसें । कलियुग प्रमाण असे । द्वापार त्याचेनि द्विगुणवशें । अधिक केलें. ॥ १८४ ॥ त्रेतायुग बारालक्ष शाहाणवे । [कृत] सत्रा लक्ष अठ्ठाविस जाणावे । हें प्रमाण आघवें । चहुं युगांचें. ॥ १८५ ॥ चहुंयुगां चौकडी । ते ब्रह्मया पळा एवढी । ऐशा सहस्र एक चौकडी । तो ब्रह्मया दिवस येकु. ॥ १८६ ॥ ऐशा शतवरुषा ब्रह्मा सरे । सहस्र ब्रह्मिया विष्णुघडी भरे । ऐशा द्वादशलक्ष विष्णु पुरे । तो अर्ध प्रहर रुद्राचा. ॥ १८७ ॥ येणें गण रुद्रसंख्या । अकरारुद्र एक निमिष । तोहि महंमाया आयुष । वेंचला काळ. ॥ १८८ ॥ म्हणोनि काळगणनें । कोणी नुरेचि सत्यपणें । हें[10] सर्व दिसे वेसणें[11] । जाईल जाणा. ॥ १८९ ॥ पृथ्वी आप तेज वायो । आकाश; एकाचेनि एका क्षयो । शेखीं गगना होय लयो । महाशून्यीं. ॥ १९० ॥ शून्य शून्यीं विलया गेलें । शेवटीं तेंचि एक उरलें । ज्यासि नांव न जाय ठेविलें । वाचावया. ॥ १९१ ॥ वाचा मन मारुति[12] । हे समस्त हि आरती[13] । वस्तु ते परती । परात्पर. ॥ १९२ ॥ आहे तें एक संचलें । परि दृश्य सर्व वेंचलें । तें अक्षर वाचे वाचिलें । ऐसें नव्हे. ॥ १९३ ॥ हें नासे चराचर । युगाचे होती सहस्र । पुनरपि[14] प्रसवे अक्षर । प्रपंचाकार हा. ॥ १९४ ॥

---

१. लाभ. २. ठेवलेला जिन्नस. ३. उपयोगाचें. ४. मनांत, कल्पनेनें. ५. गेलेलें. ६. किड्यांचे समुदाय. ७. मरणसमयीं. ८. ही ओवी (अ) आणि (ब) मध्यें नाहीं. ९. नाश ...वे. १०. (क) हें सर्वही स बैसणें. ११. वेसणें किंवा येसणें=इतकें. (ब) येसनें. १२. पवन. १३. अरुति, अलीकडे. १४. (अ) पुनरपि प्रवेश । अक्षर प्रपंचाकरु ॥ (ब) पुनरपि प्रवेश ...चार । अक्षय पहाते ॥.

हा प्रपंचु नासे भासे । परब्रह्म जैसें तैसें । अधिक ना उणें न दिसे । सदा पूर्ण. ॥ १९५ ॥ ते चळे ना ढळे । उपमेहि न मिळे । अथवा देखती डोळे । ऐसे नव्हे. ॥ १९६ ॥ ते वात ना ज्योती । नीर ना मालति । गगनाहि परती । वस्तु कांहीं. ॥ १९७ ॥ ते निरामय निरंजन । अनक्षर आनंदघन । सदोदित अप्रमाण । अनिर्वाच्य. ॥ १९८ ॥ परिपूर्ण परात्पर । स्वप्रकाश निरंतर । अनामय अगोचर । शुद्धबुद्ध. ॥ १९९ ॥ वर्ण व्यक्ति नेसे तया । स्वरूप आभास ना छाया । स्थान मान तो तया । बोलोंचि नये. ॥ २०० ॥ तो निराभास आभासे । महमाया तेथुनि प्रकाशे । तेथें ब्रह्मांडाचे ठसे । पडति अनंत. ॥ २०१ ॥ इच्छेपासुनि रचे सृष्टी । जीवजंतुचिया कोटि । अवघेचे संबंधे उठी । तेंचि ब्रह्म. ॥ २०२ ॥ मायासमंधीं शिव । अविद्यासमंधीं जिव । परब्रह्मींचें उद्भव । होय सर्व. ॥ २०३ ॥ जैसे सुवर्णाचे अलंकार केले । कां उदकाचे षड्स झाले । कां मृत्तिकेचे आकारले । नाना घट. ॥ २०४ ॥ कां बहुरूपी नानारूप पालटी । परि एकचि आरंभीं शेवटीं । ना तरी जळाच्या पोटीं । नाना तरंग. ॥ २०५ ॥ कां घटमठीं गगन एकलें । व्यापक परि नाहीं गुंतलें । कां दीपीं तेज उजळलें । एकचि जैसें. ॥ २०६ ॥ कां एका बीजाचा विस्तारु । तो अनंतबीज जहाला तरु । परिमाणूंचा कोटिभारु । परी पृथ्वी एकी. ॥ २०७ ॥ एक जळ अनंता घटीं । एक रवि प्रतिबिंबें कोटी । तैसें एक ब्रह्म सकळ सृष्टी । रचिली असे. ॥ २०८ ॥ एक बुड अनंत शाखा । एक शब्द अनंत भाखा । तैशी एक वस्तु अनंत लोका । विस्तार जाहला. ॥ २०९ ॥ अनंत वर्ण गाई । एक वर्ण क्षीर पाही । तैसी एक वस्तु सर्वा ठायीं । व्यापोनि अलिप्त. ॥ २१० ॥ अनंत तरंग एकचि नीर । अनंत रंग परि एक चीर । अनंत लोक एक नगर । रचिलें जैसें. ॥ २११ ॥ एक माया अनंत शक्ति । एक देव अनंत भक्ति । एक बुद्धि अनंत वृत्ति । उठति देहीं. ॥ २१२ ॥ ऊंस रस गूळ साखर । येकचि गोडी पृथगाकार । तैसें एक ब्रह्म हा विस्तार । त्याचाचि पैं. ॥ २१३ ॥ आतां जळीं वनीं जनार्दन । त्यासि नाहीं भेदभिन्न । तरी मायाजाळें कवण । बांधिला जाय ? ॥ २१४ ॥ स्वर्गी कवण राहे । नरका कवण लाहे । ब्रह्म तें काय आहे । हें हि नकळे. ॥ २१५ ॥ आहे जैसें एक जळ । सिंधु सरिता

---

१. (अ) मध्यें ही ओवी नाहीं. २. (अ, क) ना माया. ३. तयार केले. ४. (क) अनेक पुष्पीं येक परिमळें. ५ (ब) नाना दीपें तेज उजळलें, (क) कां अनेक दीपक अनळे. ६. (क) उजळिले. ७. (अ, ब) प्रमाणूंचा कोडिभारू. ८. भाषा. ९. वस्त्र.

ओहळ[1]। उत्तम आणि अमंगळ। सारिखेंचि. ॥ २१६ ॥ कां कांचन एक जैसें। भूषणाभूषणीं वेगळें दिसे। बावनेंच[2] प्रकाशें। चढेना तुटेना. ॥ २१७ ॥ तैसें आपुले देहे पाहें। नाना अवस्था घेत आहे। कुमारत्व तारुण्य जरा लाहे। जैसे काळ प्रमाण. ॥ २१८ ॥ गार तंव एक याति। हिरा रत्न नाना दिसती। परिस चिंतामणि असती। गारेचिमाजि. ॥ २१९ ॥ ऐसा एकचि नटला। बहुरूपी प्रगटला। थोर साना वाढला। अज्ञानियासि. ॥ २२० ॥ ‘मुंगी-पासुनि ब्रह्मावरी। ज्ञानिया एकचि अवधारी। श्रीकृष्णें गीतेमाझारी। हेंचि अर्जुना निरोपिलें ॥ २२१ ॥ अर्जुनासि सांगे हरि,। ‘मीच असें चराचरीं। उत्पत्तिस्थितिसंहारीं। मीच एक ॥ २२२ ॥ मी रुद्र होउनि मारीं। मी ब्रह्मा होउनि आकारीं। मी विष्णुरूप धरीं। प्रतिपाळणीं. ॥ २२३ ॥ मी निराकार आकारिलों। मी अमूर्त मूर्ति जाहलों। मी सगुण होवोनि ठेलों। निर्गुणाचा. ॥ २२४ ॥ चहूं[3] खाणी मीच असें। परि अज्ञानियां केंवि दिसें। हा प्रपंचु माझेनि अंशें। साच जाहला. ॥ २२५ ॥ अज्ञान जीव बापुडे। वैष्णव होउनि शिवासि वांकुडे। शैव होउनि मजकडे। न पाहती. ॥ २२६ ॥ या अज्ञानियां कारणें। मज सायास पडती करणें। नाना अवतार धरणें। याचिलागीं. ॥ २२७ ॥ जो मज शिवा भेद धरी। ते आसुरी प्रकृति निर्धारी। तो सर्वथा मजसि दुरी। अधमयाती तो. ॥ २२८ ॥ एके पायीं पूजा करी। दुसरा चरण अमंगळ धरीं। अर्धें अंग शिंणगारी। अर्धें तैसेंचि राखे. ॥ २२९ ॥ माझी स्तुति करी। आणि शिवनिंदा उच्चारी। या दोन्ही मजची वरी। निंदास्तुति. ॥ २३० ॥ अहं शरीर शिव आत्मा। शिव शरीर अहं आत्मा। हें नेणे तो जन्मा। वेंरपडा होये. ॥ २३१ ॥ आणि जग मजमाझारीं। मी जगाअंतरीं। हें प्रगट करी। अभेदज्ञानें.’ ॥ २३२ ॥ हा कृष्णार्जुनसंवादु। प्रसंगें केला अनुवादु। म्हणोनियां भेदु। अज्ञानियां. ॥ २३३ ॥ यालागिं सर्व ब्रह्म निरंजन। सदोदित पूर्ण घन। माया अविद्या उत्पन्न। तेथेंचि जाहली. ॥ २३४ ॥ ‘जैसें जळ बाबुळी व्यालें। कां गगनीं अभ्र प्रगटलें। तैसे माया अविद्येचे भास उठिले। आंत बाहिर परब्रह्म. ॥ २३५ ॥ कां सूर्यापासाव मृगजळ। कां दृष्टिपासाव संकळ। तें हें माया

१. नाला. २. बावन कसानें. (क) स्थानमानविशेषें। चढेच ना. ॥ ३. स्वेदज, अंडज, जारज आणि उद्भिज. ४. अलंकारी. ५. प्रास. ६. हा अनुवाद गीतेंतील अमुकच भागाचा केला आहे असें नाहीं. या अर्थाचें निरूपण गीतेच्या ९ व्या आणि ११ व्या अध्यायांत सांपडेल. ७. (ब) जैसें तरंगा जळ व्यालें. ८. शेवाळ. ९ दृष्टीपासून. १०. (क) कवळ.

अविद्येचें पडळ । उठिलें ब्रह्मीं. ॥ २३६ ॥ तेथून प्रपंच विस्तारला । बाहिर अंतरीं ब्रह्मचि व्यापिला । म्हणोनि सर्व ब्रह्म म्हणीतला । वेदशास्त्रीं. ॥ २३७ ॥ ब्रह्मेविण उत्पत्ति कैंची । होय मायाअविद्येची । ब्रह्म वेगळें करि तयाची । उरी च नुरे. ॥ २३८ ॥ सूर्य वेगळा कीजे । मग ते प्रभा पाहिजे । तंव दोहींतें सहजें । एकचि जाण. ॥ २३९ ॥ दीपू वेगळा करावा । मग उजियेडु धरावा । तरी दीपासारिखा जावा । त्याचा होय कीं. ॥ २४० ॥ आतां पुष्पाचिया परिमळा । कैसा करूं पुष्पावेगळा? । रत्नापासूनि किळा[२] । निवडिजे कैसा? ॥ २४१ ॥ गुळापासोनि गोडी । वेगळी कवण निवडी? । रूपापासुनि दवडी । सावली कवण? ॥ २४२ ॥ आत्मा आणि कुडी । जैशी याची जोडी । तैशी माया न सोडी । परब्रह्मातें. ॥ २४३ ॥ दो नेत्रीं एक देखणें । दों करीं एक करणें । दों कानीं ऐकणें । एक नादु. ॥ २४४ ॥ दों पायीं एक चालणें । दों होटीं एक बोलणें । तैसें द्वैत पाहणें । एकपणें घडे. ॥ २४५ ॥ द्वैतभाव देहीं परि एक वस्तु । तैसा दोंहीपासुनि उभारतो । प्रपंचीं[३] भक्तिवाद तो । न घडे कदां. ॥ २४६ ॥ या ब्रह्मामाजी वाढती । नासलीया आंतचि विरती । म्हणोनि सर्व ब्रह्म म्हणती । वेदमतें. ॥२४७॥ सूर्यापासुनि अग्नी । आणि सूर्यापासुनि पाणी । तैसा उत्पत्ति नाश दोन्ही । ब्रह्मचि मूळ. ॥ २४८ ॥ प्रपंच उपजोनि काय जाला? । आणि नासुनि कोठें गेला? । परब्रह्म संचला । यथास्थित. ॥ २४९ ॥ जळीं तरंग होती जाती । तरी जळींच नाश उत्पत्ति । परि जळा नाहीं विकृति । तैसें सर्व. ॥ २५० ॥ दिवे दिवटी आगटी । अग्नि विचरे नाना घटीं । परि मुख्य तोच सेवटीं । अधिक ना उणें. ॥ २५१ ॥ मृत्तिकेचीं नाना भांडीं । घडी मोडी खंडोखंडी । परि मृत्तिकेवांचुनि वाढी । नव्हे कांहीं. ॥ २५२ ॥ अथवा अलंकार घडे मोडे । परि सुवर्ण न तुटे चढे । तैसी परब्रह्मीं न पडे । भुताची बाधा. ॥ २५३ ॥ ऐसें सकल चराचर । ब्रह्मापासून अंकुर । विरालिया सर्वत्र । ब्रह्मचि असे. ॥ २५४ ॥ अविद्या अन्यथा ज्ञानें । नैथिलें[४] दिसे द्वैतपणें । हें एक भक्तिज्ञानें । वांचुनि नकळे. ॥ २५५ ॥ जरी होये शुद्ध ज्ञान । तरि नासे आवघा अज्ञान । मग सहज संसारस्वप्न । नासुनि जाये. ॥ २५६ ॥ जैसा दोरीचा सर्प भासे । तो अज्ञाना साच दिसे । भ्रांति फिटलिया जैसें । साच दिसे दोरी. ॥ २५७ ॥ [५]जो जितिला काळें । कां उन्मत्तद्रव्यें भुलणें । आपआपणां विसरणें । भ्रमले

१. बाकी. २. प्रकाश. ३. (ब) प्रपंचभक्तीचा हेतु. ४. (न+असलें) नसलेलें. ५. (अ) जो जी तिला कषणे. (ब) जो जी तिला कळवळे करुणे.

मूर्ख. ॥ २५८ ॥ रोगें भुलला प्राणी । तो दोन चंद्र देखे नयनीं । कां स्वप्न साच मानी । स्वप्नाचिमाजि. ॥ २५९ ॥ कां [1]शेतिचें [2]बुंजवणें । तें मनुष्य म्हणती अज्ञानें. । तैसें दिसे अन्यथाज्ञानें । तें अज्ञान म्हणिजे. ॥ २६० ॥ तप्त लोहो देखिलें श्वानें । तें मांस म्हणे आपुले ज्ञानें । परि जाणतियाचें देखणें । तें वेगळेंचि गा! ॥ २६१ ॥ [5]रुचिक देखोनि पांढरा । दहीं वाटलें मांजरा । परि जाणतियाच्या विचारा । ऐसें न दिसे. ॥ २६२ ॥ [3]शूकराचिया दृष्टी । अवघी आमचीच सृष्टी । पशुपक्षियांचे पोटीं । [4]अनन्य-बुद्धि. ॥ २६३ ॥ जीव अज्ञानें भ्रमले । तेहीं विपरीत सांच केलें । देहाभिमानें बुडाले । भवसागरीं. ॥ २६४ ॥ जातिचेनि अभिमानें । विषयाचेनि अनुसंधानें । अज्ञानासि अज्ञानें । ज्ञानचि म्हणति. ॥ २६५ ॥ जंव अज्ञान न तुटे मनीं । तंव अज्ञानासि साच मानी । जैसें स्वप्न साच स्वप्नीं । जागतां लटिकें ॥ २६६ ॥ ऐसा स्वजाति अभिमानें । देहीं देह भिन्नज्ञानें । तें अज्ञानेंचि म्हणणें । परमज्ञान नव्हे. ॥ २६७ ॥ ज्ञान तें यथार्थ । पिपीलिकेपासुनि ब्रह्म-पर्यंत । सर्व सारिखें देखत । चराचर. ॥ २६८ ॥ मशक मातंग सारिखा । तैसेंचि राया आणि रंका । सिंह आणि जंबुका । न करी भेदु. ॥ २६९ ॥ हंस अथवा काक । उत्तम अथवा [6]अनामिक । पंडित अथवा मूर्ख । न करी भेदु. ॥ २७० ॥ समर्थ कां दुर्बळ । पराक्रमी निर्बळ । सुवर्ण आणि ढेंकुळ । सारिखेंचि जया. ॥ २७१ ॥ रत्न अथवा खडा । चतुर हो कां वेडा । चंदन आणि येरंडा । सारिखाचि जया. ॥ २७२ ॥ निंदा अथवा स्तुति । क्षुधा कां तृप्ती । भूमि कां [7]सुपित(?) । सारिखीच जया. ॥ २७३ ॥ घर अथवा वन । वस्त्रें कां नग्न । मान कीं अपमान । सारखेंचि जया. ॥ २७४ ॥ लज्जा कां भिणें । घेणें अथवा देणें । जाणें अथवा राहणें । कांहीं नेणें. ॥ २७५ ॥ भोगें कां त्यागें । लोभें कां रागें । वाईट कां चांगें । न म्हणति कांहीं. ॥ २७६ ॥ एकें निंदा निंदिलें । एकें स्तुती करूनि वंदिलें । परि सारिखेंचि मानिलें । दोघां तया. ॥ २७७ ॥ ऐसें अखंड अभेदज्ञान । तया नाहीं थोर सान । जे जगामाजि धन्य । तिहीं लोकीं. ॥ २७८ ॥ परिस लोखंडें हाणितला । परि तया हितकारू जाला । सोनेंचि खड्ग केला । लोहजन्मा. ॥ २७९ ॥

---

१. शेतामध्यें पांखरांना भय दाखविण्याकरितां उभें केलेलें गवताचें अगर चिंध्यांचें चित्र. (Scarecrow.) २. झाडाचा चीक. ३. डुकराच्या. ४. आमच्याशिवाय दुसरें कोणी नाहीं अशी कल्पना. ५. खरें. ६. हीन जाति, नांव घेण्यास अयोग्य. ७. स्वपिति=शय्या; सुप्ति=निद्रा.

ऊंस मोडूनि सोलिला । तोडून जरि गाळिला । कढयीं घालूनि जाळिला ।
परि न संडि[1] गोडी. ॥ २८० ॥ चंदन करवतीं चिरिला । साहणेवरि तोडिला ।
परि तेणें नाहीं सांडिला । शीतळ सुवासु. ॥ २८१ ॥ पुटीं[2] जाळिलें बावन[3] ।
परि तें अधिकचि दावणें । तैसा साधु देहावसानें[4] । पालटूं नाहीं. ॥ २८२ ॥
ऐसें अढळ न ढळति मनें । सुखदुःखें तन्मय ज्ञानें । तयाचेनि चरण दरुषणें ।
हरे पाप[5] ताप. ॥ २८३ ॥ शरीरभावीं अलिप्त । लोभमोहीं विरक्त । जैसें
कमळणीपत्र उदकांत । असोनि अलिप्त. ॥ २८४ ॥ देहाचेनि अनुसंधानें ।
देहाचें मरण येणें जाणें । परि हे आत्मयासि येसेंणे । बोलोंचि नये. ॥२८५॥
हा उपजे ना मरे । सांपडे ना धरे । वोहटे ना भरे । सदा सारिखा. ॥२८६॥
हा न तुटे, न जळे । न चळे, न ढळे । हा आपुले खलीळें । वर्ते चराचरीं.
॥ २८७ ॥ स्वर्ग नर्क हिंडणें । बद्ध मुक्त होणें । हें याचेचि कारणें । वाढ-
विलें. ॥ २८८ ॥ अविद्या अंगीं जडे । तैं अधोगति घडे । जीवपणें जोडे ।
नाथिलेंचि[6]. ॥ २८९ ॥ हा महमाया संगें । खेळे सतहि स्वर्गें । जीवपणें
भोगे । याचे यासि. ॥ २९० ॥ जरि माया अविद्या सोडी । स्वरूपीं लागे
गोडी । तेधवां सायुज्यता रोकडी । याचिपासीं. ॥ २९१ ॥ जैसें एकचि
पाणी । सिंधुसरितापोखरणीं[7] । तें प्रळयोदकीं कैसेंनि । निवडूं जाणे.
॥ २९२ ॥ हा जे जे ठायीं बैसे । तेधवां सोंग धरी तैसें । परिमळ जें असे ।
तेंचि रोखी. ॥ २९३ ॥ हा बहुरूपी म्हणिजे । यातें येणेंचि जाणिजे । याचें
स्वरूप उमजे । ऐसाचि हा. ॥ २९४ ॥ दीपक जरी पहावा । तरि त्याचेनि
प्रकाशें देखावा । कां सूर्यो पाहों जावा । तरि तोचि दावी. ॥ २९५ ॥
मुख जरी पाहिजे । तरि मुखींच मुख देखिजे । वांचुनि आरसा दाविजे ।
ऐसें काय घडे ? ॥ २९६ ॥ रायासि जरि पहावें । तरि आपणासिं दाखवावें ।
वांचुनि दुसरें देखावें । काय कोठें. ॥ २९७ ॥ तैसें एथें पहावया । कीं निमित्य
देखावया । वांचुनि प्रपंचिक काया । देखों न शके. ॥ २९८ ॥ रूपें रूप
लक्षिजे । नयनीं नयन देखिजे । मुखाचाचि आरसा कीजे । या मुखासि.
॥ २९९ ॥ हाचि दावी हाचि देखे । हा आरिसा हाचि मुख । दृश्य द्रष्टा
देरुशण[9] येक । येणेचि आंसिजे[10]. ॥ ३०० ॥ हा डोळियाचा डोळा । हाचि

१. सांडी, सोडी. २. पुट देऊन, आंच देऊन. ३. उत्तम सोनें. ४. शरीरनाशानें.
५. (ब) व्यसनें. ६. नसलेलें, लटकें, खोटें. ७. पोखरण=विहीर. ८. (क) मध्यें ही ओवी
नाहीं. ९. दर्शन. १०. आहे.

सुखाचा सोहळा । याचिये तुकें तुला । हाचि येकु. ॥ ३०१ ॥ हा बहुरूपा-चेनि खेळे । अहंता धरी प्रपंचमेळे । म्हणोनि सत्तारूप न ढळे । दुश्चितपणें. ॥ ३०२ ॥ आपणामाजी सर्व जाणून । सर्व जाहलें पाहिजे आपण । तरीच कल्पनेचें भान । सहजें जाण हारपतसे. ॥ ३०३ ॥ ईदं ज्ञानदेवी टीका । संस्कृताची आइका । कृष्णें अर्जुना देखा । हेंचि निरूपिलें. ॥ ३०४ ॥ ग्रंथा नाम भक्तराज । महाराष्ट्र जाला सहज । भक्तिभावें चिंतन तुज । अखंड हृदयीं असो. ॥ ३०५ ॥ बोले ज्ञानदेव रहस्य । मुक्ताफळाचे घोस । संत सज्जन राजहंस । प्रेमादरें वाचिजे. ॥ ३०६ ॥ श्रवणें पठणें तरिजे मही । अथवा ग्रंथराज संग्रहीं । तया भवभय नाहीं । सत्य सत्य त्रिवाचा. ॥ ३०७ ॥ तीनें शतें पांच वोविया । अर्थ परमार्थ गुंफोनियां । श्रीगुरु निवृत्तिपायां । पुष्पांजळी वाहिली. ॥ ३०८ ॥ शके बाराशें बारोत्तरीं । अलकापुरीं दिव्य-नगरीं । इंद्रायणीचे तीरीं । समाधिस्थ योगिया. ॥ ३०९ ॥ इति श्रीज्ञानदेव विरचित भक्तराज ग्रंथ संपूर्णमस्तु. शालिवाहन शके १७४३ श्रावण शुद्ध पंचमी समाप्त.

---

## १३. ज्ञानेश्वरकृत

### स्वात्मानुभव.

ॐ नमो जी वक्रतुंडा! । कृपानिधि प्रचंडा! । शरीरपूर्णत्वें उदंडा! । परि वेगळाचि. ॥ १ ॥ मग नमूं ते भारती । जे निजानंदें निजशक्ति । अव्यक्त आणिलें व्यक्ती । सत्तामात्रें. ॥ २ ॥ नमूं तो अरूप सद्गुरू । पूर्णानंदें अ-मृतकरू । जयाचे कृपें निर्धारू । कळे स्वरूपाचा. ॥ ३ ॥ तो शिष्यसमु-दायपीयूष । कीं कृपेचा सुधारस । जया अवलोकनें आयास । चुके याता-याती. ॥ ४ ॥ तो सर्वथा मंगळमूर्ति । नित्यानंदें पूर्ण स्थिति । जयाचिया

---

१. बजनानें. २. (अ+ब) स्वस्वरूपीं ठेले. ३. ही ओवी (अ+ब) मध्यें नाहीं. ४.(अ+ब) गीता ज्ञानदेवादिका. ५. (अ) सुकृताची आइका. (ब) संस्कृतचि आइका. ६. (अ) मऱ्हाठा बोलता जाहला सहज. (ब) मराष्ट्र बोलिलों सहज. ७. (अ) हें पुस्तक बळवंतराव परशुराम कोलटकर यांचें असे- स्वहस्तेन लिखितें. मुक्काम सांगली. कार्तिक शु॥ १० शके १७५२ विकृति नाम संवत्सरे. (ब) मध्यें याठिकाणीं फक्त 'श्रीविठ्ठलार्पणमस्तु' एवढेंच आहे. ८. हा ग्रंथ आम्हांस काव्यसंग्रहाकरितां कै० ओकांनीं जमविलेल्या पोथ्यांत मिळाला. ह्या पुस्तकांत आणखी इतर पुष्कळ प्रकरणें असून ह्या पुस्तकावर 'तुकाराम तात्यांच्या वह्यींतील प्रकरणें' असा लेख आहे.

वचनें वृत्ति । स्थिर होय. ॥ ५ ॥ स्थिरावया वृत्तीचें चिन्ह । अन्यथा नाहीं साधन । जे वंदावे चरण । श्रीसद्गुरूचे. ॥ ६ ॥ यया निदानावरी । गुरू [१]आहाति घरोघरीं । मंत्र [२]आगम कुसरी । उपदेशावया. ॥ ७ ॥ शिष्याचिया लोभेंकरून । उपदेश मात्र करिती जाण । परि शिष्याचें जन्ममरण । चुकवी तो गुरू. ॥ ८ ॥ तैसा नोहे माझा श्रीनिवृत्ति । कीरें[३] सखा बोले आत्मस्थिति । करूनि अकर्तृत्वाची गती । [४]सांमावली. ॥ ९ ॥ तेथ शब्दाचें [५]कारण । [६]वचन सांगे उपदेशेंविण । सर्वांगाचें देखणेंपण । जयाचेनि. ॥ १० ॥ [७]अवस्थात्रयाचा देखणा । [८]तुर्यारूपें अवसानां । उन्मनीचिया मूर्छना ।

---

१. आहेत. २. वेद. ३. सं. किल. निश्चयेंकरून. ४. सांठवली. ५. निमित्त. ६. हें नवव्या ओवींतील 'करूनि अकर्तृत्वाची गती'चें उदाहरण आहे. ७. जागृति स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांचा. पंच कर्मेंद्रियत्रिपुटी, पंच ज्ञानेंद्रियत्रिपुटी, प्राणपंचकत्रिपुटी अंतःकरणचतुष्टयत्रिपुटी 'या जीवाच्या एकोणीस त्रिपुटी स्थूल देहाचे आश्रित राहून त्यांसह तो देहेंद्रियद्वारा स्थूल सृष्टींतले सर्व स्थूल विषयांचा यथार्थ उपभोग घेतो, कर्में करितो आणि सर्व कर्मांचा व भोगांचा कर्ता भोक्ता मी आहें असें चांगल्या खबरदारीनें म्ह. यथार्थ ज्ञानानें मानतो. असा यथार्थ सृष्टिव्यवहार ज्या कालांत हा जीव करतो तो काल जीवाची **जाग्रदवस्था** अशी म्हटली जाते.' जेव्हां हा 'जीव बाह्य स्थूल सृष्टि व्यापारास कंटाळून अंतर्मुख होतो, तेव्हां आळस उत्पन्न होऊन निद्रा येऊं लागते, तेव्हां बुद्धि एकोणीस त्रिपुटींचे संस्कार आपले ठिकाणीं धारण करून भोग–भोक्ता–भोगसाधन इंद्रियें आणि भोग्यविषय अशी त्रिपुटी आपणच स्वतः होते. आणि ईश्वराचे स्थूल सृष्टीप्रमाणें हुबेहुब सर्व काल्पनिक सृष्टि निर्माण करिते व त्याचा अनुभव हाच जीव घेतो. अशा प्रकारचे अनुभवावस्थेंत जोंपावेतों जीव असतो, तोंपर्यंत ती जीवाची **स्वप्नावस्था** होय. स्वप्नावस्थेंत जीव आणि बुद्धि कंठदेशस्थहिता नाडींत असतात. पुढें कांहीं कालानें जीव व बुद्धि हृदयस्थानीं प्रवेश करून बुद्धि कार्याक्षम होते. आणि सर्व कल्पनेच्या अभावांत आपणहि लीन होते. बुद्धीची विचारशून्यदशा तेंच अज्ञानाचें स्वरूप होय. ह्या हृदयस्थानीं केवळ अज्ञान व अज्ञानाचा साक्षी जीव असे दोघे एकत्र असतात तोंवर ती जीवाची **सुषुप्तिअवस्था** होय–' हीं तीन लक्षणें रा. रा. रामराव कृष्ण जठार यांचें 'स्वानंदसाम्राज्य' पुस्तकांतून सारांशरूपानें घेतलीं आहेत. ८. मागील अवस्थाना साधारण अशी जी नेहमींची अवस्था तिला **तुरीयावस्था** म्हटलें आहे. हिचें लक्षण विष्णुबोवा ब्रह्मचारी यांनीं आपल्या वेदोक्तधर्मप्रकाशांत पुढीलप्रमाणें दिलें आहे. "शरीराचा व जगताचा साक्षित्वभाव आणि संकल्पविकल्प सोडून ज्ञानाचें एका पंचप्राणरूप शुद्धवायूचे आधारानें ... ... आपण निराकार तत्वच आहों ... ... व जग नाहींच असें अनुभविणें ... ... आणि यामुळें भय व इच्छारहित होऊन अतिशय सुखी होणें अशा ज्ञानीच्या अवस्थेला तुरीय अथवा उत्तम अवस्था हें नांव आहे. ह्या अवस्थेचा

जाणता तो. ॥ ११ ॥ दृश्याचा होय निरास । दर्शनाचा चुके आयास । द्रष्टेपणें डोळस । तोचि श्रीगुरू. ॥ १२ ॥ श्रीगुरूचरणारविंदा । सुखा-सुख, परमदोंदा[1]! । मार्ग सांडूनि आनंदा । परता होय. ॥ १३ ॥ नेत्रांपुढें धांवत । असोनि, चक्षूसि अतीत । चक्षुरूपें जें वर्तत । जाण तें रूप. ॥ १४ ॥ देश इंद्रियांचें वोडण । एकादशाचें[2] कारण । तयाचें समूळ उ-त्थान । प्रभासे पैं. ॥ १५ ॥ बुद्धि निश्चयात्मक । तियेचें जें द्योतक । कर्तृ-त्वाचें कौतुक । साहोनि राहे. ॥ १६ ॥ अनुभवितां स्वरूपासी । आपणचि होय निश्चयेसीं । नेणणेचि जाणणयासी । प्रकाशरूप. ॥ १७ ॥ शब्द स्पर्श रूप रस । गंध यां सकळांस । प्रकाशरूपें प्रत्यक्ष । जाण तें रूप. ॥ १८ ॥ ऐसें जयाचेनि प्रसादें । आणि स्थितीचेनि आनंदें । राहिलीं स्वर्गादि पदें । अशाश्वतें. ॥ १९ ॥ साक्षरूपाचिया संगती । बद्धमुक्तीची फिटली भ्रांती । प्रपंचीं[6] विराली मती । असोनियां. ॥ २० ॥ किं मावळलिया भान । तथापि राहिला द्रष्टा होउन । दग्धपटदर्शन । मात्र दिसे. ॥ २१ ॥ ऐसा श्रीगुरूचा उपकारू । उत्तीर्ण होआया कवण प्रकारू । जयाचेनि स्वरूप निर्धारु । ठसा-वला राहे. ॥ २२ ॥ येथ मार्ग भिन्न भिन्न । मतें स्थापून शिष्यांलागुन । धरूनि नानाभिमान । भ्रमरूप. ॥ २३ ॥ लय लक्ष उपासना । अष्टांगयोग-साधना । परि चुकले निधाना । जवळि आसतां. ॥ २४ ॥ जैसा स्वकंठींचा मणि । विसरला भ्रमेंकरुनि । कीं निधान असतां पाणीं । दैनें[11] चाळी. ॥ २५ ॥ येक परमार्थाचें उत्तर । बोलती वस्तु निराकार । परि तें स्वरूप निर्धार । ने-णती कीं! ॥ २६ ॥ ज्ञान नाहीं हा आभासु । रूप नाहीं निराभासु । न लिं-पोनियां सर्वांस । संगोपूनि असे. ॥ २७ ॥ निवृत्तीशचरणवंदन । प्रसाद

---

शुद्ध सत्वगुण असून ... ... ही सर्व अवस्थांचें मूळ आहे. उन्मनी म्हणजे मनरहित होणें. ही अवस्था तुरीय अवस्थेचेंच उन्नत स्वरूप होय." हंसराजस्वामींनीं आपल्या सदाचारावरील टीकेंत तुरीय अवस्थेचें निराळें लक्षण न देतां उन्मनीचीच व्याख्या पुढीलप्रमाणें केली आहे. ॥ उभयविषयाचें अंतर । मध्यसंधि निर्विकार । जे वृत्तिदशा अनाधार । ते उन्मनी बोलिजे १६२४. जेथें मन असें समान । विचाराचें नव्हे भान । हेंचि उन्मनीचें लक्षण । सप्रतीत पाहे. ॥" ९. शेवटीं.

१. सुखाच्या सुख आणि सर्वव्यापका! २. पंचकर्मेंद्रियें व पंचज्ञानेंद्रियें. ३. पडदा, उपाधि. ४. मनाचें. ५. जाळूनियां तृण । अग्नीहि विझे आपण । तैसें अज्ञानातें घालवून । ज्ञानहि पुरे ॥ (ज्ञानेश्वरी). ६. 'प्रपंचीं असोनियां मती विराली'–असा अन्वय. ७. आभास. ८. हे योगांतर्गत प्रकार आहेत. ९. हातांत. १०. दैन्यानें. ११. व्यवहार करितो.

परम गहन । राहिलों कूटस्थ होऊन । गुणातीत. ॥ २८ ॥ कां तयावरीच स्वभाव । अंबुनिधीक्रीडाठाव[2] । सेखीं[3] सांडूनिया लेवें[4] । टाकी सर्व. ॥ २९ । तयापरी सर्वगत । सर्व चाळणें अचळ होतें । तेंचि क्रीडा तयाची सत्य न लिंपोनियां. ॥ ३० ॥ नानासरोवरीं कुमुदिनी । तया जळामाजि असोनी न लिंपेचि तेणेंकरूनि । तैसी वस्तु. ॥ ३१ ॥ कां खेमाजि[5] तरणी[6] असे सवळ चळे तेणें प्रकाशें । परि तया कर्तृत्वाचें पिसें । आथीचिना[8]. ॥ ३२ । फटिकशिळा ते निर्मळ । उपाधिसंगें दिसे सरळ (समळ?) । ते स्वच्छ निर्मळ उपाधि भिन्न. ॥ ३३ ॥ भिन्नाचा जो प्रकारू । उभारामात्रचि[9] कीरूं[10] । जैस मृगजळाचा पूरु । तेंनूंन्यायें[11]. ॥ ३४ ॥ अहंता अहंते उठत । हा भास मात्रचि होत । नया अहंकारातें देखत । तेंचि रूप. ॥ ३५ ॥ वस्तु सांगावया कारणें । चौघे[12] राहिले मुकेपणें । अठरांचीं[13] अंतःकरणें । हिंपुटीं[14] जालीं. ॥ ३६ ॥ सोहीजण[15] खटपटित । चौदांजण[16] वेवांदत[17] । इतुक्यांही जाणत । तेंचि निज. ॥ ३७ ॥ शशांक मुख्य गगनीं । प्रतिबिंब भिन्न उपाधि जीवनीं । बाहेर जालिया उपाधिलागुनि । बिंबचि असे. ॥ ३८ ॥ तैसें उपाधीचेनि भेदें । वस्तु भासे विविध । परि तें कूटस्थ विनोदें । साक्षित्वें असे. ॥ ३९ ॥ वारा दिसे वागुरें सांपडला । आणि पाशबंदीं पडिला । परि तो तेथुनिही दंडुला । निघोनि जाये. ॥ ४० ॥ गेला म्हणों तरी तेथेंचि असे । आपणचि सर्वांसी पैसा दिसे । परि न सांपडे, आपैसें । आकाशवत. ॥ ४१ ॥ घटमठउपाधी (जोणा?) । उपाधिसंगें दिसे चळण । वास्तव्य विचारें अखंडपण । नवजाय तयाचें. ॥ ४२ ॥ लोहसंगें दोंहक । पिटे[23] ऐसें देखती लोक । परि लोहासीच घाय अनेक । वन्ही जैसा तैसा. ॥ ४३ ॥ तैसें उपाधिचें चेतव्य । आणि बुद्धीचें बोद्धव्य । याचेनि तो निरावेवें[24] । विकारी दिसे. ॥ ४४ ॥ श्रोत्रेंविण ऐकत । नेत्रेंविण देखत । जिव्हेविण चाखत । तोचि येकु. ॥ ४५ ॥

---

१. आत्म्यातें पावून. २. स्थान. ३. शेवटीं. ४. घेतलेलें स्वरूप. ५. आकाशांत. ६. सूर्य. ७. वेड. ८. सं. अस्ति=आथी=आहे. आथीचिना=नाहींच. ९. केवळ दिखाऊपणा. १०. निश्चयेंकरून. ११. त्या न्यायानें. १२. चार वेद. १३. अठरा पुराणांचीं. १४.(हीन+पुट) म्लानवदन. १५. सहाशास्त्रें. १६. चौदाविद्या. १७. वादविवाद करितात. १८. तें इतक्या सर्वांनां ओळखतें, त्याला मात्र कोणी समजत नाहीं—असा भाव. १९. जाळ्यांत. २०. पुरुष, पठ्ठ्या. २१ स्वस्थ असून (जाण) (?) सहज. २२. अग्नि. २३. ठोकला जातो. २४. निरवयव.

एवं सर्व इंद्रियगत । सर्व करूनि सर्वातीत । सर्वांसारिखा भासत । परि रूप नाहीं. ॥ ४६ ॥ जंव दृश्याचें अवलोकन । तंव द्रष्टत्वें करी उत्थान । सेखीं तयातेंही गिळून । वेगळें पडे. ॥ ४७ ॥ या पांचांमाजील पंचकृत्व । जडातें सत्तेनें उठवित । सेखीं तयातें नातळत । विलक्षण. ॥ ४८ ॥ जंव जंव पाहूं जात । तंव तंव दूरी पळत । सेखीं पाहतां धांवत । सर्वांहि पुढें. ॥ ४९ ॥ पुढें म्हणों तरि मागें आहे । आपणचि वर्ते या देहें । सेवटीं यातेंही सोडूनि राहे । साक्षिरूप. ॥ ५० ॥ बहु कठिणाहूनि कठिण । सोपें तरि करतळाप्रमाण । गुणातीत निर्गुण । गुणी वर्ते. ॥ ५१ ॥ प्रथम जागृतदशे । रजोगुणनेत्रा समरस । तथ जागृतीचे असे । प्रकाशरूप. ॥ ५२ ॥ स्वप्नावस्था सत्वेंसी । कंठस्थान संयोगेंसी । अनुस्यूत देखे त्यांसी । परि वेगळा तो. ॥ ५३ ॥ सुषुप्ति दिसे तम । जयाचें हृदय धाम । तयाचें सुख जें परम । जाण तें रूप. ॥ ५४ ॥ तुर्यावस्था साक्षिणी । प्रत्यगात्मा याच गुणी । तूर्येतेंहि विलक्षणीं । टाकूनि देत. ॥ ५५ ॥ आणि जाणोनि ठकावलें ठात । कार्याचे परि उभें राहात । सेखीं तयातेंहि सांडित । जाणावेना. ॥ ५६ ॥ यया शरीरीं वर्तमान । उत्पत्ति स्थिति प्रळय जाण । स्थूळाचें त्रिकाळ ज्ञान । जयाचें रूप. ॥ ५७ ॥ लिंगं म्हणती जयासी । जें कां वर्ते पंचं कोशांसी । तया देखणें ययांसी । म्हणूनि वेगळा तो. ॥ ५८ ॥ आतां पंचदश विकार । ते परिस चतुर ! । जया अभिमानी रमावर । तें सांगूं पां. ॥ ५९ ॥ येक प्रकार मन, । दुसरें चित्त, तिसरें अंतःकरण । चौथा अहंकार जाण, । पांचवी बुद्धी. ॥ ६० ॥ पंचतन्मात्रा वर्तमान । पंचभूतांचे सूक्ष्म गुण । यांचें असे जया ज्ञान । तें घे तें रूप. ॥ ६१ ॥ त्रिगुणें संवळित ।

---

१. पंचभूतांतील. २. चेववीत, विकार उत्पन्न करीत, जडाला प्राण्याचें वगैरे रूप देत. ३. शिवत नाहीं, निराळाच असतो. ४. पूर्णपणें मिळे. ५. जागृतीमध्यें परब्रह्मांश नेत्राच्या ठिकाणीं असतो व स्वप्नामध्यें कंठाच्या ठायीं असतो. ६. अखंड. ७. स्वप्नास. ८. जीवात्मा. ९. ठकविलें जाऊन राहतें. ज्ञानप्राप्तीनंतर जाणणें ठकून राहतें, म्ह० जाणणें ही वस्तुच नाहींशी होते. १०. प्रत्यगात्म्याचें चिन्ह. ११. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय असे पांच कोश. १२. वर जें अंतःकरणपंचक सांगितलें त्याचे विषयः—(१) अंतःकरण हें निर्विषय आहे. (२) मनाचा विषय संकल्पविकल्प. (३) बुद्धीचा पदार्थ निश्चय. (४) चित्ताचा चिंतन. (५) अहंकाराचा पदार्थ ममता. १३. पंचभूतेंः—आकाश, वायु, अग्नि, आप आणि पृथ्वी. यांचे गुण अनुक्रमः—वायु व्यापून राहणें, चलनवलन करणें, प्रकाश आणि दहन करणें, वाहणें व जीव निववणें, आणि सकल निर्माणाला आधार असणें. १४. युक्त.

जयाचें जें कर्तृत्व । तयातें जें जाणत । तेंचि रूप. ॥ ६२ ॥ धृतिस्म जाणिजे । अथवा विस्मर भाविजे । तें तये धृतीचें जाणणें जाणिजे । ते पैं चिन्मात्र.[1] ॥ ६३ ॥ चेतनारूपें चेतन । अचेतनें चेतन । जयाचें जया ज्ञान । तें चैतन्य पैं. ॥ ६४ ॥ आणीक ही प्राणपंचक । जें यया श चाळण सकळिक । क्षुधा तृषा कवतुक । प्राणगत. ॥ ६५ ॥ यया प्राण चत्वें चाळिता । अथवा माघ्रनें करुनि स्तब्धता । यया कर्तृत्वाचा ज्ञाता तो [2]घे तूंचि. ॥ ६६ ॥ शोकमोहा पावे मन । अथवा असे समाधान त्याचें असे जया ज्ञान । तो घे तूंचि. ॥ ६७ ॥ अव्यक्त इंद्रियें [3]लैया जात तयाचें वि[4]स्मरण धृ[5]ती निश्चित । तयाचें ज्ञान जया होत । तो घे तूंचि ॥ ६८ ॥ तथापि चित्तीं असे असमाधान । विषयास्तव मूढजन । तयासि सर्वथा नोहे ज्ञान । कल्पांतवरी. ॥ ६९ ॥ तया ज्ञानाची प्राप्ति । करावया नाहीं [6]आन साधनवृत्ती । येक ते सज्जनसंगती- । वांचूनिया. ॥ ७० ॥ येक व्यर्थ [7]अन्हांटा भरले । [8]षट्चक्रें भेदूं लागले । देखत देखत नागवले । [9]साधनी-भूत. ॥ ७१ ॥ जेथ हा [10]देहत्रयातीत [11]। मां कैंचा चक्रांचा सांघात । तयाचें देखणें वर्तत । म्हणोनियां ॥ ७२ ॥ जेथ ठावोचि नाहीं ग्रामा । तेथ कैंची असेल सीमा? । तेंवि निर्गुण निरूपमा । कैंचीं चक्रें? ॥ ७३ ॥ [12]स्थूळ सूक्ष्म कारण । [13]विश्व तैजस [14]प्राज्ञ । जागृती स्वप्न सुषुप्ति [15]सगुण । तो द्रष्टा जयाचा. ॥ ७४ ॥ जेधवां साक्षि ऐसा कळला । तेधवांचि मुक्तिपदा गेला । मुक्त म्हणों तरी बांधला । [16]काइ होता? ॥ ७५ ॥ यया आत्म्याचें स्वरूप कैसें । तरि नाहीं कासया [17]ऐसें । [18]आपणपें प्रकाशे । तो घे तूंचि. ॥ ७६ ॥ पी[19]तता नाहीं त्यासी । श्वेत [20]कर्पूर (रक्त) कृष्ण वर्णासी । रूप आणि रेखेसी । स्पर्शेना तो.

---

१. ज्ञानमात्र. २. जाण. ३. कारणांत लीन होतात. नष्ट होत नाहींत. ४. अभाव. ५. धारण करणें, भाव. ६. अन्य, दुसरी. ७. आडमार्गाला. ८. शरीरांतील सहाचक्रें. त्यांचीं नांवें:—आधार, स्वाधिष्ठान, मणिपुर, अनुहत, विशुद्ध आणि अग्नि. यांचीं स्थानें अनुक्रमानें येणेंप्रमाणें:—गुद, लिंग, नाभि, हृदय, कंठ आणि नासिक. प्राणवायूचा या क्रमानें निरोध करून शेवटीं ताळू फोडून आत्मा ब्रह्मांडीं नेऊन मोक्षप्राप्ति होते. ९. साधनांत गढलेले. १०. आत्मा. ११. स्थूल, सूक्ष्म आणि कारणदेह यांहून निराळा. १२. हे तीन देह. १३. या तीन देहांच्या अभिमानी देवता. १४. ह्या त्यांच्या अवस्था. १५. सत्वरजतमोगुणयुक्त. १६. काय. १७. अमुक एक प्रकारचें असें. १८. आपणाजवळच. १९. 'पीता भास्वत्यणूपमा' या योग-वाक्याच्या सिद्धांतावरून आत्म्याचा वर्ण पिंवळा आहे. २०. विरोचनमताप्रमाणें आत्मा श्वेत, कृष्ण आणि रक्तवर्णात्मक आहे. येथें पीत वगैरे शब्दांनीं आत्म्यासंबंधानें रूपाचा निषेध केला आहे.

॥ ७७ ॥ म्हणावें आकाशवत । तरि पोकळी ऐसें भासत । तया पोकळीमाजि [1]घन असत । तयातीत. ॥ ७८ ॥ अवकाशामाजि भरलें । परि रूपासी नाहीं आलें । नवचे कासयासारिखें बोलिलें । तें घे तूंचि पैं. ॥ ७९ ॥ गभस्ति वर्ते गगनीं । त्रिकाळ [2]जेयातें व्यापुनी । तयाचे उष्ण किरणीं । अबाधित. ॥ ८० ॥ आणि [3]हुताशनीं लीन । अथवा दीप्यमान । ना तरि धूम्राचें संकोचन । तयावरी. ॥ ८१ ॥ तया [4]लीनंते नोहे [5]शांत । ज्वाळेंकरुनियां न पोळत । [6]धुंवा [7]हाहाभूत । [8]कैचें नोहे? ॥ ८२ ॥ तया अग्निमाजी असे । तरि तेणें उपाधिस्थ भासे । पुनरपि तयाचें पिसें । लागों नेदी. ॥ ८३ ॥ [9]व्योमीं [10]निशांपति किरण सीतळ । सीतामाजि प्रबळ । व्यथा न पवे केवळ । वेगळा [11]ठाके. ॥ ८४ ॥ तयाचें वर्तुळपण । क्षय अथवा संपूर्ण । [12]नें लिंपोनियां, वर्तमान । तेथेंचि असे. ॥ ८५ ॥ असे म्हणों तरी नकळे । न लिंपे दृष्टीचेनि मेळें । नेणों म्हणों तरि येकवेळे । व्यापूनि असे. ॥ ८६ ॥ आपणचि सर्व करित । सर्वांसारिखे सर्वीं वर्तत । सेखीं म्हणे मी साक्षिभूत । ऐसा [13]नष्ट. ॥ ८७ ॥ नष्टतां हाही बोल । प्रपंच अवघा फोल । पाहतां तरी सखोल । उथळ बहू. ॥८८॥ दृष्टांतासि न लिंपे । करुनि कांहींचि न घे पे । सर्व [14]आपणावरि [15]नें सिंपे । दीपवत. ॥ ८९ ॥ दीपाविण कांहीं न पडे देठी । कां गभस्ति न चाले सकळ सृष्टी । तैसी [16]जडग्रंथि [17]यांचेनि [18]उठी । तरि म्हणे मी द्रष्टा. ॥ ९० ॥ मी म्हणणें हें अहंकारवेष्टित । ये वृत्तीतेंही ज्ञाता हाणत । यया द्रष्टत्वें जें देखत । तें गे तें ब्रह्म. ॥ ९१ ॥ जंव शब्दाचें उत्थान । तया शब्दातें जाय व्यापून । शेवटीं राहे ज्ञाता होऊन । तें गे तें ब्रह्म. ॥ ९२ ॥ ब्रह्मादि पिपीलिकेपर्यंत । एकचि वर्ते [19]अनुस्यूत । उपाधिवेगळें भासत । परि येकचि तें. ॥ ९३ ॥ रजोगुणी अहंकारु । करी जो व्यापारु । तयाचा ज्ञातारू । तोचि आत्मा. ॥ ९४ ॥ इच्छा मद मत्सर । क्रोधादि गुणविकार । याहूनि वेगळा निर्धार । भानुवत. ॥ ९५ ॥ सत्वाचिया [20]पडिभारा । सुखपुण्य प्रकारा । न लिंपोनिया, विकारा । सांडित असे. ॥ ९६ ॥

१. भरलेलें. २. गगनातें. ३. 'दिनान्ते निहितं तेजः सवित्रेव हुताशनः' रघुवंश. ४. अग्नीमध्यें लीन झाल्यानें. ५. याचा कर्ता 'गभस्ती' (सूर्य). ६. धूरानें. ७. त्रास पावलेलें. ८. हें आकाशाचें वर्णन. ९. आकाशांत. १०. चंद्र. ११. कर्ता 'निशापति.' १२. नातरि सोळा । दिशीं वाढती कळा । चंद्रीं चंद्र सगळा । संपूर्ण जेंवी ॥ (अमृतानुभव). १३. नाहींसा. १४. आत्म्यावर. १५. शिंपलें जात नाहीं, चिकटत नाहीं. १६. चिज्जडग्रंथि. १७. आत्म्यामुळें. १८. उत्पन्न होते. १९. अखंड, सदोदित असणारा. २०. पडिभार=आधिक्य.

तमोगुणें निद्रालस्य । याचेनि तया समरस । शेखीं होय उदास । कर्तेपणें.
॥ ९७ ॥ श्लेष्मादि वातपित्त । हें स्थूळदेह पैं कुश्चित । ययामाजि भरलेसे
सदोदित । परि नातळे तया. ॥ ९८ ॥ एक आपलिये भ्रांती । स्थूळबुद्धि
ऐसें म्हणती । ऐक्य तरि एक स्थिती । असावी सर्वां. ॥ ९९ ॥ एका जालें
मरण । तरि सकळां व्हावें निदान । एकाचेनि दुःखें आन । कां दुखवेना.
॥ १०० ॥ येका भोजन मिळालें । तेणें जग पाहिजे धालें, । अथवा ए-
कासि मुक्तिपद आलें । तरि सर्वहि मुक्त. ॥ १०१ ॥ तरि एक एथ
दृष्टांत । गभस्ती अंबरीं वर्तत । घट भरले एक शत । तयांमाजि
बिंबे. ॥ १०२ ॥ एक कुंभीं चांचल्यता । भानुबिंब दिसे हालवता ।
तरि काय घटशतां । चांचल्य पावे ? ॥ १०३ ॥ अथवा एक भंगला । तरि
काय सर्वांतून भानू गेला? । तो तरि असे संचला । घटचि भंगे. ॥ १०४ ॥
तैसें चिन्मात्र सर्वत्र असे । देहसंबंधें गेलें भासे । परि वस्तुता आपैसे । गगन-
वत. ॥ १०५ ॥ अंबर भरलें दिसे घागरीं । कुंभा दिधलियां भोंवरी । भोंवत
दिसे तये बरोबरी । परि तें काय भोंवे ? ॥ १०६ ॥ भ्रमत असतां कुंभासी ।
काय भ्रमण होय पोकळीसी ? । तदन्यायें चैतन्यासी । नाथिलेचि हे. ॥१०७॥
कां लोहसंगें पीटण । दिसे पावकालागून । तैसें उपाधिसंगें चैतन्य ।
नाथिलें दिसे. ॥ १०८ ॥ एकाचें मरण आनासी । येणें न्यायें न पवे मरणासी ।
सुखदुःख एकाचें एकासी । नोहे ऐसें. ॥ १०९ ॥ पृथ्वी तरि एक । मठमंडप
गोपुरें अनेक । एकासि लागला पावक । कां दग्ध न होती सर्वे ? ॥ ११० ॥
कां पडतां मेघवासी । जळें पतन होय एखादियासी । तरि काय अवघिया
गृहासी । पतन होय ? ॥ १११ ॥ एक शरीर अवेव । दिसतसे बिंबाची ठेव ।
आघवें मिळोनियां नांव । तनुचि पै तें. ॥११२॥ तेथ एकेका अवेवासी । प्रांचीनें
पावे दुःखासी । तरि काय सर्वांसी । पीडा होय ? ॥ ११३ ॥ एकचि तरि
कपाळ । अर्धसिसी उठे एक वेळ । तरि काय सकळ । दुःख पावे ? ॥ ११४ ॥
अथवा देह उष्णें तापला । तेणें उदकीं एक हात घातला । सुखें सर्व शरीरीं
निवाला । घडे केंवी ? ॥ ११५ ॥ आतां मायावैभवगणन । सागरीं तरंग
अनेअन । सर्वांमाजि वन । एकचि असे. ॥ ११६ ॥ एकेचि जळीं तरंग

---

१. सारखेपणा, तादात्म्य. २. जडबुद्धीचा मनुष्य. ३. शेवट. ४. आपोआप (सहजच) असे. ५. फिरविणें, गर्का. ६. नाहीं. ७. पिटणें=ठोकणें. ८. नाश पावलेलें. ९. पर्जन्यास. १०. प्रारब्धानें. ११. अन्य अन्य; वेगवेगळे.

उठत । एका आघातें अवघे न फुटत । तरि काय म्हणावें तेथ । जळ भिन्न. ॥ ११७ ॥ तैसा आत्मा अनुस्यूत[1] । देखणेपणें सर्वी असत । उपाधीनें सुखदुःख दिसत । तो साक्षी तयाचा. ॥ ११८ ॥ दोघांजणां कलह आरंभला । एकें एकु पीडा पावला । तेथें साक्षी होता ठेविला । तो काय हारबळे तेणें. ॥ ११९ ॥ अथवा दोघे इष्ट भेटले । एकें एका सुख पावले । तरि देखतिया अनारिसें[3] जालें । काय लभ्य तेथें ? ॥ १२० ॥ तैसा न लिंपे सर्वांसी । मों[4] पाप पुण्य कैंचें त्यासी । सर्वथा न पवे बंधनासी । मों मोक्षु कैंचा ? ॥ १२१ ॥ एक ऐसें बोलती । पिंड ब्रह्मांड एकस्थिति । तरि देवा अधिक शक्ति । मनुष्यां न्यून. ॥ १२२ ॥ कृष्णें गोवर्धन उचलिला । येरा गोटा नवजाय लोटिला । तरि ऐक्य या बोला । घडे केंवि. ॥ १२३ ॥ आतां एकचि दृष्टांत । वृक्ष तरि एकचि असत । खांड स्थूळ न हालत । नागाचेनि[5]. ॥ १२४ ॥ पुढें तया खांदियांसी । क्षीणता अधिक त्यासी । तरि काय आन नामासीं । पावों सके. ॥ १२५ ॥ अथवा एक ऐसें पुसे । जें सर्वहि एकचि असे । तरि कुंजर न मरे मनुष्यें । हाणितां क्षणीं. ॥ १२६ ॥ पिपीलिकेवरि पडतां चरण । तात्काळ त्यजी प्राण । नागासंघट्टणें[6] पावती मरण । पशु आणि नर. ॥ १२७ ॥ काय करणें कुतर्कासी । तरि परियेसा दृष्टांतासी । दीप होतां वातस्पर्शी । तात्काळ नासे. ॥ १२८ ॥ तोचि अग्निसी पवन । स्पर्शतां होय दैदीप्यमान । तरि दीपक आणि पावक भिन्न । असे काय ? ॥ १२९ ॥ तैसें तयाचें स्थूळ शरीर । तेथें तैसाचि शक्तिबळात्कार । उपाधीचेनि लघु थोर । आत्मा जैसा तैसा. ॥ १३० ॥ विरिंच्यादि पिपीलिकेपर्यंत । ज्ञान एकचि अनुस्यूत । जेथें कर्तृत्व होत । तेथें जाणीव सारिखी. ॥ १३१ ॥ जनक नृपपणें भोगितां । त्रिगुण इंद्रियें अहंता । साक्षित्वें पावला विदेहता । नरोत्तम. ॥ १३२ ॥ श्रीशंकर करी संहार । सेखीं जाणिवेचा करी विचार । कर्तृत्वाचा सांडूनि अहंकार । म्हणे मी वेगळाचि. ॥ १३३ ॥ तमाचा गुण संहारण । तेणें तरी तयाचें कारण । शंकर तयाचें कार्य जाण । मी द्रष्टा ययाचा. ॥ १३४ ॥ ब्रह्मा रजोगुणें सृष्टी करी । परि मी म्हणे अकर्ता निर्धारी । हें गुणाचें गुण करी । मी साक्षी वेगळा. ॥ १३५ ॥ तैसाचि विष्णु जग पाळित । होतां सेखीं होय तयातीत ।

१. एकसारखा असणारा, कायमचा. २. इजा पावे. ३. निराळें. ४. मग. ५. हत्तीच्यानें. ६. हत्तीशीं झगडून.

हें सकळ सत्वगुण करित । मी साक्षी ययाचा. ॥ १३६ ॥ हाचि[1] दावावया चमत्कारू । पाठविला दुर्वासऋषी आहारू । यमुनेचा वोसरावया पूरु । बोलती अंगना. ॥ १३७ ॥ कृष्ण जरि बाळब्रह्मचारी । तरि तूं वोसरें झडकरी । मार्ग दिला सुंदरी । पैलतीरा. ॥ १३८ ॥ याचा ऐसा अभिप्राव । रतिमदनाचें वैभव । तयाचा देखणा केशव । लिंपे केंवि. ॥ १३९ ॥ तैसेंचि तयाचें उत्तर । इतुकें खाऊनि निराहार । मार्ग दिला सत्वर । या बोलावरी. ॥ १४० ॥ अभिप्राव ऐसा या बोलाचा । क्षुधातृषा भाग प्राणाचा । आपण साक्षी तयाचा । म्हणूनियां. ॥ १४१ ॥ आतां हिरण्मय[3] पुरुष । ब्रह्मा विष्णु रुद्र जयाचे अंश । प्रसवला परि तयास । लिप्त नोहे. ॥ १४२ ॥ जे जे कर्तृत्वगती । ते म्हणावी विष्णुरुद्राची ख्याती । आणि हे माया असे करिती । जाणता तो. ॥ १४३ ॥ यालागिं आपणचि जाला । सकळ आपण करूं लागला । बोल येऊं नेदी दैंदुला । म्हणे मी साक्षी. ॥ १४४ ॥ तेथिंची जे जागृती । तया अभिमानासरिसी उद्भव निश्चिती । ते विरिंचीकर्तृत्वगती । म्हणोनि जाणे. ॥ १४५ ॥ लिंगदेह तेथिंचा । विष्णु अभिमानी साचा । हिरण्य देखणा हरीचा । म्हणोनि वेगळा. ॥ १४६ ॥ तमोगुणीं संहारण । सुषुप्ति तेथील खुण । आपण तयातें जाणे म्हणोन । वेगळाचि. ॥ १४७ ॥ एवं सकळ स्वभावासी । विराजमाने सर्वांसी । म्हणोनि न लिंपे कर्तृत्वासी । पुरुष तो. ॥ १४८ ॥ तैसीच पिंडीं गती । आत्मा सर्वभूतीं । न सांडी साक्ष संगती । परि वेगळा तो. ॥ १४९ ॥ पुरुषीं मायेचा निरासु । पिंडीं अविद्येचा नाशू । दों साक्षित्वें सौरसु । सहजें ऐक्य. ॥ १५० ॥ मायेचें करणें ऐसें । एकचि परी अनारिसें । पुरुषीं लाविलें पिसें । आपुलेनि बळें. ॥ १५१ ॥ प्र-

१. एकदां दुर्वासमुनि यमुनेच्या पैलतीरावर आले असतां कृष्णांनीं गोपींनां सांगितलें कीं तुम्ही सर्वजणी पुष्कळ अन्न घेऊन दुर्वासाकडे जा, कारण त्याचा आहार फार मोठा आहे. तेव्हां यमुना दुथडी भरून जात असल्यामुळें गोपींनीं विचारिलें, 'आम्हांला वाट कशी मिळेल ?' कृष्णानें उत्तर दिलें, 'जर १६१०८ स्त्रिया उपभोगून कृष्ण ब्रह्मचारी असेल तर तूं वाट दे असा निरोप तुम्ही यमुनेला सांगा म्हणजे तुम्हाला वाट मिळेल.' गोपींनीं त्याप्रमाणें करितांच यमुना दुभागली व त्या दुर्वासाकडे गेल्या. दुर्वासानेंही जेवण झाल्यावर सांगितलें कीं, 'इतकें अन्न खाऊन जर मी भुकेलेला असेन तर वाट दे असा निरोप यमुनेस सांगा.' त्याप्रमाणें करितांच गोपींना पहिल्याप्रमाणें वाट मिळाली. २. गोपींनां. ३. हिरण्यगर्भ नामक प्रथम पुरुष. ४. पराक्रमी पुरुष. ५. स्वप्नांतील सुखदुःखाचा अनुभव घेणारा सूक्ष्मदेह. ६. हिरण्यगर्भ. ७. पाहणारा. ८. सोडी. ९. कारण (?). १०. वेगळें.

थम मायेंपासून । पंच भूतें जालीं निर्माण । आकाशाहोनि विलक्षण । पवन असे. ॥ १५२ ॥ पवन व्याला हुताशनासी । घेऊनि उठला दाहकत्वासी । तो व्याला जीवनासी । परि वेगळा तो. ॥ १५३ ॥ जीवनापासोनि जन्म । पृथ्वी ऐसें जालें नाम । तें जाड्यत्वें निःसीम । दिसतसे. ॥ १५४ ॥ परि मायावशें तोचि नटला । लटिकाचि खेळ आरंभिला । सेखीं हो उरला । वेगळाची. ॥ १५५ ॥ एकाची ऐसी बुद्धी । जे असावी निर्विकल्प[1] समाधी । तरिच बोलिजे सिद्धी । ऐसें मत्त. ॥ १५६ ॥ नानामतांतरें मार्ग । ब्रह्मीं उपाधी न साहे अनेग[2] । तेथें समाधीचें अंग । तो नातळे[3]. ॥ १५७ ॥ समाधि म्हणिजे मन समाधान । तयातें राहे द्रष्टा होऊन । समाधि अथवा असमाधान । हे धर्म मनाचे. ॥ १५८ ॥ तथापि सांगों उन्मनी । गुरुसंप्रदायेंकरूनी । शिष्याचिया माथां ठेवोनि पाणी । उपदेशमार्ग. ॥ १५९ ॥ नांवरूपदृश्यातीत । अवघिया वृत्ती सांगे कृपावंत । न कळे तरि शक्तिपात । बळेंचि करी. ॥ १६० ॥ तेथिंचा अनुभव कैसा । तरि नोहे सुषुप्ति ऐसा । करणीवीण पावे ठसा । उन्मत्तवत. ॥ १६१ ॥ जैसें उन्मत्त द्रव्य भक्षिलें । नें[4] झांकोनि नेत्र झांकिले । सर्वांग शोषण झालें । जडवत. ॥ १६२ ॥ सर्वेही शरीर विकळ । पादपाणी चळवळ । जिव्हा किंचित बेंबळ । ऐसी दशा. ॥ १६३ ॥ मुहूर्त जालिया ऐसें । म्हणिजे चैतन्य ओतिलें तये मुसे । साक्षित्वें[5] वसोनि नसे । सर्वांमाजी. ॥ १६४ ॥ ऐसें करी तो कीरँ[6] । निर्गुण तोचि जाला साकार । तेणें तारिलें चराचर । संशयो नाहीं. ॥ १६५ ॥ जग तरे तयाच्या नामीं । जेथ वसे ते धन्यभूमी । तया संघट्टणीं संगमीं । तरती जड. ॥ १६६ ॥ जो न चोरी आपुले जाणिवेसी । प्रगट साक्षेपें सांगे जगासी । भाग्यें करोनि एखादियासी । प्राप्त होय. ॥ १६७ ॥ जगाचे न देखे दोषगुण । न बोले निंदावचन । म्हणे हा सकळही जगजीवन । क्रीडा करी. ॥ १६८ ॥ बहुरूपी नाना वेषधारी । आणि आपणचि संपादणी करी । हे विश्वाची कर्तृत्वसरी । ऐसी या रीती. ॥ १६९ ॥ शिष्याचे तोडावया पाश । समाधान[7] न बोले तयास । शब्दाप्रति कठिण अंश । बोलतु जाय. ॥ १७० ॥ जो शिष्याचा अवगुण । तितुका दांडवी तयाकडून । नाइके तरि अर्धक्षण । न राहे तेथें. ॥ १७१ ॥ अथवा पडिलिया हटीं । क्षणक्षणा सांगे निजगोष्टी । जितुकें पडे त्याच्या दिठीं ।

---

१. कल्पनारहित. २. अनेक, वेगळी. ३. स्पर्श करीत नाहीं. ४. डोळे उघडे असून अंधामाणें. ५. सर्वांमाजी साक्षित्वें वसोनि नसे. ६. निश्चयानें. ७. गोड असें समजुतीचें भाषण.

त्याचा सांगे निरासु. ॥ १७२ ॥ शिष्यास म्हणे, 'सावधान । बा रे! राहें द्रष्ट होऊन । चित्त स्वस्थ करून । प्रवर्ते हिता'. ॥ १७३ ॥ शिष्य अव्हांटा भरों जरी जाय । विषयांचा संगु ध्याय । वज्रप्राय वचन घाय । म्हणोनि करी दृढतर. ॥ १७४ ॥ जंव पूर्ण होय स्थिति । तंव आन धरूं नेदी चित्तीं । वळलियावीण वृत्ती । शरीर अव्हांटां भरे. ॥ १७५ ॥ काम क्रोध मोह मद । इच्छा द्वेष अहंताबाध । अज्ञान परमार्थ विरुद्ध । वर्तों नेदी सर्वथा. ॥ १७६ ॥ शिष्याचें धरुनि मन । म्हणे, 'तूं जालासि पूर्ण । तंव अहंता करी नागवण'। शिष्यासि पैं. ॥ १७७ ॥ जैसा जालिया त्रिदोष । वैद्य आवडे तें दे तयास । तरि निवृत्ति नाहीं रोगास । अधीक पीडा. ॥१७८॥ अथवा उष्में असे तापला । तयापासीं अग्नि चेतविला । तेणें करोनि घात जाहला । तयाचा पैं.' ॥ १७९ ॥ तैसें न करी सद्गुरू । वचनमात्रें करी उपचारू । परि शिष्य असावा सादरू । जें इतुलेंही घेवें. ॥ १८० ॥ वचन श्रीगुरूचें वोखटें । कांहींच कडुवट न वाटे । आपुलेनि स्वार्थे चोखटें । मंगळचि मानी. ॥ १८१ ॥ पुत्रदारादि संसार । सर्व प्रपंचादि शरीर । इतुकें अर्पूनियां सागर । उल्लंघिजे भवाचा. ॥ १८२ ॥ सांडोनि अहंकाराचें घर । द्रष्टत्वें राहिजे निरंतर । आपुल्या स्वार्थालागीं सत्वर । भजे श्रीगुरूसि. ॥ १८३ ॥ विश्वास फळेल आम्हांसी । म्हणोनि भजे भलतयासी । जो आणूनि दे अनुभवासी । तोचि श्रीगुरु. ॥ १८४ ॥ देहांतीं पावसी मुक्ति । हे अवघी लटकी युक्ती । जितांचि नये प्रतीती । तरि सकळही मिथ्या. ॥ १८५ ॥ वचनमात्रें मुक्तपण । राहिजे सर्वी निराळें होऊन । तयाचे वंदिजे चरण । तो शिष्य उत्तम. ॥ १८६ ॥ एकाचें ऐसें मत । ब्रह्म एकचि अनुस्यूत । गुरु शिष्य नेमस्त । कवणाचे कवण. ॥ १८७ ॥ तेणें धरोनियां दोरू । चढत होता गिरिवरू । पोंवलियासाठीं सत्वरू । घात जाला. ॥ १८८ ॥ कीं निधान पडिलिया दृष्टीसी । सत्वर झांकी नेत्रासी । मग पावला दारिद्रासी । अभागी पैं. ॥ १८९ ॥ ऐसा सांगतां दृष्टांत । ग्रंथ वाढेल बहुत । जो धरुनियां हात । पाववी वस्तु. ॥ १९० ॥ हां हो श्रीगुरुचें महिमान । देहीं असोनि वेगळेपण । मग राहिलें पापपुण्य । सहजेंचि मुक्त. ॥ १९१ ॥ आतां सांडोनियां संशयासी । निर्विकल्प म्हणिजे कासयासी । तरि देखणा जो पां सर्वांसी । तो कल्पनातीत. ॥ १९२ ॥ संकल्प विकल्पाकारण । मनाचेंचि कीर जाण । आत्मयासि ययाचें देखणेपण । सहजेंचि निर्विकल्प.

---

१. आडमार्गास. २. थोडेंसुद्धां. ३. घेण्यास. ४. वाईट. ५. पोंचण्यासाठीं.

॥ १९३ ॥ आतां सांगों प्राकृत । जाणणें तें एक ब्रह्म सत्य । हें गे! सांगितलें निश्चित । देईन दिव्य. ॥ १९४ ॥ निर्विकल्पता म्हणती मूढदशेसी । जे आठवण नसावी मानसीं । तरि ऐसी गति कवणासी । जाली होती. ॥ १९५ ॥ श्रेष्ठादि श्रेष्ठ शंकर । वशिष्ठ ज्ञाता साचार । तेही करिती निर्धारें व्यापार । कासया पैं. ॥ १९६ ॥ शुकमुखें भागवतनिरोपण । वशिष्ठें प्रबोधिला वैदेहीरमण । रामें वधिला रावण । नानाशस्त्रें. ॥ १९७ ॥ याज्ञवल्की पूर्ण प्रबोधित । फाल्गुन[1] युद्धा अद्भुत । नारद पृथ्वी हिंडत । जनक राज्यीं. ॥ १९८ ॥ सहजसमाधि ते ऐसी । जे विसरु न पडावा वस्तुसी । ऐक्य देखणें सर्वांसी । ते गे ! तेचि समाधि. ॥ १९९ ॥ सर्वेही भासलिया चैतन्य । यापुढें कोण समाधान? । जेथें मावळलें मीतूंपण । तेचि सहजसमाधी. ॥ २०० ॥ आपणिया आपण देखत । आश्चर्य चित्ता वाटत । भरलें असे सदोदित । दुष्काळ कैंचा? ॥ २०१ ॥ व्याप्य आणि व्यापक । हेंही मावळलें सम्यक । तो दृष्टांत नावेक[2] । सांगेन मी. ॥ २०२ ॥ गोधूम नाम प्रथम । त्याचें जालिया चूर्णकर्म । गोधूमपण निस्सीम । बुडालें तयाचें. ॥ २०३ ॥ तेचि कणिक नांव जालें । तया पाकातें आरंभिलें । तेंही नाम विरालें । जालीं पक्कान्नें. ॥ २०४ ॥ पक्कान्नें होतां उदरगत । जें होय तें जगा कळत । तया मळाची मृत्तिका होत । संशय नाहीं. ॥ २०५ ॥ बीज पडिलिया भूमीआंत । मोड ऐसें नाम पावत । पुढें मोडपणही मुरत । जाला दुंपाना[3]. ॥ २०६ ॥ मग तितुकें मागेंचि राहिलें । पुढें शाखापल्लव नाम जालें । पुष्पावरी बीज आलें । बुडाला वृक्ष. ॥ २०७ ॥ अथवा कनकाचें अलंकार । नाना नामीं परिकर । पुनरपि आटणीं निर्धार । सुवर्णचि असे ॥ २०८ ॥ कां घृताची पुतळी । अवेव पूर्णत्वें पातली । उपाधी नांवें वेगळालीं । परंतु घृत. ॥ २०९ ॥ कां लेणें कोरिला पर्वत । रूपें तरी अनेकें दिसत । तरि पाहतां नेमस्त । पाषाणचि. ॥ २१० ॥ तैसाचि दृश्य पर्वत । संकल्पें उद्भवला अद्भुत । नामरूपीं वेगळा दिसत । परि सर्वेहि ब्रह्म. ॥ २११ ॥ प्रथम तें निराकार । इच्छया माया आकार । महत्तत्व सत्वर । तेथूनि जालें. ॥ २१२ ॥ महत्तत्व जे तिन्ही त्रिधासी[4] । प्रथम तमरूप रुद्रवेषेंसीं[5] । पंचभूतें नेमेंसीं । तेथूनि जालीं. ॥ २१३ ॥ पांचांचे जे पांच गुण । आणि तन्मात्राही जण । इतुकियाहो कारण । तोचि जाला. ॥ २१४ ॥ राजस[6] चतुरानन[7] ।

---

१. अर्जुन. २. क्षणभर. ३. दोन पानांचा. ४. तीन प्रकारानें. ५. मागें ६१ व्या ओवींतील ५ वी टीप पहा. ६. रजोगुण प्राधान्यानें असणारा. ७. मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं चार तोंडें आहेत ज्याला तो जीव.

देश इंद्रियें तैयापासून । इतुकें संवळित[3] होऊन । केलें रूप. ॥ २१५ ॥ ऐसी पिंडब्रह्मांडरचना । अधिष्ठात्री देवता जाणा । निर्गुण तोचि सगुण जाला असे. ॥ २१६ ॥ पुनरपि तयाचें संहारण । लया जाय जालें तेथुन । सेखीं उभारा निर्गुण । भासमात्र. ॥ २१७ ॥ जैसें उदकापासून[4] केवळ । उपजोनि जालें शेवाळ । तेणें आच्छादिलें जळ । परि तें आपणचि. ॥ २१८ ॥ कां भानूचीं किरणें । जळ घेऊनि पावती मेघपणें । सेखीं तैयासीच करणें । करोनि ठाती. ॥ २१९ ॥ तैसें चित्स्वरूप । आपणचि जालें आपणाप । आपणातें केला लोप । तरि वेगळें रूप कैंचें? ॥ २२० ॥ जैसें रज्जुभुजंगत्व नाथिलें । तैसें जगडवाळ देखिलें । परंतु वस्तुत्वें पाहिलें । तरि लटिकेंचि. ॥ २२१ ॥ बहुरूपी नटे सोंगासि । परि तो नाहीं तेणें वेशेसीं । उपसंहारीं टाकी सोंगासी । मूळचि उरे. ॥ २२२ ॥ कोणी ऐसें बोलती । हे अवघीचि ब्रह्ममूर्ति । तरी साक्षी सर्वांभूतीं । दुसरें कैंचें? ॥ २२३ ॥ तरी रूपचि ऐसें । आपणचि जाला आपैसें । आपण आपणा प्रकाशे । आपणची सांडी. ॥ २२४ ॥ जयाचा जो स्वभाव । केविं राहे तयाचें वैभव । आपणचि करी स्वयमेव । आपणची जाणीव न टाकी. ॥ २२५ ॥ जरि जाला निमग्न । तऱ्हीं न सांडी जाणतेपण । आम्हींच केलें निरोपण । तरी साक्षी. ॥ २२६ ॥ हें गे! हें ऐक्य । व्याप्य आणि व्यापक । ऐसें क्रीडेचें कळलें कौतुक । श्रीनिवृत्तिप्रसादें. ॥ २२७ ॥ स्वानुभव मूळज्ञान । ग्रंथ झाला श्रीकृपेन । यामाजि घालुनियां मन । कीजे कार्य आपुलें. ॥ २२८ ॥ हा प्रगट **स्वात्मानुभव**। अर्थें ग्रंथवैभव । करिता झाला **ज्ञान**देव । **निवृत्ति**दास. ॥ २२९ ॥ शकें बारोत्तरें बारा । तैं ग्रंथा केला उभारा । परिसावया चतुरां । म्हणे **निवृत्ति**दास. ॥ २३० ॥

## एकनाथस्वामीकृत

### श्रीशुकाष्टकावरील[6] टीका.

चिन्मयानंदरूपाय जनार्दनस्वरूपिणे ।
स्वप्रकाशाय शुद्धाय आचार्याय नमोऽस्तु ते. ॥ १ ॥
मायातीताय नित्याय मायागुणप्रकाशिने ।
व्यक्ताव्यक्तस्वरूपाय आचार्याय नमोऽस्तु ते. ॥ २ ॥

---

१. पंच कर्मेंद्रियें आणि पंच ज्ञानेंद्रियें मिळून दहा. २. जीवापासून. ३. एकत्र. ४. पाण्यासच. ५. साधनें. ६. श्रीशुकाचार्यांनें प्रसिद्ध आठ संस्कृत श्लोक 'शुकाष्टक' या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यावरील ही एकनाथाची मराठींत टीका आहे. ह्या प्रकरणाच्या आम्हांस दोन पोथ्या

( ओंव्या. )

ॐ नमो सद्गुरू[1] । न दिसोनि दिससी जगदाकारू । देखिला तरी संहारू[2] । न मोडितां करिसी. ॥ १ ॥ परी घडामोडी दोन्ही । नाहीं करणें तुजलागोनी । यालागीं नमोनी । राहावें स्थिर. ॥ २ ॥ तंव नमूं हें उच्चारितां । वेगळ पडे थिता[3] । तरी नमावया आतां । कवण हेतु. ॥ ३ ॥ उँथळलीया[4] भरितें । त्या सिंधूच्या ऐसें अद्वैतें । स्वयें भरी तरी यातें । नमाव्या द्वैत मीं केलें. ॥ ४ ॥ सिंधूच्या वोहटचंदीं । तरी यांसी वाडीमोडी । तैसी न यावया पैंरवडी[5] । तुजीचि तूं. ॥ ५ ॥ तैसा तुझा[6] पूर्णपणीं । असों परी न बाणे धँणी[7] । म्हणोनि गावया तुजिया गुणीं । उदित[8] होयें. ॥ ६ ॥ मौन्य पडे वाचा । तैं तूं भेटसी साचा । मा[9] भेटोनि कां कीर्तनाचा । आविसी चाळा. ॥ ७ ॥ तुजी भेट होय अव्यंग । तैं मौन पडे अभंग । ते गोडीचा बोध । वैखरी[10] स्रवे. ॥ ८ ॥ चंद्र स्पर्शल्या चंद्रकांत । जेंवी चंद्रामृत स्रवत । तेंवी तुजेया पूर्णत्वाचा पूर्णार्थ । वैखरी वदे. ॥ ९ ॥ तें अपूर्व शुकोच्छिष्ट । फळ देखिलें श्रेष्ठ । जें नित्यतेसी अवीट । तेंचि शुक[11] सेवी. ॥ १० ॥ तें शुकमुखींचें अष्टक । जें गुह्यज्ञान निष्टंक[12] । वदवीतसे व्यापक । श्रीजनार्दन वाचे. ॥ ११ ॥ तो जनार्दन वाचेसरिसा । गोडीमाजी वांदु[13] जैसा । कीं न दिसोनि असे कैसा । सुमनीं[14] वासु. ॥ १२ ॥ तो एकनाममिसें । आपण आपणेया गातसे । तें निवृत्तीचेनि सौरसें । परिसतू श्रोते. ॥ १३ ॥ जे आत्मअनुभवींचे दिवे । कीं सोऽहंसिद्धीचे ठेवे । ते सद्गुरूनें भेटवावे । नित्य श्रोते. ॥ १४ ॥ मग या अष्टकमिसें । त्याचि वोसिंगा[15] समरसें । बैसोनि[15] बोलेन ऐसें । जेणें मन निवे. ॥ १५ ॥ यालागीं जी सद्गुरु देवा ! । पेलीं[16] कृपेचा हेलींवा[17] । त्या स्वानंदोदधिस दैवा । प्रार्थणेंहि नलगे. ॥ १६ ॥ हे त्रिनवणीये सवें । अवलोकिलें कृपावैभवें । तंव सबाह्येंसी आवें । विवळलें[19] ऐक्य. ॥ १७ ॥ जेंवी लागतां सूर्यकर । सूर्यकांतीं वैश्वानर ।

झाल्या. पैकीं एक (अ) वेंगुर्लें येथील 'कृष्णपरिचारक' यांजकडून व दुसरी (ब) उमरावतीचे रा. रा. उमाकांत सदाशिव देशमुख, बी. ए., बी. एल्. यांजकडून. त्याबद्दल त्या उभयतांचे आम्हीं फार आभारी आहों. ७. हे श्लोक (ब) मध्यें नाहींत.

१. (अ) जगद्गुरु. २. फेरफार. ३. व्यर्थ, खोटें. ४. उसळलें असतां. ५. प्रकार. ६. (अ) त्या गुणीं. ७. तृप्ति. ८. तयार. ९. मग. १०. वाणी. ११. शुकाचार्य; (पक्षीं) राघू. १२. निश्चित. १३. (अ) स्वानंद. १४. पुष्पामध्यें. १५. त्याचि वोसिंगा बैसोनि=गुरूच्या मांडीवर बसून. १६. परब्रह्मस्वरूपानें. १७. लोट. १८. लाट. १९. समजलें.

तेंवी गुरुकृपा उदार । ज्ञान प्रकटे. ॥ १८ ॥ तोचि ऐक्यज्ञान विवेकू । पदपदार्थी श्रीशुकू । बोलिला ज्ञानतिलकू । योगियांचा. ॥ १९ ॥

**श्रीशुक उवाच—भेदाभेदौ सपदि गलितौ पुण्यपापे विशीर्णे**
**मायामोहौ क्षयमधिगतौ नष्टसंदेहवृत्ती ।**
**शब्दातीतं त्रिगुणरहितं प्राप्य तत्त्वावबोधं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ १ ॥**

जो स्वात्मोदधिपूर्णचंद्र । ज्ञानपुरनरेंद्र । तो श्रीशुक योगींद्र । आपुली स्थिती बोले. ॥ २० ॥ ब्रह्मस्थितीची नवाळी । तेणें स्वस्वरूप नेहाळी । त्या अनुभवाची उकळी । न संटेचि श्रीशुका. ॥ २१ ॥ धालेपणाचे ढेंकर । जेंवी देती जेवणार । तेंवी आनंदाचे उद्गार । अनिर्वाच्य वदवी. ॥ २२ ॥ म्हणे भेदाभेद दोन्हीं । हारपले ज्यापासूनी । मार्गामार्ग मनीं नयनीं । न सांपडे दोहींचा. ॥ २३ ॥ तरी अखंडीं भेद कैसा । अभेदाचा कवण ठसा । या दोहींवेगळी दशा । विलक्षणा ते. ॥ २४ ॥ तें तूं एक शेवटवरी । पटीं दिसती वेगळाल्या हारी । गणितां येती लक्षावरी । तो पटत्वभेद. ॥ २५ ॥ दीप एक कळिका[१] असे । तिमिरदृष्टी[२] अनेक दिसे । ऐसें नसतें जें आभासे । वस्तुच्या ठायीं. ॥ २६ ॥ गुळाचिया गौरी । गूळची अवयव भीतरी । हें नेणोनि निहाळी जरी । तो अवयव मूर्तिभेदू. ॥ २७ ॥ जैसें मिथ्या मृगांबु जनीं । भासे प्रत्यक्ष नयनीं । तें साच मानलें मनीं । म्हणोनि दृढभेदु. ॥ २८ ॥ तरावया मृगजळाचे गंगेसी । जो नाव करूं धांवे दाहीं दिशीं । तो तरणोपावो त्यासी । कीं वृथा श्रमु ? ॥ २९ ॥ ऐसें अखंडाचे ठायीं । भ्रांती मन भ्रमलें पाहीं । मग देखे भिन्नाभिन्न कांहीं । तोचि भेदु. ॥ ३० ॥ आपुल्या एकपणा विसरे । स्वप्नींचिया निद्राभरें । अनेकत्वाचें मोहिरें[३] । भोगी जीवू[४]. ॥ ३१ ॥ आपुला नित्य स्वभावू । नेणोनि वर्ते जो जीवू । तोचि पैं निर्वाहू । भेदाभेदाचा. ॥ ३२ ॥[५] दृश्यप्रभाव आघवा । मावळोनि ये प्रकृतिस्वभावा[६] । जैसे काश्मिरीचिया देवा । घृतमज्जन. ॥ ३३ ॥ घृतामाजी काश्मीरलिंग । घृतीं घृतरूप दिसे सांग । तरी तें कोरडें आंग । खडखडित. ॥ ३४ ॥ ऐसी प्रकृतीचिये खोपे[७] । जरी भूतक्रिया लोपे । तरी भेदाचें जाउपें[८] । सजीवची. ॥ ३५ ॥ ऐसे नासती[९] भूतक्रियाभेद । तें तंव नव्हे अभेद । आतां मावळले जेथें भेदाभेद । तेही

१. ज्योत. २. मोहदृष्टीनें. ३. साहित्य. ४. जीव. ५. (ब) आपुला नित्य स्वभावो । नेणोनि जो वर्ते भावो । तोचि पैं निर्वाहो । भेदवाक्या ॥. ६. (अ) संभवा. ७. पोटांत. ८. लेंकरूं 'गाइला तीन जापें झालीं'—असा प्रयोग साताराप्रांतीं करितात. ९. (ब) नाथिले.

ऐका. ॥ ३६ ॥ समस्त ब्रह्म हे ज्ञाती[1] । सोऽहं[2] अभेदवृत्ती । तेही मावळोनि स्फूर्ती । मग जें उरे. ॥ ३७ ॥ अविद्याभेद सबळ । विद्या अभेद सकळ । दोन्ही जाऊनि केवळ । तें भेदाभेदातीत. ॥ ३८ ॥ जेव्हां भेदाभेद नाहीं । तेव्हां अभेद तें कायी ? । परी चिन्मात्र जें कांहीं । तें उभयातीत. ॥ ३९ ॥ ज्ञानाचिया परिपाटीं । सोऽहं म्हणे ज्ञानदृष्टी । तेंही गेलियापाठीं । अभेदातीत. ॥ ४० ॥ ऐसे गेलिया भेदाभेद । केवळ उरे शुद्ध । तेंचि पैं विशंद- । रूप करूं. ॥ ४१ ॥ परमात्मा परंज्योती । परब्रह्म परम ज्ञप्ती[3] । परात्पर प्रकृती । परावर[4] जो. ॥ ४२ ॥ निर्विकार नित्य । निःप्रपंच निर्निमित्य । निष्कर्म निजसत्य । सत्यमूर्ती. ॥ ४३ ॥ अज अव्यय[5] अचळ । अरूप अक्षय अढळ । अजरामर अमळ । अनादि जें. ॥ ४४ ॥ निःशब्द निष्काम । निर्गुण निरुपम । निःसंग निर्व्योम । निजानंद. ॥ ४५ ॥ स्वात्मा स्वयंज्योती । स्वलील स्वशक्ति । स्वकळा स्वात्मप्रतीती । आत्मत्वाची. ॥ ४६ ॥ ऐसा अद्वय एकला । एकपणें संचला । यापरी आंगें झाला । भेदाभेदातीत. ॥ ४७ ॥ तरी नांदतेनि भेदें । तो भेद न देखतां नांदे । आपुलेया स्वात्मपदें । उल्हासतू. ॥ ४८ ॥ तो आकारीं नाकारे । आकारनाशीं न सरे । अधिष्ठान प्रतिभरें । अखंड झाला. ॥ ४९ ॥ महदादि घडामोडी । हे त्यासी नलगे चोढी । जैसी मृगजळाची सांकडी । न पडे सूर्यासी. ॥ ५० ॥ ऐसे भेदाभेदाचे लाग । न शिवती जयाचें आंग । हे दोनी तेथ मार्ग । हारपूनि गेले. ॥ ५१ ॥ म्हणोनि तेणें एकलें । सपदि[6] भेदातें गिळिलें । आपणापें निर्वाळिलें । चिन्मय नित्य. ॥ ५२ ॥ यालागीं पापपुण्य दोनी । न देखे नायके कानीं । स्वप्नींचें रविग्रहण नयनीं । जागृतीं नाहीं. ॥ ५३ ॥ खद्योततेज नयनीं । कां[7] ताराप्रकाश गगनीं । हे हारपती दोन्ही । भानुप्रकाशें. ॥ ५४ ॥ तैसा पापाचा फळंभा । कां पुण्यफळशोभा । मावळती स्वयंभा । देखोनि दोन्ही. ॥ ५५ ॥ अनादि अविद्या पाहो । जीपासोनि जाहला मोहो । जेणें मिथ्याचि संदेहो । भवबंधु केला. ॥ ५६ ॥ प्रतिबिंबा भासे । काय रवी जळीं बुडतसे । कीं लहरीचेनि कासाविसें । शतखंड होईल. ॥ ५७ ॥ घृत मद्य गंगाजळ । त्यांत बिंबे रविमंडळ । सुष्ट नष्ट धर्मशीळ । न मानिती लोक. ॥ ५८ ॥ तैसें सा-

१. ज्ञान. २. (अ) पाहाया. ३. (अ) पर जे ज्ञप्ति. ४. पर+अवर=पलीकडचें+अलीकडचें. ५. (ब) आद्य. ६. लवकर, एकदम. ७. (अ) अर्कप्रकाशें हे हरपती दोन्ही । कीं निस्तेज होय सोमाग्नि. ८. झगडा. ९. पहा हो (?)

क्षित्व असोनि त्यासी । मायामोहातें प्रकाशी । जैशी माळ सर्पपणासी । प्रकाशक झाली. ॥ ५९ ॥ यापरी मोहमाया । स्पर्शली नाहीं ज्याची तया । तैसी हेचि दृष्टांतीं पहावया । सौरस करूं. ॥ ६० ॥ जैसी रूपाची छाया । वेगळी नव्हे ज्याची तया । तैसी असोनियां माया । स्पर्शली नाहीं. ॥ ६१ ॥ रूपाचेनि योगें । छायाकर्म दिसे वेगें । तैसें असंगाचेनि संगें । माया चेष्टे. ॥ ६२ ॥ ऐसी मिथ्याचि माया । नासूं म्हणऊनि धरिती छाया । ते कष्टचि जाती वायां । भ्रांतांचे. ॥ ६३ ॥ छाया शस्त्रें तोडितां न तुटे । पर्वतभारें न दाटे । सांबळादिकीं न फुटे । बळवंतांसी. ॥ ६४ ॥ छाया तोडूं जें आणिजे पुढें । त्यावरी स्वयें छाया पडे । एवं छाया तोडणें न घडे । तेंवी माया न झडे साधनीं. ॥ ६५ ॥ नासावी मिथ्या माया । तरी जाणावें चेष्टवी तया । याचिलागीं आचार्या । सतत सेविजे. ॥ ६६ ॥ त्या गुरु वाक्यस्थिती । स्वस्वरूपाची प्राप्ती । निखिल सर्व प्रतीती । आत्मत्वाची. ॥ ६७ ॥ तेव्हां जगेंसि माया । न दिसेचि कोठें दिसावया । जैसें व्याळत्व हाराचेया । नीतळत गेलें. ॥ ६८ ॥ आणि मीपणाचा मोहो । त्या मीपणासीचि नाहीं ठावो । यालागिं मोहाचा निर्वाहो । सकुटुंब देशधडी. ॥ ६९ ॥ ऐसी मायामोह दोन्ही । होतीं अधिगत होऊनि । ते गेली मावळोनी । जागृती स्वप्न जैसें. ॥ ७० ॥ जेथें स्वरूपाचा संदेहो । त्याचे आंगीं आदळे देहो । यालागीं संदेहो तोचि देहो । निश्चितार्थेंसी. ॥ ७१ ॥ आणि संदेहाचें केलें । त्याचें नांव देह झालें । त्यासंदेहा आलें । नष्टत्व कैसें? ॥ ७२ ॥ होय न होय सभ्रांती । हे भ्रांतीगर्भींची वस्ती । ते सगर्भींच भ्रांती । नासती जाली. ॥ ७३ ॥ शुद्धसत्वाची अरणी । गुरुवाक्य दृढ मथुनी । प्रदीप्त झाला ज्ञानाग्नी । निर्धूम जो. ॥ ७४ ॥ तेथें पंचभूतांचीं काष्ठें । रजतमघृतसगटें । पेटविलीं गोमटे । स्वरूपकुंडीं. ॥ ७५ ॥ तया कुंडावांचोनि भ्रांती । ठाव नाहीं मग झाली नास्ती । तेथ संदेहस्थिती । निःशेष नासे. ॥ ७६ ॥ गळाली संदेहवृत्ती । झाली निःसंदेहप्रचीती । मग ओतली देहस्थिती । अक्षररसें. ॥ ७७ ॥ जेंवी मेण मुसें निःशेष जाय । मग धातूचि कोंदली राहे । तें नश्वरलोपें देह होय । परब्रह्मरूप. ॥ ७८ ॥ जें नव्हे शब्दा सांगडें (?) । देखिलं परी न संगवे पुढें । जें वेदांसिही कुवाडें । बोलतां पडिलें. ॥ ७९ ॥ जें जाणीतलेंही विशद ।

---

१. यल. २. सावळा=पहार. ३. चेष्टविता=खेळविणारा (परमेश्वर). ४. न शिवतां. ५. होमाग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठ. ६. हा ओवी (अ) मध्यें नाहीं. ७. ब्रह्मरसें. ८. मुशींत.

परी न संगवे एवंविध । तेंचि शब्दातीत शुद्ध । केवळ पैं. ॥ ८० ॥ वेदु काय नेणोनि परतला । जाणोनि न संगवे बोला । यालागीं ठेला । नेति म्हणोनी. ॥ ८१ ॥ जें ऱ्हस्व ना वर्तुळ । कृश ना स्थूळ । स्थिर ना चंचळ । वर्णरहित. ॥ ८२ ॥ मूर्त ना अमूर्त । प्रकट ना गुप्त । भोक्तें ना अभोक्त । सर्वद्रष्टे. ॥ ८३ ॥ समीप ना दुरी । बाह्य ना अभ्यंतरीं । निर्धारानिर्धारीं । धीरु न होये. ॥ ८४ ॥ आदि ना अंत । मनबुद्धिअतीत । सर्वीं सर्वातीत । अनंत नांदे. ॥ ८५ ॥ जो क्षण नव्हे वेगळा । नांदताहे स्वलीळा । जगचि एक डोळा । स्वरूप ज्याचें. ॥ ८६ ॥ जो तेजाचें दिव्य दीप्त । ज्या देखतांचि मन मूर्छित । म्हणोनि शब्दातीत । [1]नेति श्रुति. ॥ ८७ ॥ जो नाकळे संकल्पा । तो केंवि आकळे वाग्जल्पा ? । म्हणोनि शब्दातीता । नयेचि बोली. ॥ ८८ ॥ अबळा पुसे युवतीसी । कांतसुख सांग मजपासीं । ते म्हणे शब्दें न ये व्यक्तीसी । भोगिल्याविणें. ॥ ८९ ॥ तैसी शब्दातीत बोली । ते अनुभवासी चढली । त्यावांचोनि बोलावी बोली । तैसी नव्हे. ॥ ९० ॥ पाहतां साखर गोडी न दिसे । चाखों जातां गोडी असे । तेंवी अनुभवीं आन न भासे । शब्दार्थपिसें तेथ कैसें. ॥ ९१ ॥ ज्यामाजी गगन विरे । तेथ शब्द कोठें सरे । परी केवळ जें उरे । तें शब्दातीत. ॥ ९२ ॥ आणि दोघां एक खाय । तोही जेथ विरोन जाय । त्याहीवरी जें होय । तें गुणातीत. ॥ ९३ ॥ दों काष्ठांचिये [2]घसणीं । माजी उठे अग्नी । तो दोहींतें जाळूनी । आपणही शमे. ॥ ९४ ॥ मग काष्ठ ना वन्ही । भस्मही जाय उडोनी । तेव्हां निर्विकार होउनी । राहे नभ. ॥ ९५ ॥ तैसें रजतम मागें पुढें । जाळोनि शुद्ध सत्व वाढे । त्याची ही वाढी मोडे । आपेंआप. ॥ ९६ ॥ मग गुण ना कर्म । कुळ ना धर्म । स्वयें परब्रह्म । होऊनि ठाके. ॥ ९७ ॥ मग आपुलेया सत्ता । होय गुणकर्मा वर्तविता । वर्तवूनि अलिप्तता । नभाच्या ऐसा. ॥ ९८ ॥ सर्व पदार्थीं व्याप्त । असोनि नभ अलिप्त । तेंवी गुणकर्मा वर्तवीत । गुणातीत होऊनी. ॥ ९९ ॥ एवं गुणातीत निःशब्दता । त्याचेनि प्रकाशें प्रकाशे तत्वता । परी त्यांचेनियां दैवता । [3]घेपेवेना. ॥ १०० ॥ जो इंद्रजाळ खेळवी । तो समस्तांतें मोहवी । परी ते विद्या न भुलवी । [4]खेळवीतया. ॥ १०१ ॥ तैसा तत्वांचा मेळा । त्याचेनि प्रकाशें सोज्वळा । [5]मा त्या केंवी केवळा । जाणीतलें जाय. ॥ १०२ ॥ ऐसें तत्वता आद्य शुद्ध । स्वयेंचि झालें विशुद्ध । प्राप्त तत्वावबोध । ऐसें तो

१. (अ) न येचि बोली. २. घर्षणीं. ३. घेववेना. ४. खेळविणाऱ्याला. ५. मग.

जाहला. ॥ १०३ ॥ होत्या त्रिगुणाच्या तीनी वाटा । एकी उज् दोन्ही अ[1]-
व्हाटा । जेथें विधिनिषेधाचा चोरटा । घालिजे घाला. ॥ १०४ ॥ त्या तत्वा-
वबोधें सपाटा । मोडूनि केल्या राजवाटा । मम रामराज्याचा चोहाटा[2] । [3]ढें ढें
पिटी. ॥ १०५ ॥ तेव्हां विधि निषेध दोन्ही । पहातां न दिसती मनीं नयनीं ।
जेउतें[4] पहावें अवलोकुनी । तेउते [5]निरवधि ब्रह्म. ॥ १०६ ॥ मीन[6]लीया
सप्त उदधी । वारी भरे निरावधी । तैसा स्वस्वरूपपदीं । विलसतु असे. ॥१०७॥
तेथें सन्मुख ना पाठिमोरें । फिटलें अहंतेचें मोह भुरेरें[7] । मग देखणें होऊनि
उरे[8] । सर्वद्रष्टें. ॥ १०८ ॥ तेथें निद्रा ना जागणें । बैटे ना उभेपणें । स-
हज स्वभावें असणें । सदोदित. ॥ १०९ ॥ तयासी विधी तो कैसा आहे ।
निषेधीं त्यजावें काय । जेणें पाहातें पाहे । तोचि एकू. ॥ ११० ॥ विधी-
लागीं घेणें । कां निषेधालागीं त्यजणें । हें नुरेचि ब्रह्मपणें । ब्रह्मविदासी.
॥ १११ ॥ सांडोनि त्रिगुण मार्गी । विचरी जो ब्रह्म मार्गी । तरी विधिनि-
षेधालागीं । नुरेचि वस्तुत्वावेगळें. ॥ ११२ ॥ वस्तुत्वचि अभेदें । एकपणें
केंवि नांदे । तें प्रतीतीचे प्रबोधें । कीजेल विशद. ॥ ११३ ॥ परि कुळींचे
कुळवंत । कीं पंचायतनींचें दैवत । त्या सद्गुरूचें मनोगत । मनामाजी वसे.
॥ ११४ ॥ त्याचेनि पादप्रसादें । श्रोते तृप्त होती आत्मबोधें । तिहीं अधि-
ष्ठिला वेदें । विवेकरत्नें. ॥ ११५ ॥ जे सुखाचे निखिळ । वोतींव नित्य नि-
र्मळ । ते श्रोते मजलागीं प्रबळ । अवधान देतु. ॥ ११६ ॥ ज्यांचिया
अवधानासवें । परब्रह्म भेटीसि धांवें । त्याणें दिधले [10]खेंवे । नवरस बोला.
॥ ११७ ॥ श्रोतयांचें मन निवे । ऐसें वक्तृत्व कैंचें संभवे । परी गोड करुनि
परिसावें । संतसज्जनीं माजे. ॥ ११८ ॥ बाळक बोले बोबडें । तें परिसतां [11]मा-
तेसि प्रीती वाढे । यालागीं माजिये [12]बेंडबडे । [13]त्राय जाहाले. ॥ ११९ ॥ वां-
चोनि पद पदार्थाचा अर्थ । मी बोलाव्या नव्हे समर्थ । परी वाचेसी श्रीकृष्ण-
नाथ । बोलऊनि बोलीं [14]पैसे ॥ १२० ॥ तें संतांचेनि सौरसें । जनार्दन-
कृपा [15]वोरसे । एकाएकीं प्रकाशे । चिदानंदरस. ॥ १२१ ॥ यालागीं पदपदार्थी
बोल । उथळ कीं सखोल । सप्रेमाचे बोल । जाणिती श्रोते. ॥ १२२ ॥ तंव
संत म्हणती, 'उगा । नसुचीं झाडा पैं गा (?) । निरोपणा चालवी वेगां । एक

---

१. आडवाटा. २. चवाठा. ३. (ब) धेंडे. ४. जितकें, जेवढें. ५. अमर्याद. ६. मिळाल्यावर.
७. भुरळ. ८. केलें जाईल. ९. (अ) स्वात्मपदें. १०. क्षेमानें, प्रेमानें. ११. (अ) परितें
मातेसि लडिवाळें. १२. (ब) बोले. १३. रक्षण. १४. पै+असे. १५. वर्षे.

साचें. ॥ १२३ ॥ मागिलेनि श्लोकार्थे । लागट झालीं चित्तें । तें जाणोनि परिहारार्थे । प्रशंसूं नको. ॥ १२४ ॥ यालागीं श्लोकपदार्थासी । वाखाणितां चाड आम्हांसी । म्हणोनि निरूपणासी । चालवीं वेगीं.' ॥ १२५ ॥ या संतांचेनि बोलें । चौगुणें प्रेम जालें । जैसें रंका पद आलें । राजत्वाचें. ॥ १२६ ॥ स्वामीजी! नावेक । अवधान करावें एक मुख । कैसें बोलिला श्रीशुक । वस्तुविस्तारू. ॥ १२७ ॥ वस्तूसीचि एकपणें । सर्वत्रेक नांदणें । तेंचि निरूपणें । निरूपिजेल. ॥ १२८ ॥

**यद्वात्मानं सकलवपुषामेकमंतर्बहिस्थं**
**दृष्ट्वा पूर्णं खमिव सततं सर्वभांडस्थमेकम् ।**
**नान्यत्कार्यं किमपि च ततः कारणाद्भिन्नरूपं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ २ ॥**

आत्मा सकळ देहीं । सबाह्य परिपूर्ण पाहीं । त्यावांचोनि रितें नाहीं । चराचर सूक्ष्मीं. ॥१२९॥ तिन्ही काळ साही ऋतु । कोणें ठायीं रिता नव्हतु । परिपूर्ण सततु । स्वप्रकाशें. ॥ १३० ॥ व्यक्तीमाजी असणें । परि व्यक्तीसवें नासणें । नासलीया रहाणें । अनश्वर म्हणोनी. ॥ १३१ ॥ घटसंगति आभासे । गगन घटाकारें दिसे । परी घटा सबाह्य असे । घटाहूनि पूर्वी. ॥ १३२ ॥ निर्विकार एक गगन । मठीं दिसे चतुष्कोण । घटीं वर्तुळ वदन । आकार विकारें. ॥१३३॥ ते घट मठ नासती । परी आकाश सहजस्थिती । तैशा भंगल्या नाना व्यक्ति । परी आत्मस्थिति संचली. ॥ १३४ ॥ या आत्मदृष्टी पाहीं । तरी कार्यमात्र वेगळें नाहीं । किरीट कुंडलें कंकणें पाहीं । जैसें हेम एक. ॥ १३५ ॥ कीं खळाळ चंचळ निश्चळ । परी तें केवळ एकचि जळ । आंचि आह्या ज्वाळ । परी अग्नि एकचि तो. ॥ १३६ ॥ तरंग लहरी भंवरे । हें तोयचि दिसे तदाकारें । तैसा सर्व व्यक्ति आकारें । भासे निर्विकार आत्मा. ॥ १३७ ॥ त्याची अनुस्यूति पहातां । पदार्थां नाहीं स्वतंत्रता । हे घडामोडीची वेवस्था । मिथ्यात्व त्यावरी. ॥ १३८ ॥ ऐसिया अखंड आत्मया । भिन्नत्व केलें स्वमाया । ते हे देह अहंता प्राणियां । लागली म्हणोनी. ॥ १३९ ॥ जैसा सोनेयाचा देवो । सोनेंचि अवयवो । तैसा कार्यकारणप्रभावो । तोचि एकू. ॥ १४० ॥ यापरी अभेद भेदेंसी । तोचि भासे भेदाकारेंसी । व्यापक एकदेशी । मांजी

१. क्षणभर, अमळ. २. हाय, झळा. ३. अखंडितपणा. ४. (त्या)मध्यें.

उणीव नाहीं. ॥ १४१ ॥ जे गोडी रंजासी । तेचि साखरेचिये राशीं । कीं अर्चा आणि अग्नीसी । उष्णत्व एक. ॥ १४२ ॥ कां सहस्र दीपकळिका । प्रकाशीं नाहीं वेगळिका । तैसें एकदेशीं व्यापका । अनुस्यूतता एक. ॥१४३॥ एवं कारणाचेनि अभिन्न रूपें । असिजे एकें अमुपें । हें मनाचेनि संकल्पें । घेपवेना. ॥ १४४ ॥ या अनुस्यूतीं असम सहासा । नासिली संकल्प विकल्पदशा । तया त्रिगुणाचा वळसा । न लगत गेला. ॥ १४५ ॥ या लोकसृष्टीची नदी । तेथ विधिनिषेध पारधी । त्रिगुणाच्या जाळबंधीं । बांधी जीव मीन. ॥ १४६ ॥ ते नदीच्या उगमीं । अवर्षण पडली संकल्पभूमी । म्हणोनि कोरडां पाउलीं आम्ही । उतरोनि आलों. ॥ १४७ ॥ ते कोरडे नदी आतांता । अत्यंत प्रळयींचा अवचिता । चिन्मेघ झाला वरुषता । स्वानंदधारीं. ॥ १४८ ॥ तेव्हां एकीं पुरें । आब्रह्मतेनें जळभरें । तेथें त्रिगुणजाळेंसी विरे । विधिनिषेधणरधी (?) ॥ १४९ ॥ तया जळा आतौता । तरंगपणें भेद फेडितां । विधीनिषेधाची कथा । वदे परिसे कवण. ॥ १५० ॥ तेथेंचि पूर्ण भोक्तें बोधें । काय त्यजावें निषेधें ? । आत म्हणोनि विधिवादें । ध्यावें तें काय? ॥ १५१ ॥ या लागीं विधिनिषेध दोन्ही । त्रिगुणेसी समरसोनि । गेले जेथ विरोनि । ते पदीं बैसे. ॥ १५२ ॥ चराचर ठसा । केंवी आला एकरसा? । तोचि दृष्टांतें सौरसा । आणिजेल. ॥ १५३ ॥ सांडूनि तर्क वितर्क । निर्वाळिला मार्ग एक । जेथें वक्ता श्रीशुक । तें सादर परिसा. ॥ १५४ ॥

**हेम्नः कार्यं हुतवहगतं हेममेवेति यद्वत्**
**क्षीरे क्षीरं समरसगतं तोयमेवांबुमध्ये ।**
**एवं सर्वं समरसतया त्वंपदं तत्पदार्थे**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ३ ॥**

एवं सर्व भूतव्यक्ति । आत्मपदीं ऐक्या येती । तेचि दृढ श्लोकार्थी । बोलिला श्रीशुक. ॥ १५५ ॥ हेम अलंकार ठसा । घातलेया हुताशा । नामरूप मोडोनि जैसा । हेमाकारचि होय. ॥ १५६ ॥ तरी अळंकाररूपें असतां । काय हारपली होती हेमता? । कां अग्निसंगें आतां । गोचर झाली. ॥ १५७ ॥ तरी आटावी हे आटाटी । संकल्पसन्निपातें उठी । येरवीं आटितां नाटितां दिठी । सोनेंचि दिसे. ॥ १५८ ॥ तैसे अवयव आकारीं । आत्में

१. (साखरेच्या) कणास. २. अनिवार. ३. आंत. ४. अग्नींत. ५. कल्पनारूप वायूनें. ६. दृष्टीला.

न परणितां चराचरीं । तें नामरूप सबाह्य चोरीं । चोरिलें म्हणोनि? ॥१५९॥ जैसें हेमअळंकार हुतीं । तैसीं भुतें अद्वैतीं । येऊनि आत्मस्थिती । एकरस होती. ॥ १६० ॥ ना तरी नानावर्ण गाई । दुहोनि क्षीर एके ठायीं । केलें तेथें भेद नाहीं । वर्णावर्णाचा. ॥ १६१ ॥ तैसें अद्वैताचिया गांवीं । वर्णावर्णपदवी । नसोनियां अनुभवी । सुखवस्ती वासु. ॥ १६२ ॥ जैशा जळबळें सरिता । उदधीसि आलिया धावतां । टाकिलीया नामरूपता । समरसता होऊनि वसती. ॥ १६३ ॥ या अंबुनिधीपरता । मार्ग नाहीं सरितां । तैसी पावोनि पूर्ण ऐक्यता । उपरम नाहीं. ॥ १६४ ॥ ऐसें सर्वही समरसे । आत्मपदींच असे । हें त्वंपद तत्पद सौरसें । बोलिलें निगमीं. ॥ १६५ ॥ किंबहुना आपणासी । परिछिन्न एक देशीं । कर्ता भोक्ता मानिसी । सुखदुःखसंबंध. ॥ १६६ ॥ नाना विषयचिंता । अखंड वाहे चित्ता । विदेही परी सर्वथा । देह मी म्हणे. ॥ १६७ ॥ या त्वंपदाचा सोहळा । येऊनि पडिला गळां। उत्तम तो वेगळा । म्हणती त्वंपदातीत. ॥ १६८ ॥ जो निर्गुण निःसंग । निर्मळ निर्व्यंग । निंदारहित अभंग । निरुपाधिक. ॥ १६९ ॥ जो आद्य अव्ययो । अलक्षण अद्वितीयो । अरूप अभिन्न भावो । भावविहीन. ॥ १७० ॥ जो सनातन शांत शुद्ध । सत् प्रबोध बुद्ध । शाश्वत प्रसिद्ध । सिद्धिरहित. ॥ १७१ ॥ जो अगम्य वेदवाचे । अगोचर सत्य साचें । ऐसें त्या तत्पदाचें । रूप म्हणती. ॥ १७२ ॥ तोचि तूं आहेसी । त्वंपदीं पाहे त्यासी । तरी तत्पदाचिये रासी । वरी तूंचि गा! ॥ १७३ ॥ या त्वंपदाचा गोळा । सांग कोठें झाला वेगळा? । चुकोनि व्यापका सकळा । याची खाणी कें आहे? ॥ १७४ ॥ अनादि प्रवाहयोगें । तन्मात्रा विषयसंगें । मनाचेनि संकल्पवेगें । वेगळें मानिलें. ॥ १७५ ॥ तरी विषयांची रसवृत्ती । रसस्वादा तोचि संभूति । भोगस्वादा निश्चिती । जाणता तोची. ॥ १७६ ॥ तोची दृष्टीचा विवेकी । विषय दृश्यातें पारखी । तो बुद्धीचा पूर्वकीं । पूर्वज असे. ॥ १७७ ॥ आणी पार्थिवाचा उभारा । जहाला पंचभूतें विकारा । तोचि विचारितां विचारा । परी वासनात्मक. ॥ १७८ ॥ तरी जीव हे बोली । प्रतिबिंबाचिया भुली । बिंबवितया विसरली । म्हणोनियां. ॥ १७९ ॥ बिंबा मळिवट । चंदन लावणें चोखट । नातरी दर्पणासीचि बरवट । केलेया काय प्रतिबिंबा चर्चे? ॥ १८० ॥ प्रतिबिंबा जेणें बिंबविजे । त्यासी सौरम्य जैं चर्चिजे ।

---

१. येथें 'हुत'शब्द 'हुतवह' (अग्नि) या अर्थी घेतला आहे. २. (अ) नाश्वेत कृष्ण गाई. ३. होय?. ४. एकरूप होऊन.

तैं भोगिलेंसें देखिजे । स्वभोग प्रतिबिंबीं. ॥ १८१ ॥ तैसे सर्व भोग आत्मा भोगी । अविद्याबिंबें दिसती जिवाच्या आंगीं । म्हणोनियां जगीं । भोक्ता मी म्हणे. ॥ १८२ ॥ तेथें आशंका उठी क्षणीं। जें सुखदुःख दोन्ही । भोगावया लागोनि । काय आत्मा झाला ? ॥ १८३ ॥ तरी उपाधीचेनि डिंबें¹ । जेथ महदादि² प्रतिबिंबे । तेथ उपाधी द्वंद्व भांबे³ । काय बिंबत्विता भोगी ? ॥ १८४ ॥ आदर्शा आंगीं जे मळ । निबिड बैसले सबळ । ते प्रतिबिंबा आंगीं केवळ । क्षेपले दिसती. ॥ १८५ ॥ तो मळ जैं फेडावा । तैं आदर्श साणे⁴ तोडावा⁵ । परी बिंबला तो धरावा । काय लागे साहाणेसीं ? ॥ १८६ ॥ म्हणोनि नाना साधनें । चित्तशुद्धीकारणें । जीव तो ब्रह्मपणें । स्वतःसिद्ध ज्ञाता. ॥ १८७ ॥ या लागीं सुखदुःख दोन्ही । उपाधीसी लपोनि । गेलीं ज्या देखोनी । तें तूं आम्हासी. ॥ १८८ ॥ एवं त्वंपदाचें शोधन । तेणें तत्पदीं समाधान । जेणें होय ऐक्यज्ञान । सर्वार्थीं दृढ. ॥ १८९ ॥ एवं जे तत्पदार्थीं । ते हे तत्पदीं प्रतिती । म्हणोनि तत्वमस्यादि अर्थीं । गर्जती वेद. ॥ १९० ॥ ऐसा तत्पदप्राप्त श्रेष्ठ । त्यासि त्रिगुण माया पट । जो विधिनिषेध रंग दाट । विचित्र होता. ॥ १९१ ॥ ज्या रंगाचिया बरवा । शिव भुलविला शांभवा (?) । ब्रह्मा आणिला रजोगांवां । पट घडामोडीलागीं. ॥ १९२ ॥ त्या त्रिगुणतंतुवाचेनि पटकुळें⁶ । ज्याचेनि तेजें सभूमि जळे । आणि विचित्र पटत्व सगळें । भस्म जाहलें. ॥ १९३ ॥ तेधवां उघडें वागडें ब्रह्म । निस्त्रैगुण्य उत्तम । त्याचिये दृष्टी सुगम । ठसावलें ठाके. ॥ १९४ ॥ तेव्हां वाती लावूनि पाहतां । विधिनिषेध नलगे हाता । त्या राजयोगा आतौता । आपुलेंपण वेगळें नुरे. ॥ १९५ ॥ त्यासी विधि कवणे ठायीं । निषेध कैंचा काई ? । जो आत्माराम स्वदेहीं । विश्वेसीं जाहला. ॥ १९६ ॥

**यस्मिन्विश्वं सकलभुवनं सामरस्यैकभूतं**
**ऊर्वी ह्यापोऽनलमनिलखं जीवमेतत्क्रमेण ।**
**यत्क्षाराब्धौ समरसतया सैंधवत्वैकभूतं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ४ ॥**

ऐसा विश्वेसीं स्वदेहीं । आत्माराम जाहला पाहीं । सकळ भुवनें ज्याच्या ठायीं । सामरस्या आलीं. ॥ १९७ ॥ पृथ्वी आप तेज वायु । गगन सहित विरोनि जाय । तेथ सकळ भुवनें काय । भौतिकेंसी राहती ? ॥ १९८ ॥

---

१. डिंब=प्रतिभास, आकृति. २ महत्तत्व अहंकार इत्यादि. ३. भांबा=विकार. ४. साहाणेवर. ५. घांसावा. ६. पटकुर=वस्त्र.

पृथ्वी सलिलीं परिणामसिद्ध । तेव्हां पृथ्वीचा जळीं ये गंध । मग जळचि एक वद । वोतप्रोत. ॥ १९९ ॥ त्या जळाचा रसु । प्राशूनि घे हुताशु । तेव्हां जळाचा ऱ्हासु । तेजगर्भी. ॥ २०० ॥ मग तेजाचें रूप । वायूनें शोषिलें अमूप । मग वायूचि एकरूप । सैरा वाढे. ॥ २०१ ॥ त्या वायूच्या स्पर्शातें । गगनें न्हेलें आतौतें । तैं वायो पावे लयातें । गगनोदरीं. ॥ २०२ ॥ तैं शून्यही सगळें । अहंकारीं मावळलें । तो अहंकार जाऊनि मिळे । कारणामाजी. ॥ २०३ ॥ एवं महद्भूतभौतिकेंसी । माया प्रवेशे आदिपुरुषीं । ते गेली लयगत कवण देशीं । हे शुद्धि न लभे. ॥ २०४ ॥ जेंवी दोराचें सर्पपण । दोरींच हारपे संपूर्ण । तेंवी मायेचें निदान । चैतन्यघनीं. ॥ २०५ ॥ माया वेष्टित चैतन्य । हें जिवा ये अभिधान । तेचि गेलिया जीवपण । सहजची लयो. ॥ २०६ ॥ पंचभूत ऐक्यता । माया सकट समरसता । जाहली तेथ जीविता । तोंचि भाव. ॥ २०७ ॥ क्षारसिंधूमाजी रेवा । घातलिया सैंधवा । तेणें विरणें तेंवि जीवा । प्रकृतीसकट. ॥ २०८ ॥ त्या सैंधवाचा खडा[1] । जाहला सिंधूएवढा । तेंवी एकदेशी परी होडा[2] । पूर्ण ब्रह्म जाहला. ॥ २०९ ॥ तेव्हां त्रिगुण अहंकार व्याळा[3] । वासु प्रकृति वारुळा । जो विधिनिषेधाचेया गरळा । सदां सांडी. ॥ २१० ॥ ज्याचेनि विषभेदें । जनें झालीं बोधमंदें । अवघींचि विषयअंधें । केलीं जेणें. ॥ २११ ॥ ज्याचिया लहरा । विराजती वैराजपुरा[4] । मा इतर चराचरा । कवण पाडु. ॥ २१२ ॥ नवल विषाचा पडिपाडु[5] । गोड परमार्थ केला कडू । केवळ विषप्राय तो गोडु । विषय जाहला. ॥ २१३ ॥ या भुजगफणिमंडळा । घातली ऐक्याची शिळा । तेव्हां विधिनिषेध गरळा । स्वयेंचि घुटकी. ॥ २१४ ॥ त्या प्रकृतीच्या वारुळा । शोधिलें पावेतों[6] मुळा । मुळींच्या प्रकाशज्वाळा । जाळिले गुण सकुळीं. ॥ २१५ ॥ तेव्हां सर्प गरळ वारुळा । जळोनि ब्रह्माग्नि केवळ । जाला तो तेजबंबाळ । न मावळत राहे. ॥ २१६ ॥ ऐसा निस्त्रैगुण्य योगी । तयासी विधी कवण जगीं । आणि निषेधाही लागीं । वेगळा विभाग कैंचा ? ॥ २१७ ॥ एवं विधिनिषेध दोन्ही । गेले त्या देखोनी । जो विश्वसमरस होउनी । एकला एक. ॥ २१८ ॥ बहुतांसि एकपण । आलें तें किलक्षण । येचिविसीं निरूपण । शुक योगींद्र निरूपी. ॥ २१९ ॥

---

१. खडा. २. पैजेनें, खात्रीनें. होड=पैज. ३. सर्पास. ४. विराजाच्या (विराट् पुरुषाच्या) नगरा म्हणजे ब्रह्मांडाला. ५. थोरवी, सामर्थ्य. ६. मुळापावेतों.

**यद्वन्नद्यः समरसगताः सागरत्वं हि गत्वा**
**तद्वज्जीवो लयपरिगतं सामरस्यैकभूतम् ।**
**भेदातीतं परिलयगतं सच्चिदानंदरूपं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचारतां को विधिः को निषेधः ॥ ५ ॥**

सांडोनी दोनी कुळें । अवचित सकळ जळें । नाना सरितामेळ मिळे । उदधीमाजी. ॥ २२० ॥ तेथ सरितांचे भेद । जाऊनि जळ एक वद । होऊनियां पद । सिंधूचें भोगिती. ॥ २२१ ॥ तैसा नानाभूतठसा । कीं भिन्नभिन्न जीवदशा । आणोनि समरसा । सामरस्य करिती. ॥ २२२ ॥ प्रथम गुरुवाक्यासरिसा । बाणला जरी हा ठसा । तरी कळिकाळाचा घसा । निर्मेटील तो. ॥ २२३ ॥ गुरुवाक्यप्राप्ती । बोधलीचि न राहे स्थिति । तरी ते अनुभूति । वाढती कीजे. ॥ २२४ ॥ तेथ लावूनियां वृत्ति । करीत जाइजे आवृत्ति । जंव हे देहस्थिति । निःशेष विरे. ॥ २२५ ॥ जे वृत्ति आवृत्ति करिते । तेचि हारपे तेथें । मग पाहे सभंवतें । तंव तें अभेद जाहलें. ॥ २२६ ॥ कैनकबीज सेवनें केसा । नसतेंचि भासे मानसा । तोचि सावध होय जैसा । तैसें जाहलें. ॥ २२७ ॥ ज्यासी दिशा भ्रम पडे । तो पूर्व म्हणे पश्चिमेकडे । तोचि उमजोनि फुडें । निजपंथीं लागे. ॥ २२८ ॥ हेही जरी नये हाता । आणिक एक भेदातीता । सर्वभूतीं निजात्मता । अखंड पहावी. ॥ २२९ ॥ जें जें दृष्टीवर पडे । तें आत्मस्थिति रोकडें । लावूनियां मागें पुढें । आपणासहित. ॥ २३० ॥ जेंवी घटा सबाह्य आकाश । तैसा सर्वभूतीं परेश । पहावा सावकाश । अनन्यस्थिती. ॥ २३१ ॥ आकाशेंसि घट रिता । करितां न करवे सर्वथा । तेंवी भूतांसी निजात्मता । सांडितां नये. ॥ २३२ ॥ या उघड वृत्ति पाहतां । भेद न दिसे सर्वथा । मन संकल्पाआंतौता । अभेद आत्माचि भासे. ॥ २३३ ॥ या अभेद आत्मा सौरसें । भेदाची लिंही पुसे । मग भेदातीत उल्हासे । स्वानंदोदधि. ॥ २३४ ॥ तेणें आनंद भोग अमुपें । देहीं सोहंज्ञान हारपे । मग सच्चिदानंद स्वरूपें । होऊनि ठाके. ॥ २३५ ॥ तेंव्हां सच्चिदानंदज्ञान । त्रैपदीं अधिष्ठान । होऊनियां आपण । उल्हासतसे. ॥ २३६ ॥ संतासंत मेळवणी । ते पाहतां विचारुनी । उर्वरित तें होउनी । आपण ठेलें. ॥ २३७ ॥ जडाजड भावाभाव । तेथ नांदतें आपण

१. तीर. २. झाकील. ३. धोत्र्याचें बीं खाल्यानें. ४. (अ) या उघटी दृष्टी फिरतां. ५. लिपी. ६. सत् आणि असत्.

निरवयव। मग आपण स्वयमेव। जाणवीतसे. ॥ २३८ ॥ ज्या सुखासी नाहीं मर्यादा। दुःख रिघों न लाहे कदां। त्या सुखाचिया आनंदा। आनंदवीत आपण. ॥ २३९ ॥ एवं सच्चिदानंद। या त्रैपदीं अभेद। आपणची एकविध। नांदत असे. ॥ २४० ॥ पवित्र गोड आणि शीतळ। जैसें एक गंगाजळ। तेंवी सच्चिदानंद केवळ। त्रैपदीं एक. ॥ २४१ ॥ ऐसा सच्चिदानंदपदीं। प्राप्त त्रिगुणक्षयव्याधी। ऐसिया नामा बाधी। हें केंवी घडे? ॥ २४२ ॥ ज्या त्रिगुणक्षय व्याधी। जहाली तैं क्षया आणि आधी। आसविधी निषेधीं। विषम पाडी (?) ॥ २४३ ॥ ज्या व्याधीचे संनिपातें। उमरडुनि विचार हातें। वासनावनीं भ्रमतें। सैरावैरा. ॥ २४४ ॥ त्या व्याधीचे या उपाडा। देता सत्कथा काडा। श्रवण मुखीच्या आर्तीं दाढा। दांतखिळी पडे. ॥ २४५ ॥ कामिनीकुचाग्रीं पडतां। विषयकर्दमीं बुडतां। स्वर्गकामें टेंक चढतां। निसरोनि पडे. ॥२४६॥ जे वेथेचेनि त्रिगुणतापें। तापलीं जल्पती कोपें। मी माजें येणें संकल्पें। वोसणती. ॥ २४७ ॥ करितां उपचार आपमती। ज्वर उत्कृष्ट होय पुढती। यालागीं सेवीजती। अक्षररस. ॥ २४८ ॥ तो आचार्य धन्वंतरी। ज्याची दृष्टीच निरोगी करी। त्यावांचोनि चराचरीं। उपचारिता नाहीं. ॥ २४९ ॥ त्याणें ब्रह्मरस अर्धमात्रा। दाखवितां क्षयाचा थारा। मोडोनियां शरीरा। अक्षय केलें. ॥ २५० ॥ त्यासी दृढतेचें पथ्य। लाविलें शीतळ सत्य। तेणें रोगाचें विगत। निशेःष जालें. ॥ २५१ ॥ मग सर्व धातूंच्या ठायीं। ब्रह्मरस कोंदला पाहीं। यापरी देहीं विदेही। तोचि झाला. ॥ २५२ ॥ तेव्हां उठणें कां बैसणें। निद्रा ना जागणें। भोगणें ना अभोगणें। हेंही नाहीं. ॥ २५३ ॥ तेथ क्रिया ना कर्म। धर्म ना अधर्म। वर्ण ना आश्रम। सहज स्थिति. ॥ २५४ ॥ तया कुळ ना अकुळ। निर्मूळ ना मूळ। कृश ना स्थूळ। विकाररहित. ॥ २५५ ॥ मग आकार ना शून्य। बोलणें ना मौन। आपणचि सनातन। चिद्ब्रह्म जाहला. ॥ २५६ ॥ तयासी कवण विधि। सांगों काय निषेधीं। जेणें टाकोनियां बुद्धि। ब्रह्म जाहला. ॥ २५७ ॥

**दृष्ट्वा वेद्यं परमथ पदं स्वात्मबोधस्वरूपं**
**बुद्ध्वात्मानं सकलवपुषामेकमंतर्बहिस्थम्।**

---

१. त्रिगुणाची क्षयबाधा. २. त्याग करून. ३. उफाड्यास, वृद्धीस. ४. व्यथेमुळें. ५. बरळतात. ६. ब्रह्मरस. ७. ॐ तील अर्धमात्रा. ८. नाहींसें होणें. ९. त्वक्, असृक्, मांस, अस्थि, मज्जा, मेदस् आणि शुक्र ह्या शरीरांतील सप्त धातू.

**भूत्वा नित्यं सदुदिततया स्वप्रकाशस्वरूपं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ६ ॥**

जो ज्ञानदृष्टि ईक्षणा[1]। भेदीं अभेद देखणा। जाणोनियां पूर्ण। योग्य जाहला. ॥ २५८ ॥ अधमोत्तम पाउटी[2]। न पडे त्याचिये दृष्टी। यालागीं वेद्यत्वाचिये[3] उठी। नेवचे सेलु. ॥ २५९ ॥ यानंतरें उत्कट। परमपद श्रेष्ठ। तें आपणामाजी प्रकट। देखणा जाहला. ॥ २६० ॥ तो प्रमाण पूरु[5]। प्रकृती-[6]अनावरु। जैसा मृगजळीं मेरु। विरेना कहीं[7]. ॥ २६१ ॥ वारा नातुडे जाळीं। नभ नुकळे ज्वाळीं। चित्रींचा सांबळीं[8]। न खोचवे मही. ॥ २६२ ॥ शुक्तिकेचा रजताकारू। झालाही भिन्न करूं। न शके, तेंवी अनावरु। प्रकृतीसी तो. ॥ २६३ ॥ कैंचें अप्रमाणीं प्रमाण। कारण ही अकारण। तें परमपद चिद्धन। स्वबोधें जाहला. ॥ २६४ ॥ नाहीं द्वैत सौरस। नव्हे स्त्री ना पुरुष। स्वात्मत्वाचा विलास। तें हें विश्व. ॥ २६५ ॥ भूतादि भूतांच्या ठायीं। स्वयें आपणावांचूनि नाहीं। सबाह्य अभ्यंतर पाहीं। दुजें कोणी असेना. ॥ २६६ ॥ बोलावें बाह्य अभ्यंतरीं। वेगळें असावें जरी। तेंचि नाहीं व्यापारीं। सबाह्य कैंचें? ॥ २६७ ॥ तंव बाह्य प्रकाशेल कायी। जें अंतरीं प्रकाशलें नाहीं। म्हणोनि जाणावें स्वदेहीं। तरी जाणीतलें. ॥ २६८ ॥ सर्वाद्य शाश्वत। सर्व ज्याचे निजाविरी भासत। तें स्वात्मपद स्फुरत। आत्मत्व जाहला. ॥ २६९ ॥ ऐसा चालतां सूक्ष्ममार्गें। टेंणकला[10] बोध मागें। राहिला यापरी आंगें। वस्तु होऊनि. ॥ २७० ॥ बोधें बोधातीत। विषयभोगी भोगातीत। देहीं असोनि देहातीत। गुणातीत स्वयें झाला. ॥ २७१ ॥ जैसा स्वप्नीं स्वयें निमाला। तो जागृती स्वयें प्रबोधला। तेंवि नित्य अनित्यत्वाला। ब्रह्मभूत तो. ॥ २७२ ॥ मिथ्या प्रपंचाजवळीं। वृत्ती परतोनि भ्रांतमेळी। [11]न मेळे कोण्ही काळीं। यालागीं नित्य. ॥ २७३ ॥ चराचर सर्व। मज अरूपाचे अवयव। ऐसा अकृत्रिमस्वभाव। ते नित्यता म्हणिजे. ॥ २७४ ॥ लवभरी विस्मरण। जाहालेपणीं जाण। नव्हेचि, या नांव नित्यपण। नित्यत्वाचें. ॥ २७५ ॥ नवल तो सदोदित। अदृश्य उदो अस्त।

१. ज्ञानदृष्टीनें पाहणारा. (अ) जो ज्ञानदृष्टी विलक्षण. २. पाऊल. ३. जाणतेपणा जाणल्यावर. ४. त्रासत नाहीं. ५. पूर. ६. प्रकृतीला अनावर. ७. कधीं. ८. पहारीनें. ९. (अ) सुखांत. १०. थकून (मागें) राहिला. ११. न मिळे.

[१]जें तो स्वप्रकाशें नित्य । प्रकाशमान. ॥ २७६ ॥ ईश्वरींचें वैभव । ते म्हणे माजे स्वभाव । पूर्णपरी पूर्ण सर्व । तें सदोदित स्वयें. ॥ २७७ ॥ रवी सकळांतें प्रकाशवी । तो काय प्रकाशिजे [२]दिवीं । तैसा स्वप्रकाश स्वभावीं । अन्यप्रकाशरहित. ॥ २७८ ॥ समस्त आत्मत्वें प्रकाशे । ज्याचेनि प्रकाशें प्रकाशिलें दिसे । स्वयंप्रकाश ऐसें । यालागीं. ॥ २७९ ॥ स्वस्वरूपें सगळा । स्वप्रकाशाचा उमाळा । जेंवी मंडळेंविणें स्वलीला । [३]नभोमय सूर्य. ॥ २८० ॥ तो प्रकाशची स्वादु । स्वादची सुगंधु । स्वरूपाचा तो आनंदु । तैसें स्वरूप. ॥ २८१ ॥ त्याचेनि स्वादसुखें । कडुपण अमृतीं ठाके । यापरी स्वसुखें । प्रकाशला. ॥ २८२ ॥ ऐसा जो स्वप्रकाशी । कैंचा त्रिगुण वृक्ष त्याचे देशीं । स्वयें दिसे [४]चौमासीं । लसलसीत. ॥ २८३ ॥ जया अविद्येचें आळें । अति सूक्ष्म अनंत मुळें । संकल्पाचेनि बळें । सबळ जो कां. ॥ २८४ ॥ अहंतेचें [५]दिंडें । [६]पांच हि खांदिया प्रचंड । [७]चौप्रकारीं उदंड । विस्तारला. ॥ २८५ ॥ पालवी मोहमाने । विचित्र तृष्णेचीं सुमनें । विकाशलीं [८]कामनें । जीव भ्रमरां. ॥ २८६ ॥ दों फळां भोग फळां (?) । अग्रें उतरती तळां । तो फळभोग सोहळा । सेवी तयासी. ॥ २८७ ॥ सर्वांगीं निरंतरां । विषयरसाचिया धारा । उमळोनि मदभरां । स्रवत असे. ॥ २८८ ॥ माझारीं अवचितया । शोकांचिया पारंबिया । निगती आणीलिया (?) । संधिभागीं. ॥ २८९ ॥ तेथ स्वर्गादि कारणें । कामिकां अति गोडपणें । दीक्षित ज्याकारणें । यजिती याग. ॥ २९० ॥ ऐसा विपरीत भववृक्षु । देखोनि जो मुमुक्षु । छेदूनियां दक्षु । अनलस जाहला. ॥ २९१ ॥ [९]सद्युक्तीचा दांतीं । खरमरा सहज स्थिती । ऐसा विद्याकर्वत घे हातीं । ऐक्यवृत्तीचा. ॥ २९२ ॥ अहं चिन्मयाचेनि साहणें । प्रत्यावृत्ती खरमरेपणें । शास्त्राचेनि सोजणें । सिद्ध केलें. ॥ २९३ ॥ स्वदेहा आणि शस्त्रां । ऐक्यतेचा उभारा । करूनियां तरुवरा । निवटूनि गेले. ॥ २९४ ॥ तंव न घालितां घावो । तरुवरा अभावो । मृगजळींचा हेलावो । सूर्यसंनिधीं जैसा. ॥ २९५ ॥ ऐसे या निस्त्रैगुण्य मार्गीं । विचरतां जो राजयोगी । तयासी विधिनिषेध जगीं । वस्तुत्वावेगळा

---

१. कारण. २. दिव्यानें. ३. केवढी विशाल कल्पना ही ! ४. चारी बाजूंस. ५. बुंधा. ६. पंच इंद्रियें. ७. मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार ह्या अंतःकरणचतुष्टयाचे योगानें. ८. इच्छेमुळें. ९. सख्य.

कैंचा? ॥ २९६ ॥ तो चिन्मया चिन्मय । आनंदा आनंदमय । विस्मया विस्मय । गिळोनि वेगळा. ॥ २९७ ॥

**कार्याकार्ये किमपि सततं नैव कर्तृत्वमस्ति**
**जीवन्मुक्तस्थितिरवगतो दग्धवस्त्रावभासः ।**
**एवं देहे प्रविलयगते तिष्ठमानो विमुक्तो**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ७ ॥**

ऐसिया ब्रह्मयुक्ता । कार्याकार्य कर्तव्यता । करणें नाहीं सर्वथा । कवणेकाळीं. ॥ २९८ ॥ सर्व कर्मं देहीं । निपजती परी कर्तव्यता नाहीं । कर्मीं ब्रह्म पाहीं । स्फुरत प्रतीति. ॥ २९९ ॥ या स्वात्मप्रतीतिप्रमाणें । तेणें जें जें कर्म करणें । तें कर्मचि ब्रह्मपणें । उभें ठाके. ॥ ३०० ॥ जळावरी लहरी । चंचळ निश्चळ कर्म करी । तेथ कर्मकर्त्यामाझारीं । जळचि जैसें. ॥ ३०१ ॥ एवं स्वात्मप्रतीति । वेगळी नुरेचि कर्मस्थिति । यालागीं करूनि अकर्तृत्वीं । बैसणें नित्य. ॥ ३०२ ॥ उगवल्या रजनीकर । भरतेनें उंथळे[१] सागर । अमृत सेविती चकोर । सोमकांत द्रवती. ॥ ३०३ ॥ कुमुदें विकासती । संतप्ता विश्रांती । इतुकें करूनि रजनीपती । अकर्ता स्वयें. ॥ ३०४ ॥ तेंवी सकळ इंद्रियवृत्ती । आत्मसत्ता प्रवर्तती । तऱ्ही कर्तृत्वमस्ति[२] । आत्म्याप्रती असेना. ॥ ३०५ ॥ ऐसिया पूर्णप्रतीति । ठेली कर्माकर्मगति । म्हणोनि कर्तृत्वमस्ति । नाहीं तया. ॥ ३०६ ॥ दिसे एकदेशी देहीं । परी तो व्यापक सर्व पाहीं । जो कूटस्थाच्या ठायीं । सनातन जाहला ॥ ३०७ ॥ घटीं दिसे घटाकाश । तेंचि सर्वदेशीं सावकाश । तेंवी एकदेशी दिसे वास । परी तो सर्वदेशीं निवासी. ॥ ३०८ ॥ यालागीं तो जीवन्मुक्त । देहीं असोनि देहातीत । देखण्यामाजी न दिसत । नांदे देहीं. ॥ ३०९ ॥ प्रदीप्त वस्त्राची घडी । दिसे परी आगीची रोकडी । तया देह हे गोष्टी कुंडी[३] । न देखे मिथ्या. ॥ ३१० ॥ जैसा खैराचा खुंट । जळोनि दिसे लखलखित नीट । परी पूर्वील ऐसें हैंळुवट । न धरवे हातीं. ॥ ३११ ॥ तैसा ब्रह्मावेगळा न होतां । वर्ते ब्रह्माचिया सत्ता । म्हणोनि जीवन्मुक्तता । बोलती आख्या[४]. ॥ ३१२ ॥ यापरी देहातीत । होऊनि देहीं तिष्ठत । तोचि जीवन्मुक्त । मुक्तीवरील कळस. ॥ ३१३ ॥ तो त्रिगुण मोहाग्नि । जो जाळिता नरसुरां लागोनी । विधिनिषेध धूम करोनि । धुरटलिया बुद्धि. ॥ ३१४ ॥ ज्याचिया ज्वाळांच्या शिखा । करी विपरीत

१. उसळे. २. कर्तृत्वाबद्दल अहंकार. ३. व्यर्थ. ४. सहज.

सत्यलोकनायका । मा इंद्रादी जीवांचा लेखा । कवण पाडू. ॥ ३१५ ॥ ऐसिया त्रिगुण अनळा । देहात्मकाष्टाचा जिव्हाळा । तो तोडूनि जाळावया ज्वाळा । पुढें इंधन नाहीं. ॥ ३१६ ॥ मग तो जेथिला तेथें । प्राशिला कूटस्थ वातें । तयाही वरी अवचितें । स्वानंद मेघ वरुषे. ॥ ३१७ ॥ तेव्हां त्रिगुणताप जाय । विधिनिषेध धूम राहे । मग सुशील प्रकट होय । चिदानंद ओलावा. ॥ ३१८ ॥ ज्याचेनि वोल्हासें । मनबुद्धि उल्हासे । तो वोल्हासचि दिसतसे । बुद्धि आणि दृष्टि. ॥ ३१९ ॥ वोल्हासु जाणिवे स्पर्शे । त्रिगुण गेलिया दृष्टि दिसे । त्यावेगळें आभासे । ऐसी नुरेचि उरी. ॥ ३२० ॥ ऐसिया उर्वरिता । चित्त नाहीं मा कें चित्ता । स्वदेहीं परिपूर्णता । विश्वंभरु जाहला. ॥ ३२१ ॥ तेथ इष्ट ना अनिष्ट । नीच ना श्रेष्ठ । गुप्त ना प्रकट । स्वतःसिद्ध जाहला. ॥ ३२२ ॥ तया भेद ना अभेद । मंत्र ना छंद । स्वदेहीं गोविंद । सदोदित जाहला. ॥ ३२३ ॥ सांडोनि त्रिगुणबुद्धि । तया कैंचा निषेध विधि? । ब्रह्मजाणीवेच्या राजबिदीं । विचरत जो. ॥ ३२४ ॥ तया आपपर दोन्ही । तत्काळ गेलें मावळोनी । मीचि कोण हें जनीं मनीं । नाठवे वेगळें. ॥ ३२५ ॥

**कुत्रस्थोऽहं किमपि च भवान्कोऽयमत्र प्रपंचो**
**यस्मिन्वेद्यं गगनसदृशं पूर्णतत्वप्रकाशम् ।**
**आनंदाख्यं समरसघनं बाह्यमंतर्विहीनं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ८ ॥**

मी कवण कवणाचा । एकदेशी कैंचा । माझिया मीपणाचा । निर्वाह कोठें ॥ ३२६ ॥ दृढता जे मीपणा । त्याणें ठावो केला तूंपणा । मीतूंपणाचे वाहतवणा । प्रपंच भासे. ॥ ३२७ ॥ ज्या प्रपंच्याचा उभारा । स्वरूपीं जन पाठीमोहरा । केला, पैं नश्वरा । विषयांसाठीं. ॥ ३२८ ॥ तें समूळ विचारितां । विचार ठाके पाहतां । जें मनाचिया हाता । होतवसेना. ॥ ३२९ ॥ जें बुद्धीसी कुवाडें । धृतीसी धरितां सांकडें । जें असतां मागें पुढें । नाहींच म्हणती. ॥ ३३० ॥ जें चळे ना टळे । गगनासि न कळे । ज्यामाजीं सगळें । हारपे गगन. ॥ ३३१ ॥ तें स्वदेहीं पाहतां । हारपे मीतूंपणवार्ता । प्रपंच दिसे मृगजळलता । मृगजळींच्या जैशा. ॥ ३३२ ॥ तेव्हां मीपणा निर्वाहो ।

१. नाहींसा झाला. २. ब्रह्मसुखाच्या. ३. राजमार्गांत. ४. पाठमोरा. ५. सांपडेना. ६. कोडें. ७. कठीण.

प्रपंचाचा अभावो । स्वसंवेद्य स्वभावो । आत्मत्वाचा. ॥ ३३३ ॥ जे खडोखडी अखंड । आपुलेपणीं उदंड । जें अनंत ब्रह्मांड । अधिष्ठातें. ॥ ३३४ ॥ तें स्वसंवेद्य ब्रह्म । उपमेसि निरुपम । जें सूक्ष्माहूनि सूक्ष्म । व्यापक गगनाऐसें. ॥ ३३५ ॥ ज्याचे प्रकाशलेशें । समस्तां तत्वां प्रकाश भासे । तें पूर्णत्व कैसें । स्वदेहीं भोगी. ॥ ३३६ ॥ जैसा स्वादु गोडियेतें । का सुवासु सुमनातें । पवन भोगी स्पर्शातें । तैसा भोगी. ॥ ३३७ ॥ कीं प्रभा सूर्यातें । कीं चांदिणें चंद्रातें । तैसें पूर्णत्वातें । अद्वयभोग. ॥ ३३८ ॥ तो आनंदाचा केवळ । वोतीव नित्य निखळ । जाहाला असे अढळ । आनंदरूप. ॥ ३३९ ॥ निबिड आणि घन । बाह्यांतर विहीन । क्षेत्रक्षेत्रज्ञाहून । पूर्वज जाहला. ॥ ३४० ॥ तेव्हां मी तूं आणि प्रपंच । हाही तेणेंचि वाच्य । जेथ शून्याचा निर्वेच । ते हे दशा. ॥ ३४१ ॥ तेथ मागें आणि पुढें । खडखडीत उघडें । परब्रह्म डोळां पुढें । विराजतसे. ॥ ३४२ ॥ होती त्रिगुणाची धाडी । जे धेंडी-वा जिवा बांधवडी । घालूनि विधिनिषेध बेडी । ज्याचेनि जन्ममरण. ॥ ३४३ ॥ मग अहोरात्र तया । बैसवी विषय भरडावया । दळितेंचि दळावया । चर्वित चर्वण जेंवी. ॥ ३४४ ॥ क्षुधे तृषेचे अपाय । वाजती दरिद्राचे घाय । तेणें दुःखें विसावा जाय । गृहदारादिविकळें. ॥ ३४५ ॥ तेणें अतिजर्जर साचें । हातीं धरितां मोहविंचें । हाणीतला, ते वेदनेचें । प्रबळ दुःख. ॥ ३४६ ॥ असूयेच्या तिडका । ब्रह्मांडीं निघती देखा । वित्तहानीच्या भडाका । ते नसंडे उभडु. ॥ ३४७ ॥ पुत्रनाशाचे इंगळ । त्याणें सर्वांगीं जळजळ । आशा सर्पिणीची गरळ । मनमुखीं पडे. ॥ ३४८ ॥ तें सर्पिणीचें विख । मोह विंचुवाचें दुःख । कैचें बंदिशाळेचें सुख । वरी विषय भरडी. ॥ ३४९ ॥ ऐसे या त्रिगुणें धाडिवे । देहात्मबुद्धीनि दैवें । सांपडलीं तें स्वभावें । भोगिती ऐसें. ॥ ३५० ॥ हे देखोनि बांधवडी । जो ब्रह्माहमस्मि खेंगं कांडी । तो एकला करी देशधडी । त्रैवर्गिकांतें. ॥ ३५१ ॥ हा अवघा मेळावा । पळोनि जाय गुणगावां । तेथहि करोनि रिघावा । संपिलीं मारी. ॥ ३५२ ॥ तया तिहीं-माजी पहावो । थोर लागे घरकलहो । वडील लागे खावो । दोघांतेंही.

१. आधार. २. (ब) समस्त आत्मत्वें प्रकाशे. ३. निष्फळ, शुद्ध. ४. धाड. ५. धड? ६. गृहदारादिकांच्या दुःखानें. ७. मोहरूप विंचवानें. ८. न सांठवे, आवरत नाहीं. ९. गहिंवर. १०. मी ब्रह्म आहें. ११. खड्ग. १२. कांडी. १३. पळवून लावी. १४. त्रिगुणांतें. १५. समूळ. १६. सत्व, रज, तम या तीन गुणांत.

॥ ३५३ ॥ दोनी खावोनि एकला । घावो न लागतां निमाला । एवं जो जाहला । निस्त्रैगुण्य. ॥ ३५४ ॥ त्यासी विधिनिषेधाची कडी । पहिलेचि तुटली बेडी । स्वानंदामाजी सबळ बुडी । स्वसंवेद्य जाहला. ॥ ३५५ ॥ जेव्हां नास्तिक्याची घडी । उकलोनि, 'आस्तिक्याचि गुडी । उभविली त्याणें धेंडफुडी । आचार्यकृपा. ॥ ३५६ ॥ तेव्हां अभाव कीं वैभव । सगुण कीं निर्वेव । अनुभवानुभव । अनुभविजे. ॥ ३५७ ॥ तेथ हेत ना मात । दृश्य ना दृष्टांत । गुणी गुणातीत । चिद्व्योम जो. ॥ ३५८ ॥ जो जगद्गुरु जनार्दन । भवगजपंचानन । ज्याचेनि सकळ जन । परिणत असे. ॥ ३५९ ॥ जो अमनमनाची माउली । कीं शांतिविश्रांतीची साउली । अनुभवाही गुंतकुली । आनंद ज्याचेनी. ॥ ३६० ॥ तो धृतीचा धारक । निजजनतारक । स्वात्मबोध-कारक । सकळ द्रष्टा. ॥ ३६१ ॥ तो एका एकपणें । एका नामस्मरणें । एका जनार्दनें भोगणें । हें निर्वेद्य सुख. ॥ ३६२ ॥ जें सारासार मथित । जें शुकभोग्य नित्य । तेंचि बोलिला सत्य । श्लोकार्थेंसी. ॥ ३६३ ॥ आतां अष्टमावरील टीका । काय अष्टमा सिद्धि होतील एका । कां अष्टम अवतार देखा । नाचेल तांडवीं. ॥ ३६४ ॥ तेथ सांडूनियां असत्य । उघड दाविजेल सत्य । जेणें सत्य सत्यवंत । सत्यत्वा येती. ॥ ३६५ ॥

**सत्यं सत्यं परममृतं शांतिकल्याणरूपं**
**मायारण्ये दहनमनिशं शांतिकल्याणदीपम् ।**
**तेजोरूपं निगमसदनं व्यासपुत्राष्टकं यः**
**प्रातःकाले पठति मनसा याति निर्वाणमार्गं ॥ ९ ॥**

मागिल्या श्लोकार्थें । बोलिलें सत्य सत्य । जें सकळ इंद्रियें सत्यातें । भोगोनि सत्यत्वें वदलीं (?) ॥ ३६६ ॥ भगवद्रूप सत्यभूत । सत्यभोग इंद्रियीं नित्य । यालागीं सत्य सत्य । द्विवचनार्थ बोलिलें. ॥ ३६७ ॥ या इंद्रियांचा अनुभवु । नावेक प्रकट करूनि दावूं । म्हणतसे जिवाचा जीवु । शुकशार्दूळ. ॥ ३६८ ॥ सकळ इंद्रियें तृप्त । सेवूनि परमामृत । तो अनुभवभोग गुप्त । परी प्रकट करूं. ॥ ३६९ ॥ पढे पाहे पढे अर्थें । तो तृप्त होय परमामृतें । मऱ्हाटें न म्हणावें येथें । अनुभवकसवटी हे. ॥ ३७० ॥ तरी दृष्टी सत्यत्व कैसें । जो जो पदार्थ आभासे । तो स्वदेहीं सकट दिसे । दृश्यातीत. ॥ ३७१ ॥ कां दृश्य दृष्टीचा मेळा । नहोनि दृश्य दृष्टीवेगळा । भोगवी सत्य सोहळा । सचि-

---

१. खरोखर. २. निरवयव. ३. अनुभव+अननुभव. ४.परिणामास पोंचलेले. ५. गुदगुल्या?

दानंद. ॥ ३७२ ॥ जैसें हेमचि आइतें। प्रीति करी अलंकारातें। तैसें नानारूप दृश्यातें। आवडी भेटे. ॥ ३७३ ॥ एवं दृश्यदृष्टी देखणा। अनुस्यूत[1] होऊनि जाणा। जो श्रुतीसही अप्रमाणा। तो परिमाणामाजि भेटे. ॥३७४॥ तरी एकावया कारणें। श्रवणचि सत्य करणें। मग जे जे गिरा परिसणें। ते सत्यचि. ॥ ३७५ ॥ कीं श्राव्य श्रावक श्रुति। हे त्रिधा स्वात्मअनुस्यूति। सांगतां आइकतां होती। गगनाचा पितामह(?) ॥ ३७६ ॥ कां बोलासि बोलविता। त्यासी दृढ केली आत्मता। तरी बोल बोलकियाआतौता। विरोनि जाय. ॥ ३७७ ॥ मग शब्दा आतौता आणि बाहिरा। निःशब्दाचा उभारा। हेतु श्रवणद्वारा। सत्याचा भोग. ॥ ३७८ ॥ घ्राणाचिया परिमळा। सुमन करूनि लीळा। भोगूं जाय तंव सांवळा। भोग्य भोग भोक्ता. ॥ ३७९ ॥ तो सुवास अंतरीं। घ्राणा आंतबाहेरी। रिघाला भोग करी। आपापुला. ॥ ३८० ॥ रसीं रसपण। जिव्हे रसज्ञ। उभयां एकपण। रसभोग भोगी. ॥ ३८१ ॥ तो ग्रास घाली स्वमुखीं। त्याणें जगदोदर पोखी[2]। कीं विश्वंभरु सुखी। तृप्तपणें. ॥ ३८२ ॥ ग्रास रस रसनेमाजी। देखे अनुस्यूतता सहजीं। मग भक्ष्य आणी भोज्यीं। भोगुनि अभोक्ता. ॥ ३८३ ॥ रसीं रसपण देखे। दृष्टी विषयो पारखे। त्याणें निर्विषयत्वीं तोखे। नित्य तृप्त. ॥ ३८४ ॥ असो ऐसी तृप्ति जहाली। तंव क्षुधा अधिक खवळली। रिती वीख[3] नाहीं उरली। परी पोट न धाय. ॥ ३८५ ॥ ताट भोक्ता भोजन। अवघेंचि जाहला आपण। हात न माखतां आपोशन। तेणें केलें. ॥ ३८६ ॥ यापरी तृप्त जाहला। सर्वेचि संसारा आचवला। शेखीं धाला ना भुकेला। नित्य तृप्त. ॥ ३८७ ॥ स्पर्श जो लागे। तो आंगींचेनि आंगें। पार्थिव[4] टाकोनि मागें। विदेह भोगी. ॥ ३८८ ॥ मृदू कां कठिण। शीत कां उष्ण। परी नये एक प्रमाण। द्वंद्वातीत. ॥ ३८९ ॥ शय्याशयन सेजारी[5]। आपणची तळीवरी। ऐसिये सेजे अरुवारी[6]। शून्य होऊनि पहुडे. ॥ ३९० ॥ चालावया कारणें। अचरणी अवश्य होणें। पृथ्वी अवलोकनें। सपाट करी. ॥ ३९१ ॥ मग निराळा होऊनि आगळी। सप्त पाताळा तळीं। वाट करी सोज्वळी। चालावया. ॥ ३९२ ॥ एवं वर्ततां ऐसा होय। येरवीं चिन्मात्र पाहे। पाहातीही विद्या खाय। निपटोनियां. ॥ ३९३ ॥ सर्व इंद्रियांसि देही। सत्यत्व या

---

१. एकसारखें असणारें, अखंडदंडायमान. २. पोषी, पोषण करी. ३. वाट, रिकामी जागा? (ब) वाडी. ४. शरीर. ५. शेजारी, निजणारा. शेजार=शय्यागृह. ६. मृदु.

स्थिती पाही । रोकडे ठायींच्या ठायीं । प्रत्यक्ष जाहलें. ॥ ३९४ ॥ येवढा स्वप्रकाश ठसा । पहिला झांकिला होता कैसा ? । आतां देखतां हे दशा । कैंची म्हणसी ? ॥ ३९५ ॥ तरी जन्मलेया बाळा । उघड दिसतसे डोळां । परी पदार्थी सकळां । ज्ञान नाहीं. ॥ ३९६ ॥ तोचि प्रौढवयसें । सर्व पदार्थी ज्ञाता दिसे । तेंवी अहंतेचेनि नासे । हंता प्रत्यक्ष. ॥ ३९७ ॥ सर्व इंद्रियप्रवृत्ती । जरी हा भोग भोगिती । त्यासी सत्याची प्रतीति । हातवसे सिद्ध. ॥ ३९८ ॥ जें सत्याचें सत्य । सत्यपणें नित्य । त्यासी जाण प्राप्त । ज्यासी हा भोग. ॥ ३९९ ॥ सत्यासत्य दोनी । त्यजूनि बैसे समदर्शनी । तेणें सत्याची राजधानी । भोगिजे येणें भोगें. ॥ ४०० ॥ हा सत्य स्वादु साचें । त्यासि अमृतही न रुचे । अमृता गोडपण ज्याचें । तो सर्व इंद्रियें भोगी. ॥ ४०१ ॥ ज्यालागीं अमृत आर्त । त्यासि म्हणिजे परमामृत । प्रकट केलें गुप्त । होतें जें अष्टकामाजी. ॥ ४०२ ॥ या अष्टकाचेनि अर्थे । शांतिसी विश्रांतीतें । आणूनि कल्याणातें । प्राप्त करी. ॥ ४०३ ॥ जें शांतीसी कल्याणरूप । मोडी अविद्येची झोंप । स्वानंदसुख अमूप । प्राप्त अष्टकें येणें. ॥ ४०४ ॥ शांतीचें कल्याण । तेंचि होय आपण । येणें अष्टकें जाण । अर्थी तया. ॥ ४०५ ॥ मायेचें भववन । वासनावेली केंवळण[2] । अहंकारकंटक पूर्ण । सावजें जीं. ॥ ४०६ ॥ जेथें आशा व्याघ्रिणी व्याली । दुसरी तृष्णा आस्वली । क्रोध अजगराची वळली । सदा पृष्टी. ॥ ४०७ ॥ उन्मत्त कामगजें । फळकामने किलिकिलिजे । मोहनीडीं घुमघुमिजे । असूया पारावती. ॥ ४०८ ॥ जेथ इच्छेचीं कोलीं । कैंकत तोंडें वरतीं केलीं । वनामाजी नाहीं चाली । मान वृश्चिका भेणें. ॥ ४०९ ॥ असत्याची आराटी । स्नेहाचिया बोराटी । मदाचा घांट बेटीं । प्रमदा[3] मैंदें. ॥ ४१० ॥ तेथ कटाक्षाचे पाश । बहु आलिंगणें दावी दोष । वरी कुचपाषाणघोष । हाणती घाय. ॥ ४११ ॥ विषयांचे उमाळे । दिसती वांझ फुलें । त्यालागोनि गुंतले । जीवभ्रमर. ॥ ४१२ ॥ या वनाचे शेवटीं । संकल्प श्वान गांठी । बैसला भुंकत पाठीं । लागतसे. ॥ ४१३ ॥ त्या वनाचे दाहक । समूळ हें अष्टक । जो अर्थी निःशंक । अभ्यास करी. ॥ ४१४ ॥ त्या अभ्यासाचेनि बळें । गुरुवाक्य अरणी[4] मेळें । एकाएकीं ज्ञाना बळें । प्रदीप्त होईजे. ॥ ४१५ ॥ तो

१. हस्तगत करी. २. मिठी मारणें. ३. तरुण स्त्रिया ह्याच फासेगार अथवा घातकी. ४. विस्तव पाडावयाचीं दोन लांकडें.

प्रकटतांचि एकसरें । मायावन चोफेरें । जाळितूचि भरे । ब्रह्मांडवरी. ॥४१६॥ तेथें श्वापदवन विषम । जाळोनि केलें भस्म । मग चैतन्याग्नि तेजोत्तम । स्वप्रकाश. ॥ ४१७ ॥ वन अवघेंचि जळे[1]। तरी अग्नी अधिक प्रज्वळे । इंधन नाहीं परी प्रबळे । असमसाहस. ॥ ४१८ ॥ ऐसा मायारण्यदाहक । इये अष्टकाचा विवेक । कीं शांतिदीपाचा दीपक । सकळद्रष्टा. ॥ ४१९ ॥ जें सकळ क्षमा कल्याण । शांतीचें अधिष्ठान । तेथील प्रकाशिता जाण । अष्टकविवेक. ॥ ४२० ॥ जें सकळ यज्ञाचें बीज । कीं सर्व तेजाचें तेज । प्रकाशाचें निज- । स्वरूप उघडें. ॥ ४२१ ॥ तें अष्टकमिसें । हाता फावे अप्रयासें । शब्द सांडूनि वेदें[2]वसें । तें हें प्रमेय. ॥ ४२२ ॥ हें अष्टक नव्हे साचार । वेदवस्तीचें अग्रहार । शास्त्रें वेवाद[3] वोरंबार[4] । संपवि तें हें स्थळ. ॥ ४२३ ॥ यालागीं निगमाचें सदन । समस्तगुह्य ज्ञानवदन । अध्यात्म-समाधान । तें हें अष्टक. ॥ ४२४ ॥ जो वेदसरोवरींचा हंस । द्विभुज जाहला जगदीश । अवतरला परम पुरुष । द्वैपायन[5]. ॥ ४२५ ॥ जो विवेकाचा उदधी । आनंदाचा मंगळनिधी । त्याचा पुत्र सुबुद्धी । शुकयोगींद्र. ॥ ४२६ ॥ या शुकाष्टकपवित्रा । औटचरणी विचित्रा । वोवियां[6] नव्हती अर्ध मात्रा । औटावी हे. ॥ ४२७ ॥ वोवी दाखवी विवेकातें । पावन करी औटहातें[7] । एकदेशी[8] सरतें[9] । व्यापकामाजी. ॥ ४२८ ॥ त्या व्यास-सुताचें अष्टक । पठण करी जो पाठक । त्यासी ज्ञानाचें सम्यक । तारूं लागे. ॥ ४२९ ॥ मा जे मनीं निष्टंक[10] । विचारिती हा विवेक । त्यांसी प्राप्ताप्राप्तदा-यक[11] । सेव्य करी. ॥ ४३० ॥ निर्वाण अत्यंत असे । तो मागत्याचें घर पुसे । प्राप्ती त्यापासीं असे । ज्ञानरूप. ॥ ४३१ ॥ म्हणोनियां अष्टकाचें । मन न करी साचें । तरी अप्राप्त फळ त्याचें । खेळणें होय. ॥ ४३२ ॥ जो अध्यय प्राप्त प्रातःकाळीं । हें अष्टक मणी जप माळी । मनाच्या करकमळीं । प्रत्या-वृत्ति करावी. ॥ ४३३ ॥ त्यासी सायंकाळ मध्यान्ह । हें गेलें हरपोन । अवघी उखा[12]चि उजळोन । राहे बाळसूर्य. ॥ ४३४ ॥ ज्या सूर्याचेनि प्रकाशें ।

१. अनिवार. २. वेदांत असणारें. ३. विवाद. ४. खटपट. ५. कृष्णद्वैपायन या नांवाचा व्यास. ६. या टीकेंतील ओव्या साडे तीन चरणी आहेत. आणि ॐकारांत अकार, उकार, मकार आणि अर्धमात्रा अशा साडेतीन मात्रा असल्यामुळें कवीनें आपल्या ओवीला ॐकाराचें सादृश्य व योग्यता आहे असें दर्शविलें आहे. ७. साडेतीन हात शरीरें. ८. निराळेपणानें राहणारें. ९. मिळून जातें. १०. निश्चयानें. ११. परमेश्वर. १२. उषस्, प्रातःकाल.

स्वयें नुरे जें भिन्न वसे । त्या सूर्याचेनि सौरसें । अष्टक केलें. ॥ ४३५ ॥ जो सकळजनव्यापक । जनार्दन पददायक । त्याचेनि एकाएक । भवपाश तुटला. ॥ ४३६ ॥ सायुज्य लग्नघटिका । घालूनियां अष्टका । ब्रह्मसुमुहूर्तीं पाठका । सावधान नित्य. ॥ ४३७ ॥ पूर्वीं [1]भानुकृपासौरस । पितामह पिता भानुदास । त्यापासोनि हा वंश । जनार्दन प्रिय. ॥ ४३८ ॥ तो जनार्दन प्रिय एका । मूळमार्ग श्रीशुका । लागोनि केली टीका । स्वात्मबोधें. ॥ ४३९ ॥ जो हें पढे पाहे परिसे । ते तिघे येती एकदशे । तळीं वरी पंक्ती जैसें । रससेव्य एक. ॥ ४४० ॥ हें अष्टक नव्हे सायुज्य ताट । श्रीशुकालागीं चोखट । केलें तेथ अवचट । दोषविभागी जाहलों. ॥ ४४१ ॥ हें अष्टक नव्हे अष्टशाखा झाड । अग्रीं शुक फळ सेवी गोड । तेणें एकाएकीं हें पाड । शुकें दिधलें आहे. ॥ ४४२ ॥ ऐसी कृपा श्रीशुका । उपजोनि दिधलें अष्टका । नित्य जनार्दन एका । एकपणें नांदवी. ॥ ४४३ ॥ एका जनार्दनीं पाहीं । तरी हें कांहींच नाहीं । रत्नमाळ कहीं । ज्ञापपण होतें. ॥ ४४४ ॥ एका जनार्दना शरण । त्या शब्दा ये भेदपण । परी सायुज्याहून जाण । गुरुभक्ती गोड. ॥ ४४५ ॥ एका जनार्दनीं नामीं । बोलतांचि मौनी आम्हीं । या लागीं आत्मारामीं । संपूर्ण ग्रंथ. ॥ ४४६ ॥

---

## १५. श्रीएकनाथकृत [2]आनंदलहरी.

(ओव्या.)

ॐ नमो सच्चिदानंदघना! । ॐ नमो परात्परपूर्णा! । [3]ॐ मोक्षाचिया निधाना!। जगज्जीवना! मूळबीज तूं. ॥ १ ॥ ॐ नमो सकळव्यापका! । ॐ नमो आनंदाचिया निजसुखा! । आनंदी आनंद तुझेनि देखा । तो तूं लोकां प्रत्यक्ष. ॥ २ ॥ ॐ नमो अव्यक्त परब्रह्मा! । ॐ नमो सर्व सुखाचिया निजधामा! । ॐ नमो भक्ताचिया कल्पद्रुमा! । तुज उपमा [4]आन नाहीं. ॥ ३ ॥ ॐ नमो आदिपुरुषा! आदिदैवता! । ॐ नमो उत्पत्तिप्रळयविरहिता! । पाहतां तूं सक-

१. एकनाथाचा आजा भानुदास हा सूर्योपासक होता असें यावरून स्पष्ट होतें. सौरस=प्रसाद.
२. या आनंदलहरीच्या दोन पोथ्या आम्हांस मिळाल्या. त्यांपैकीं पहिली (अ) रा० विष्णुबोवा मटंगे सातारकर यांजकडून, व दुसरी (ब) रा० गणेश काळबा गाडेकर वेंगुर्लें यांजकडून. या पोथ्या आम्हांस दिल्याबद्दल आम्ही वरील गृहस्थांचे फार आभारी आहोंत. ३. (ब) ॐ नमो सकळ सुखाचिया निधाना. ४. अन्य, दुसरी. तुझ्यासारखा तूंच.

ळांचा जनिता । सकळ भूतां सत्ता तूझीच. ॥ ४ ॥ ॐ नमो ज्ञानसागरा! । ॐ नमो त्रिमूर्तिअवतारा । ॐ नमो मोक्षाचिया निजघरा! । विश्वंभरा! तुज नमो. ॥ ५ ॥ तुझें निजरूप पाहतां दृष्टी । [1]निजानंद न समाये सृष्टी । तुटल्या जन्ममरणाच्या गांठी । निर्भय पोटीं मी जालों. ॥ ६ ॥ [2]बंध चहूं मुक्तींची [3]अटाअटी । संचरली होती माझ्या पोटीं । होतां तुझी कृपादृष्टि । [4]उठाउठी ते पळाली. ॥ ७ ॥ तुझें रूप पाहतां कांहीं । बंध मुक्ति दोन्ही नाहीं । व्यापक तूं सकळ देहीं । आनंदडोहीं जेंवि तरंगु. ॥ ८ ॥ बंध मुक्तीची काहणी । ऐकिली जेंवि स्वप्नीं । जागृतीमाजी येऊनि । [5]साच मानिती कोण तीतें? ॥ ९ ॥ स्वर्ग नर्क दोन्ही शब्द । हा अज्ञानाचा [6]अनुवाद । सद्गुरुकृपें जालिया बोध । जालें सर्व चैतन्य. ॥ १० ॥ सगुण आणि निर्गुण । हें शब्दाचें [7]लाघवपण । जेथें शब्दचि झाला शून्य । गुणागुण उरे कोठें? ॥ ११ ॥ तुझी इच्छा जे मायाशक्ति । ते अनंत ब्रह्मांडें जाली रचिती । करी पंचभूतांची [8]व्यक्ति । जैसी संतती वांझेची. ॥ १२ ॥ जैसा कल्पनेचा विस्तारु । हृदयीं करितसे अपारु । पाहतां न दिसे साचारु । तैसा विचार मायेचा. ॥ १३ ॥ अहर्निशीं तुझ्या स्वरूपीं असती । तयांस कळली मायेची स्थिति । सकळ मिथ्यत्वें देखती । अज्ञानाची भ्रांति त्यांसि नाहीं. ॥ १४ ॥ मुक्तीचा वळसा । तेचि अज्ञानाची दशा । बहु निद्रिस्त [9]वोसणे जैसा । भ्रांतीचे फासा पडलासे. ॥ १५ ॥ ज्यातें तुझी कृपा जाली । त्याची भ्रांति निरसली । कल्पना विरोन गेली । वृत्ति बुडाली तुझ्या स्वरूपीं. ॥ १६ ॥ परिस लागलिया लोहातें । दूरी केलें काळिमेतें । श्रेष्ठत्व आणिलें नीचातें । परि [10]अंळंकारातें न मुके. ॥ १७ ॥ पूर्वकर्म जें घडलें । तेणें नामपण पावलें । लोहपणातें मुकलें । न मोडितां जाहलें सुवर्ण. ॥ १८ ॥ तैसें तें कृपावंतें । निरसिलें भ्रांतिकाळिमेतें । निरसून अज्ञानातें । निजसुखातें मेळविलें. ॥ १९ ॥ परि देहाचिया माथां । आहे कर्मरेखीची सत्ता । ते न चुकेचि गुरुनाथा । सुखदुःख संचित भोगवी. ॥ २० ॥ पूर्वकर्म जें घडलें । त्या अळंकारातें आटिलें । तें नगपणा मुकलें । केवळ जाहलें सुवर्ण. ॥ २१ ॥ घालूनि आशेचा पाश । हिंडवी नाना विदेश । [11]हिंपुटी करूनि देहास । [12]संचित तैसें भोगवी. ॥ २२ ॥ जैसा वृक्ष छेदलिया समूळ।

१. मावे. २. अज्ञानाचें बंधन आणि सलोकता, सरूपता, समीपता, सायुज्यता या चार मुक्ति. (अ) बहुत मुक्तींची. ३. खटपट. ४. झटपट. ५. (अ) साच न म्हणे कानातें. ६. बोलणें. ७. चमत्कार, गंमत. ८. स्पष्टता. (अ) युक्ति. ९. बरळतो. १०. लोखंड असतांना असलेल्या आकाराला. ११. कष्टी, दुःखी. १२. सांचलेलें, जन्मांतरीं करून ठेविलेलें कर्म.

आर्द्रता न तुटे तात्काळ । आंगीं असोनि अल्पकाळ । मग केवळ काष्ठ होये. ॥ २३ ॥ पत्र आणि पुष्पफळ । सहीत वाळला वृक्ष समूळ । अग्निसंगें केवळ । भस्म होय. ॥ २४ ॥ तैसी सद्गुरूची कृपा होये । तोडी विवेकाचेनि घायें । देहवृक्ष पडिला पाहें । [1]आर्द्रता राहे संचिताची. ॥ २५ ॥ तैसा अनुभवें वाळत । संचित क्रि[2]यमाणासहित । वृक्षाची खुंटली मात । पा[3]वलिया देहान्त शून्य होय. ॥ २६ ॥ भस्म जाहल्यानंतरें । मग वृक्षासि ठावचि नुरे । तैसा देह स्वरूपीं विरे । पुढतीं वोसँरे जन्ममरण. ॥ २७ ॥ तैसेंचि देह पावलियीं लय । पूर्वकर्म सहजचि जाय । संचितासही नुरे ठाय । सहज होय सुखरूप. ॥ २८ ॥ पूर्वकर्माची ऐसी परी । गुरुभक्त नेघे आपणावरी । राहोनि आनंदाभीतरीं । साक्षित्वें व्यवहारीं वर्तती. ॥ २९ ॥ जैसें जळामाजी पद्मपत्र । जळीं असोनि अलिप्त । तैसें मुक्त व्यवहारीं वर्तत । सुख भोगित स्वानंदें. ॥ ३० ॥ भवभ्रमातें निरसिलें । जन्ममरणातें चुकविलें । देही असतां मुक्त केलें । स्वरूपीं मेळविलें आपुलिया. ॥ ३१ ॥ तुझिया स्वरूपाचा अनुभव । जाणती साधु सज्जन प्रभाव । विसरूनि देहींचा देहभाव । सुखें स्वानुभवें भोगिती. ॥ ३२ ॥ जो अमृताचे सागरीं । अहर्निशीं क्रीडा करी । तो जन्ममरणाचें भय धरी । हें कैशापरी घडों शके ? ॥ ३३ ॥ जेथें जन्ममरण जालें वांवो । तेथें बद्धमुक्त कैंचा डावो ? । जीव गिळोन आपला उँगव । विसरला पहा हो दुजेंपण. ॥ ३४ ॥ ऐसी तुझे कृपेची करणी । भवभ्रम निरसिला तत्क्षणीं । निद्रिस्त वोसणावे स्वप्नीं । तयातें उठवूनि सावध केलें. ॥ ३५ ॥ पुरुषोत्तम नाम पंचाक्षर । जो भावें भजे निरंतर । तेथें कैंचा भवभ्रमसंचार । न चले व्यापार पंचभूतांचा. ॥ ३६ ॥ सद्गुरुचरणीं जयाचा भावो । तया बद्धमुक्त जाला वावो । त्यातें काळ विसरला पहा हो ! । तया ठाव ब्रह्मपदीं. ॥ ३७ ॥ जैं पतंग भक्षी वडवानळासी । कीं दर्दुर गिळी शेषासी । जैं खद्योतें गिळिजे रविबिंबासी । तैं गुरुभक्तासी बद्धता. ॥ ३८ ॥ जे भावार्थाचे नि[11]जगाढे । तयां बद्धता कैशी न घडे ? । यमपुरी ओस पडे । म्हणवोनि रडे प्रे[12]तनाथ. ॥ ३९ ॥ जैं वायसें युद्ध कीजे खग-

---

१. (अ) वृक्षाचें खुंटलें मूळ । अज्ञान केवळ काष्ट होये. २. चालू जन्मांत होणारें कर्म. ३. देहान्त पावलिया=देह भस्म झाल्यावर. (अ) पावल्या देहातें शून्य होय. ४. संपे. ५. (अ) अनुसरें. ६. व्यर्थ, खोटें. ७. उत्पत्ति. ८. दिव्यावर झडप घालणारा किडा. ९. बेडूक. १०. काजव्यानें. ११. पूर्ण विश्वास ठेवणारे (?) १२. यम.

पतीसी । जैं पिपीलिका सप्तसागर शोषी । जैं मुर्कुटें[१] गिळिजे ब्रह्मांडासी । तैं गुरुभक्तासी बद्धता. ॥ ४० ॥ जेंवि चित्रींचिया हुताशनें[२] । दग्ध होती महावनें । जेंवि रज्जुसर्पाचिया[३] पोंनें[४] । मृत्यु पावे कृतांत. ॥ ४१ ॥ कीं मशकाचिये[५] थडके[६] । महामेरु चिरों शके[७] । कीं प्रेताचिये धाके । झडपों[८] शके महाकाळ. ॥ ४२ ॥ किं वांजेचिया सुतें । रणीं जिंकिजे इंद्रातें । कीं कासवाचेनि[९] घृतें । कुंभकर्णा तरंळ[१०] होय. ॥ ४३ ॥ हें[११] ईश्वरइच्छेनें घडे । परि गुरुभक्तासि बद्धता न घडे । जन्ममरणाचें फिटलें कोडें । तुटलें बिरडें[१२] मायेचें. ॥ ४४ ॥ जे माया त्रिभुवन व्याली । सकळ भूतांतें व्यापूनि ठेली । निमिषमात्रें ब्रह्मांडें रचिलीं । सृष्टी केली स्वइच्छा[१३]. ॥ ४५ ॥ तयेचा नेणती पारु । ब्रह्मादि हरिहरू । उत्पत्ति स्थिति संहारू । हाही व्यापारू मायेचा. ॥ ४६ ॥ त्रैमूर्तीची जी सत्ता । हे मूळमायेची प्रतापता । शक्तिवीण कार्यकर्ता । हें सर्वथा कदापि न घडे. ॥ ४७ ॥ अगाध मायेचें करणें । रचूनि नाना विंदाणें[१४] । करूनि अवघें विसर्जन । अलिप्तपणें वर्तत. ॥ ४८ ॥ जे स्वरूपीं इच्छा जाली । ते माया नांव पावली । सकळ भूतांतें प्रसवली । सृष्टि निर्मिली पळमात्रें. ॥ ४९ ॥ शिवा[१५] आणूनिया जीवपण । तयासि लाविलें जन्ममरण । सुखदुःखादि भोग दारुण । करूनि आपण निराळी. ॥ ५० ॥ ऐसी हे माया सबळ । एवढें रचिलें जगद्व्याळ[१६] । ते[१७] गुरुभक्तापुढें केवळ । मिथ्या मृगजळ होऊनि ठेली. ॥ ५१ ॥ शिव विरिंचि[१८] नारायण । आणि साधुसंत योगी जाण । हे स्वरूपीं जाले निमग्न । यातें माया वदन दावूं न शके ॥५२॥ जेथें अज्ञानाचा सुकाळ । तेथें मायेचा गोंधळ । जो ज्ञाता अनुभवी केवळ । त्यातें[१९] विटाळ मायेचा. ॥ ५३ ॥ जरि म्हणाल मायेचा विटाळ । तरि कां धरिला देहस्थूळ । म्हणती तें केवळ । अज्ञान समूळ जाणावें. ॥ ५४ ॥ मायेसि नाहीं स्वतां चळण । तिसीं चाळविता आदिनारायण ।

१. घुंगुरट्यानें. २. अग्नीनें. ३. दोरी हाच कोणी सर्प त्याच्या. ४. दंशानें. ५. चिलटाच्या. ६. थडके=थडकेनें. ७. (अ) महागिरि पडों शके. ८. झडपणें=भुतानें वगैरे पछाडणें. ९. कासवाचें तूप हा एक विकल्प (अशक्य गोष्ट) होय. कारण त्यास दूधच नसतें. 'कूर्मदृष्टीनें सांभाळी' हा तुकारामाच्या अभंगांतील दृष्टांत प्रसिद्धच आहे. १०. अजीर्णाची हागओक. ११. वरील असंभवनीय गोष्टी. १२. गांठ. १३. आपल्या इच्छेनें. १४. कारागिरीचे किंवा कौशल्याचे पदार्थ. १५. परमात्म्यास. १६. जगद्व्याल, जगसर्प, जगरूपी मोठा पसारा. १७. ती माया. १८. ब्रह्मदेव. १९. तो मायेचा स्पर्श करून घेत नाहीं.

[1]मायापट आड लावून । भूतांतें आपण चेष्टवी. ॥ ५५ ॥ जैसी छाया मंडपाभीतरीं । एकला बैसोन सूत्रधारी । वस्त्रें लावूनि माझारीं । प्रभा अंतरीं दीपाची. ॥ ५६ ॥ नाना अचेतन[2]पुतळिया । स्वइच्छया नाचवी तया । हावभाव दावोनिया । जन भुलवावया खेळतो. ॥ ५७ ॥ एक एकातें मारित । आपणचि शंखध्वनि करित । काय जालें म्हणवूनि पुसत । आणि हंसत आपणचि. ॥ ५८ ॥ [3]भंडउभंडातें दावी । नाना पातकातें करवी । गांईपाठीं व्याघ्र लावी । आणि मारवी तयातें. ॥ ५९ ॥ अनंत पुतळियातें दावित । संहारहि स्वइच्छा करित । अज्ञानातें सत्य भासत । जसें मेले ना जीत तया ठायीं. ॥ ६० ॥ दाखवी नाना सुखदुःखातें । हें होय जी कवणातें । एकावीण दुजें नाहीं तेथें । पापपुण्यातें ठाव कैंचा? ॥ ६१ ॥ तैसीच भगवंतलीला अवतारी । चिदाकाशींचिया[4] मंडपाभीतरी । मायापट आड लावूनि माझारी । प्रभा अंतरीं स्वरूपाची. ॥ ६२ ॥ नाना याति नाना वर्ण । नाना कर्म पापपुण्य । सुखदुःखादि भोग दारुण । करूनि आपण निराळा. ॥ ६३ ॥ जो जसें जैसें चेष्टवीत । तैसीं तैसीं भूतें चालत । सर्वहि कर्ता भगवंत । पापपुण्याची मात कवणातें? ॥ ६४ ॥ पापपुण्य हें बोलणें । जैसें शेतामाजी [5]बुझावणें । तेथें नसे साचपण । व्यर्थचि भिणें वनचरीं. ॥ ६५ ॥ तैसे जे अज्ञान जन । तयांतें दिसे पापपुण्य । जे जीवन्मुक्त सज्ञान । तयांसी त्रिभुवन मुक्त दिसे. ॥ ६६ ॥ जो सकळांचा जाणता । तो मायेचा नेणता । साधु भगवंताचिया समता । म्हणोन बद्धता न घडे त्यासी. ॥ ६७ ॥ ज्यांसि माया मिथ्या कळली पाहीं । ते देही असोनि विदेही । जन्ममरणांचें भय नाहीं । सच्चिदानंदडोहीं क्रीडती. ॥ ६८ ॥ जयासि नाहीं आत्मज्ञान । तयासि देहाचें बंधन । नानाभोग दुःख दारुण । जन्ममरण भोगवी. ॥ ६९ ॥ जे सद्गुरूचे अंकित । तयांसि देह दुर्लभ बहुत । स्वरूपीं होऊनिया रत । सुख भोगित स्वानंदें. ॥ ७० ॥ जैसें द्रव्याचिये गुणें । एकीं विष घेऊन भक्षणें । एकीं उपभोग करणें । एक दानधर्म करिताती. ॥ ७१ ॥ द्रव्यासि नाहीं दूपण । आपुलें संचित भोगणें । तैसें देहाचिया गुणें । बंधमुक्तपणें भोगिजे. ॥ ७२ ॥ जे नाना पातकातें करिती । तयांसि देह काय म्हणती? । कां जे श्रीगुरूस शरण रिघती । तयांसि सांगती देह काय? ॥ ७३ ॥ देह पाहतां अचेतन ।

१. मायारूपी पडदा. २. सूत्रबाहुल्या. ३. निरर्थक भांडणास. ४. ब्रह्मरूप आकाशाच्या. ५. पक्ष्यांना वगैरे भय दाखविण्याकरितां शेतांत जें उभें करितात तें.

देहासि कैसें दूषण? । जो देहातें चेष्टविता जाण । सुखदुःख भोगणें त्यालागीं. ॥ ७४ ॥ जैसी काष्ठाची पुतळी । सर्वेइंद्रियेंसी निर्मिली । परि चालवित्या-विणें चाली । प्रेतरूप. ॥ ७५ ॥ चाळविता बैसोनि अंतरीं । वोढी इंद्रियांची दोरी । मग प्रवर्ते व्यापारीं । सूत्रें अनुक्रमें. ॥ ७६ ॥ तेथें सुख-दुःख अवस्था । कैसी घडेल पुतळीचिये माथां? । जो अंतरीं चेष्टविता । तोचि कर्ता सर्वेहि. ॥ ७७ ॥ तैसे देह अचेतन । यातें चाळवितें मन । सर्व इंद्रियें आधीन । हा स्वामी जाण इंद्रियांचा. ॥ ७८ ॥ पापपुण्याची कल्पना । संकल्पविकल्प उठवी मना । विसरवूनिया आत्मज्ञाना । जन्ममरणा भोगवीत. ॥ ७९ ॥ ज्यास सद्गुरूची कृपा होये । त्याचें मनपण विरूनि जाये । संकल्पाहि नुरेचि ठाये । मिरासी होय मोक्षाची. ॥ ८० ॥ सद्गुरूचे कृपेवीण । नव्हे मोक्षाचें साधन । जन्ममरणाचें बंधन । न चुके जाण सर्वथा. ॥ ८१ ॥ एक गुरुभक्तातें निंदिती । एक गुरु म्हणजे काय म्हणती । जे जे गुरूतें सेविती । तयां प्राप्ती काय जाली. ॥ ८२ ॥ सद्गुरुभजनीं लाधलें सुख । तें नेणती अज्ञान मूर्ख । विषयसुखें मातले देख । जन्ममरणाचें दुःख भोगिती. ॥ ८३ ॥ जैसी नपुंसकासी पद्मिनी । कीं उ[१]लूकासी दि[२]नमणी । कां निर्नासिकासी दर्पणीं । देखतां नयनीं सुख काय? ॥ ८४ ॥ कीं गर्भांधासी लावण्यता । किंवा गर्दभासी सुगंधता । किं शूकर मिष्टान्नभोक्ता । हें सर्वथा कदापि न घडे. ॥ ८५ ॥ किंवा श्वानासी सेज सुमनांची । किंवा बधिरासी गोडी कीर्तनाची । किंवा रोगियासी पक्वान्नाची रुची । हें कदापि सर्वथा घडेना. ॥ ८६ ॥ मुक्यासी शब्दाची चातुर्यता । किंवा म्हैसा होईल पुराणवक्ता । किंवा पांगुळ जाईल स्वतां तीर्था । हें कदापि न घडेचि. ॥ ८७ ॥ किंवा मर्कटासी सिंहासन । किंवा कागासी अमृतपान । किं वांझेसी वरमायपण । हें कदापि न घडे. ॥ ८८ ॥ तैसी अभक्ता आणि गुरुभक्ति । हें न घडे गा! कल्पांतीं । अनंत जन्मांचीं पुण्यें फळती । तरिच प्राप्ति गुरुभजन. ॥ ८९ ॥ मूर्खासी गुरुभजन । हें सर्वथा न घडे जाण । हें जन्ममरणाचें अधिष्ठान । संचितसाधन पापाचें. ॥ ९० ॥ जे जीवित्वें दास होती । तेचि पावती गुरुभक्ति । निजसुखातें भोगिती । इतरां भ्रांति जडमूढां. ॥ ९१ ॥ श्रोतीं न मानावा खेद । आपल्यापणें केला बोध । भावें भजावा आनंदकंद । मोक्षाचें पद पावावया. ॥ ९२ ॥ सुख

१. सर्व इंद्रियांनीं युक्त. २. हक. ३. दिवाभीताला, घुबडाला. ४. सूर्य. ५. डुक्कर. ६. शय्या. ७. पुष्पांची. ८. कावळ्यास.

न धरावें प्रपंचाचें । संचित होतसे पापाचें । भरतें दाटलें भवसिंधूचें । जन्ममरणाचें भय थोर. ॥ ९३ ॥ प्रपंचीं जरि सुख जोडे । तरि कां सेविती गिरिकडे[1]? । राज्यें टाकोनि गेले थोडे । ते काय वेडे म्हणावे? ॥ ९४ ॥ भर्तृहरीनें[2] राज्य टाकिलें । तेणें श्रीगोरक्षास पुसिलें, । राज्य टाकुनि मुंडी[3] जाले । कितीएक गेले भूपति. ॥९५॥ मग श्रीगोरक्षनाथ बोलती । नव्याण्णव कोडी[4] भूपति । इतरा जणाची नाहीं मिती । योगाप्रती निघाले. ॥ ९६ ॥ भवसिंधूचिया डोहीं । विषयाचा गळ घातला पाहीं । काळ लक्षितां हे दिशा दाही । जीव सर्वेहि भक्षितो. ॥ ९७ ॥ जो सद्गुरूस शरण जाये । तयातें काळ करिल काय? । तो काळाचाहि काळ होये । ऐसें बोलताहे वेदांत. ॥ ९८ ॥ न लगे योगयागसाधन । व्रतें तपें अनुष्ठान । न लगे वैराग्य तप दान । सद्गुरुभजन करावें. ॥ ९९ ॥ हें कर्म केलिया पाहे । राज्य किं स्वर्ग प्राप्त होये । राज्याअंतीं नर्क आहे । ऐसें बोलतां हे वेदान्त. ॥ १०० ॥ स्वर्गी काय सांगूं सुख? । पुण्य सरलिया लोटती देख । मागुती पहावया मृत्युलोक । स्वर्गनर्क भोगावया. ॥ १०१ ॥ नर्क म्हणजे गर्भवास । नर्की पचावें नवमास । नाना दुःखें होती जीवास । याहून विशेष दुःख काय? ॥ १०२ ॥ जेणें मृत्यूचें मूळ तुटे । किं जन्ममरणाचें खत[5] फाटे । पापपुण्याची वाढी खुंटे । धरणें उठे काळाचें. ॥ १०३ ॥ ऐसें व्हावया एक उपावो । भावें भजावा सद्गुरुरावो । तो जन्ममरणाचा पुसी ठावो । स्वरूपीं जीव मेळवी. ॥ १०४ ॥ एथूनि नाहीं जीव नेला । आणि स्वरूपीं नाहीं मेळविला । जेथिंचा तेथें भेटविला । उगव दाविला जीवासी. ॥ १०५ ॥ जीव आपुला उगव पाहे । इंद्रियांसहित लीन होये । तेथें काळ करील काये? । जन्ममरणापाय खुंटला. ॥ १०६ ॥ जैसें भूपतीचिया बाळें । अनिवार अन्याय केले । तें मातेपासीं जाऊनि बैसलें । मग काय चाले कवणाचें? ॥ १०७ ॥ तैसा जीव स्वरूपींच असे । नाना कर्मं केलीं बहुवसें । तो स्वरूपीं जालिया समरसें[6] । तेथें काळासि रीघ कैंचा? ॥ १०८ ॥ स्वरूप अखंडदंडायमान । सर्वांठायीं परिपूर्ण । तेथें जीवासि कैंचें जीवपण? । समरसोनि एक जालें.

---

१. पर्वताचे कडे. २. हा उज्जयिनी नगरीचा राजा. यास जवळ जवळ१९००वर्षे झालीं असें कै० तेलंगांचें मत आहे. यानें पाणिनीच्या व्याकरणावर लक्षकारिकारूप व्याख्या लिहिली. शृंगार, नीति, आणि वैराग्य ह्या शतकत्रयाचा कर्ताही हाच. याची राणी पिंगला मरण पावली असतां हा भ्रमिष्ट होऊन अरण्यांत हिंडूं लागला. तेव्हां गोरक्षनाथानें यास शुद्धीवर आणून समजूत घातली. त्यामुळें राज्य सोडून योगवृत्तीनें समाधानपूर्वक भूमिसंचार करण्याकरितां यानें गमन केलें. ३. मुंडण केलेले. ४. कोटी. ५. लिहिलेला कागद. ६. एकरूपानें.

॥ १०९ ॥ जैसें सागरींहून लवण । जळापासोन निर्माण । सगुणत्वें जा कठिण । म्हणोनि भिन्नत्वपण न घडे त्यासी. ॥ ११० ॥ तेंचि जळामाजं घालितां । जळचि होये तत्वता । तें परतोन येईल हाता । हें सर्वथा न घडे ॥ १११ ॥ यालागीं सद्गुरूचें भजन । सर्वांहून वरिष्ठ जाण । अवतारादि[1] आपण । सद्गुरूस शरण रिघाले. ॥ ११२ ॥ रामनाम स्मरतां घोष । तें तुटती भवपाश । तोहि शरण श्रीवशिष्ठास । गुरुभक्तीस सादर. ॥११३॥ पूर्ण ब्रह्म श्रीकृष्णनाथ । तोहि म्हणवी गुरुभक्त । दुर्वास[2] याची सेवा करित । नित्य मुक्त यालागीं. ॥ ११४ ॥ मुक्तपद आलें हाता । भय न धरी कर्में करितां भोग भोगुनि अभोक्ता । करूनि अलिप्तता यालागीं. ॥ ११५ ॥ ब्रह्मपदाच अधिकारी । म्हणवूनि विश्वातें उद्धरी । स्मरणमात्रें दुरितें हरी । तो श्रीहरि गुरुभक्त. ॥ ११६ ॥ जैसी कासवीची उत्पत्ति । गर्भांध जाली संतति ते चक्षुविणें वाढती । हें कल्पांतीं घडेना. ॥ ११७ ॥ तैसें गुरुकृपेवीण पावले मोक्षाचें सदन । भूतभविष्यवर्तमान । ऐकिलें नाहीं जाण कोठें? ॥११८॥ नामया[3] शरण भगवंतासी । भगवंतहि प्रत्यक्ष त्यासी । हरि शिकवी त्यासी । गुरुविणें सुखासि न पाविजे. ॥ ११९ ॥ तेणें मानोनियां वचन । रिघाला सद्गुरूसी शरण । रूप पहावया निर्गुण । पंढरिनाथाचें. ॥ १२० ॥ तेणें खेचर[3] विसो केला गुरु । तेव्हां जाला साक्षात्कारु । तेणें केला ब्रह्मपरु । निजसुखाचें घर पावला. ॥ १२१ ॥ एवं सद्गुरूच्या भजनेंविण । न तुटे जीवाचें बंधन । सज्ञानी जे भाविकजन । तयांसी हें वचन मानेल. ॥१२२॥ जे या वचनातें मानिती । भावें सद्गुरूतें वंदिती । तयांचे घरीं चारी मुक्ती ।

---

१. रामकृष्णादि अवतारी पुरुष. २. कृष्णाचा गुरु सांदीपनी होता. दुर्वासाला केव्हां गुरु केला होता? ३. एकदा सर्व संतमंडळी पंढरीस जमली असतां निवृत्तिनाथांनीं गोऱ्या कुंभारास असें म्हटलें कीं, 'काका! आपल्यास कच्च्या पक्क्या मडक्याची परीक्षा असेलच. तेव्हां एथील कचीं मडकीं कोणतीं हें आम्हांस सांगा.' त्यावरून गोऱ्या कुंभारानें आपलें थापटणें एकदोन असामींच्या डोकीवर मारलेंसें करून चटकन् तें नामदेवाच्या डोक्यावर हाटलें. तेव्हां नामदेव ओरडून 'काका! हें काय शहाणपण?' असें बोलला. त्याबरोबर 'हें मडकें कच्चें हो! कच्चें!' असें त्यानें म्हणतांच सर्व मंडळी खदखदां हसूं लागली. नामदेवास तो अपमान सहन न होऊन तो श्रीविठ्ठलासमोर रडूं लागला; तेव्हां देवांनीं त्याची अशी समजूत केली कीं, 'मी जरी तुझ्याशीं बोललों, खेळलों, तरी माझें स्वरूप अगदीं निराळें आहे आणि तें तुला गुरु केल्याशिवाय कळावयाचें नाहीं.' तेव्हां नामदेवानें विसोबा खेचरास आपला गुरु केलें—अशी कथा आहे.

दास्य करिती अनायासें. ॥ १२३ ॥ बहुत बोलोनियां काय। ज्याचे पदरीं पुण्य होय। तोचि सद्गुरूसी शरण जाय। मुक्ति लाहे येचि देहीं. ॥ १२४ ॥ याचि देहीं याचि डोळां। भोगी मुक्तिसोहळा। ऐसा एक कोणी विरळा। (जाणे) जिव्हाळा स्वरूपाचा. ॥ १२५ ॥ ज्यातें देखिजे दृष्टी। मुक्ती लाहिजे उठाउठी। भोगी स्वर्गसुखाचिया कोटी। आनंद सृष्टीं न समाये. ॥ १२६ ॥ तो म्यां देखिला जनार्दन। देखतांचि गेला भवभ्रमगुण। सुख जालें अनुपम्यगहन। पावला सदन मोक्षाचें ॥ १२७ ॥ मस्तकीं लागतां तयाचा करू। न मोडितां सृष्टीचा संहारु। सर्व जालें शून्याकारू। तेजें अंबर दाटलें. ॥ १२८ ॥ तया तेजाचा पारु। नेणति ब्रह्मा हरि हरु। वेदें राहिला मौन्याकारु। श्रुती विचारु पडिला असे. ॥ १२९ ॥ तयातें काय वर्णावें। कवणातें उपमे आणावें। तयावीण दुजें देखावें। तरि सांगावें साक्षित्वें. ॥ १३० ॥ जो निर्गुण निर्विकारु। निरुपम निराधारु। परब्रह्म परात्परु। विश्वंभरु अव्यक्त ॥ १३१ ॥ अखंड तेज सदोदित। उत्पत्ति प्रळयाविरहित। व्यापूनि सर्वांसि अलिप्त। तयावीण रिता ठाव नाहीं.॥१३२॥ जे कां वस्तु परात्पर। जे सगुण निर्गुणाचें उदर। ज्याचा वेदासि न कळे पार। तीचा विचार खुंटला तेथें. ॥ १३३ ॥ मनें जयातें देखिजे। तयातें शब्दें वर्णिजे। जें मना मनपणें मुकिजे। तें शब्दें बोलिजे कैशापरी. ॥ १३४ ॥ मन सकळांतें चाळितें। तेथें ठाव नाहीं मनातें। यावरि कैंचें इंद्रियातें। देखतां स्वरूपातें लय पावती. (?) ॥ १३५ ॥ जरि म्हणाल स्वरूप निराकार। तरि कोठूनि जाला विस्तार। याहि शब्दाचा विचार। श्रोतीं सादरु परिसावा. ॥ १३६ ॥ जरि उपसाहित्य सांगावें। तरि साहित्य काय द्यावें। त्याच्या संमता दुजें पहावें। तरि बोलावें साहित्य. ॥ १३७ ॥ परि बोलितों अल्पमती। भावें परिसिजे सज्जन श्रोतीं। रविकिरणापुढें काडवाती। तैसी मति बोलतों ॥ १३८ ॥ जैसें पाहतां वटबीजासी। सूक्ष्मत्वें नये दृष्टीसी। निराकार असतां तयासी। तेथें द्रुमासि ठाव कैंचा? ॥ १३९ ॥ बीजामाजी असतां अंकुरु। बीजीं होतां बीजाकारु। तो सूक्ष्मत्वें निघाला बाहेरु। मग अपार वाढला. ॥ १४० ॥ त्वचा काष्ठ फळें पत्रें। बीजीं होतीं बीजाकारें। तोचि महावृक्ष विस्तारें। मग

१. मिळवितो. २. 'याचि देहीं याचि डोळां। पाहे मुक्तीचा सोहळा ॥' (तुकाराम.) ३. ओलावा. 'जाणे भक्तीचा जिव्हाळा। तोचि दैवाचा पुतळा ॥' (तुकाराम). ४. करितां (?) ५. श्रुति आणि वेद एकच आहेत.

पसरे स्वइच्छा. ॥ १४१ ॥ नाहीं म्हणतां विस्तारला । आहे म्हणतां नाहीं देखिला । बीजामाजी होतां संचरला । तो विस्तारला सगुणत्वें. ॥ १४२ ॥ तैसें निर्गुणस्वरूपामाझारी । अनंत ब्रह्मांडाची भराभरी । स्वरूपाकार असे अंतरीं । तेंवि बाहेर निघाला. ॥ १४३ ॥ बीजें व्यापिलें वृक्षासी । तैसें निर्गुणें व्यापिलें सगुणासी । शब्दें आणिलें भिन्नपणासी । जैसें कनकासि अलंकार-नाम: ॥ १४४ ॥ मायास्वरूपीं तदंश होती । ते इच्छेगुणें आणिली व्यक्ति । सर्वगुणातें जाली प्रसवती । करी मूर्ति त्रिगुणाची. ॥ १४५ ॥ करी नाना रचना ते । परी भिन्नत्व नाहीं स्वरूपातें । स्वरूपें व्यापिलें सर्वांतें । जैसें अलंकारातें सुवर्णें. ॥ १४६ ॥ तैसा स्वरूपाचा विस्तारु । होऊनि उरला अपारु । तयाचा नेणवे पारु । ब्रह्मादि हरि हर वेडावले. ॥ १४७ ॥ यांतें मौन्येंचि पाहिजे । रसनेंविण गोडी घेईजे । भोगेंविण सुख भोगिजे । गुरुखुणें. ॥ १४८ ॥ आतां बोलणें खुंटलें । शब्दचातुर्य राहिलें । दृष्टीचें देखणें उरलें । तेंहि निमालें शेवटीं. ॥ १४९ ॥ जे सद्गुरूचे निजदास । ते पावती ये खुणेस । परिसतां नावडे येरास । जेंवि पक्षिया नारेळ. ॥ १५० ॥ सकळांस साष्टांग नमन । तुम्हीं जावें सद्गुरूसि शरण । चुकवावें देहाचें जन्ममरण । पावावें सुख मोक्षाचें. ॥ १५१ ॥ सद्गुरुमंत्र उपदेश तत्वता । मोक्ष तात्काळ पावे त्वरिता । ऐसें असे यथार्थता । सद्गुरूसि मानितां सत्यत्वें. ॥ १५२ ॥ मन असतां आनंदाभीतरी । तेथें उठति सुखाचिया लहरी । म्हणोनि वदली वैखरी । प्रेमानंदलहरी म्हणिजे इयेतें. ॥ १५३ ॥ एका जनार्दनीं एकनाथ । म्हणतां विश्वंभरित । तो होऊनि कृपावंत । **आनंदलहरी** वदविली. ॥ १५४ ॥

---

## श्रीएकनाथकृत

### १६. अनुभवानंद.

(ओव्या.)

श्रीगुरु कृपासिंधु ! । स्वामी तूं अनाथबंधु ! । आतां कृपा करीं तूं स्वबोधु । म्हणोनि चरणां लागलों. ॥ १ ॥ इतर शिष्य प्रश्न करिती । 'ब्रह्म कैसें ?' म्हणोनि

---

१. येथें १४६ व्या ओवीच्या जागीं (अ) पोथीमध्यें पुढील दोन ओव्या आहेत:—'मंत्र उपदेशें तत्वता । मोक्ष तात्काळ पावे त्वरिता । ऐसें असे यथार्थता । करीं नाना रचना ते ॥ १४६ ॥ परि भिन्नत्व नाहीं स्वरूपातें । स्वरूपें व्यापिलें सर्वांतें । जैसा तंतु सर्व पटातें । जैसे अलंकार तें सुवर्ण ॥ १४७ ॥.' २. आत्मस्वरूपाला. ३. यालाच 'आनंदानुभव' असें दुसरें नांव आहे. हा ग्रंथ आनंदलहरीपेक्षां फारच सरस असून एकनाथानें पूर्ण अनुभव प्राप्त झाल्यावर लिहिला

पुसती । तरी माझें पुसणें नव्हे आनंदमूर्ती । मी काय तैसें पुसों ? ॥ २ ॥ माझें पुसणें ऐसें असे । माझें ब्रह्माहूनि काय खोळंबलें असे ? । 'मी कोण ?' हें जाणत नसें । तें जाणवा आधीं मज. ॥ ३ ॥ तुम्ही ब्रह्म दावाल कृपेनें । परि तें देखावें कवणें ? । म्यां देखावें तरि आपणातें नेणें । मी कोण म्हणोनियां. ॥ ४ ॥ मी जीव[1] कीं शिव[2] कीं उभय । माझी मी हे नेणें सोय। म्हणोनि मज दाखवा निश्चय । मी कोण असें. ॥ ५ ॥ म्हणोनि मजला आधीं जाणवा । मज मी पडलिया ठावा । मीच मी देखणा जरि अवघा[3] । मग ब्रह्म पुसणें कायसें. ॥ ६ ॥ पुसणें तरी मी कोण कोणाचा ? । कोठोनि आलों ? कोठें जायाचा ? । निश्चय बरवा हो त्याचा । कृपा करोनि सांगा स्वामिया! ॥ ७ ॥ तंव श्रीगुरु म्हणती भला भला । तुवां बरवा प्रश्न केला । ऐसा नाहीं देखिला । प्रश्न करिता कोणी. ॥ ८ ॥ 'ब्रह्म काय ?' ऐसाचि प्रश्न करिती । नाना मतें धुंडाळिती । परि 'मी कोण ?' हें न पुसती । आपुला शोध.॥९॥ एऱ्हवी तरि जन बोलति बोलणें। आपशुद्धि नेणोनि परशुद्धि काय जाणे ? ।तेंवि आत्मशुद्धि नेणोन ब्रह्म पुसणें। तें पुसणें न घडेचि. ॥ १० ॥ म्हणोनि तूं पुसिला बरवा प्रश्न। जे 'मी कोण ?' म्हणोन । तरि तूं स्वयं चैतन्य घन । परि जीवत्व भाविसी. ॥ ११ ॥ भावना जे भाविजे । ज्या भावने असिजे । ज्याची भावने देह पडिजे । तरि तेचि होइजे देहांतीं. ॥ १२ ॥ जरि जीवत्वेंचि देह पडे । तरी तेंचि देहांतीं घडे । ब्रह्मभावनें देह पडे । तरी ब्रह्मचि होऊनि ठाके. ॥ १३ ॥ 'यद्भावना तद्भविष्यति' । ऐसें श्रुति स्मृति बोलती । अंतकाळीं भावना उरे तेचि होती । यदर्थीं गीताप्रमाण. ॥ १४ ॥

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥**

अंतकाळीं येकवटुनि अंतःकरण । जो देह टाकी धरुनि माझें स्मरण । तो मद्भावें होय मीच आपण, । यदर्थीं संशयो नाहीं. ॥ १५ ॥ ज्याच भावनें देह टाकी । अंतीं तेंचि होणें न चुके कीं । ब्रह्मभावने देह टाकी । तरि सुखें

---

असावा. याची एक प्रत (अ) रा० रा० उमाकांत सदाशिव देशमुख बी. ए. बी. एल्. उमरावती, यांनीं आम्हांस दिली. त्याबद्दल आम्हीं त्यांचे फार आभारी आहों. दुसरी (ब) ही पोथी ह्या पूर्वींच्या काव्यसंग्रहकारांकडे कोणांकडून आली हें समजण्यास मार्ग नाहीं. ४. आत्मबोध.

१. अज्ञानरूपी उपाधीनें युक्त जें ब्रह्म तो जीव. २. मायारूपी उपाधीनें युक्त जें ब्रह्म तो शिव. ३. अवघा, सर्व.

ब्रह्मचि होये. ॥ १६ ॥ अंतीं ज्या भावनें देह सांडिजे । देहांतीं तेचि होइजे । जडभरतें काय न होइजे । मृगध्यासें मृगचि? ॥ १७ ॥ तैंवि मी जीव या भावने होय । देह सोडी तो जीवचि होय । जो देह सोडी ब्रह्मभावनीये । तो ब्रह्मचि होये पार्था! ॥ १८ ॥ ऐसें गीतेमाजि बोलिलें श्रीहरी । यासि संशयो न करी । जो ध्यास असे अंतरीं । तें होणें न चुके अंतीं. ॥ १९ ॥ म्हणोनि मी सोऽहं ब्रह्म । येच भावनेचा मानिसी नेम । अखंड भावी मी पुरुषोत्तम । क्षराक्षराचा[१] साक्षी जो. ॥ २० ॥ मी सोऽहं ब्रह्म निःशेष । हाचि अखंड जयासी ध्यास । तेणें ध्यासें देह सोडी सावकाश । तरि ब्रह्मचि होये. ॥ २१ ॥ नातरि जीव मी हा ध्यास । अखंड असे जयास । त्याच ध्यासें सोडी देहास । तरी तो जीवचि होय पुन्हा. ॥ २२ ॥ म्हणोनि ब्रह्मभावना अखंड असिजे । जीव भावना सांडिजे । ब्रह्मभावने देह सांडिजे । तरि तेंच होय. ॥ २३ ॥ ज्या भावने देह पडे । तेचि अंतीं होणें घडे । जडभरतासी रोकडें । मृग होणें घडलें ॥ २४ ॥ म्हणोनियां सोऽहं ब्रह्म । हें जाणोनि गुरुमुखें वर्म । तेणें ध्यासें देह पडे नेम । तरि ब्रह्म होऊनि ठाके. ॥ २५ ॥ नाना विद्या साधिलिया सिद्धि । अंतकाळीं स्वरूपीं न बैसे बुद्धि । तरी व्यर्थचि गेली त्याची सिद्धि । जे जे केली ते ते. ॥ २६ ॥

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥**

जगज्जीवन म्हणे अर्जुनासी । सर्वकाळीं ध्यास अहर्निशी । नाना रूपें जरि देखसी । तरी मीच मानीं. ॥ २७ ॥ कानीं जें जें ऐकिसी । तें सर्व मीच मानीं निश्चयेंसी । मनीं जें जें भाविसी । अभेद भावने. ॥ २८ ॥ मन बुद्धीस हाचि ध्यास । अखंड माझाचि सावकाश । माझ्या नामध्यासें सोडिजे देहास । तरि मीच होये. ॥ २९ ॥ ऐसें कृष्ण सांगे अर्जुनासी । ज्या ध्यासें सोडि देहासी । तेचि होणें निश्चयेंसी । न चुके सर्वथा. ॥ ३० ॥ म्हणोनि ब्रह्मध्यासें देह सांडिती । ते देहांतीं ब्रह्मचि होती । ऐसी निजभक्ताची गती । अंतीं ब्रह्म होती ब्रह्मध्यासें. ॥ ३१ ॥ एथें आणिक एक गुह्य असे । तें सांगू नये कोणास । कोण येईल सनकादिकास । उदास काय बोलती (?) ॥ ३२ ॥ परि त्याचा कोप साहिजेल । परोपकारार्थ सांगिजेल । अन्याय जाला म्हणोनि होइल । शरणागत. ॥ ३३ ॥ सद्गुरु जरि लाहे । तरी देह असतांचि ब्रह्म होये । देहांतीं

---

१. नाशवंत आणि शाश्वत यांचा.

ब्रह्म होणें कांये । उरलें असे. ॥ ३४ ॥ जो देह असतां ब्रह्म जाला । तो देहांतीं स्मरेल कोणाला? । जया स्मरावें तोचि होउनि ठेला । निश्चयेंसी. ॥ ३५ ॥ देह पडलिया स्वरूपीं मिळाला । तरी संत हांसती तया बोला । आधीं काये [1]वियोग होतां त्याला । मिळाला म्हणिजे अंतीं. ॥ ३६ ॥ घट भंगलिया घटाकाशीं । मग मिळणें होय चिदाकाशीं । तरी आधींच असे अखंडतेसी । हे विचारी पां. ॥ ३७ ॥ तेंवि देह पडिलिया आत्मयासी । मग मिळणें घडे त्यासी । कीं आधींच आहे स्वरूपासी । अखंडता. ॥ ३८ ॥ अखंड स्वरूपीं संलग्न असे । ऐसें जया गुरुकृपें भासे । तया देहांतीं मिळणें नसे । आधींच असे स्वस्वरूपीं. ॥ ३९ ॥ स्वरूपीं असे म्हणणें न साहे । तें स्वरूपचि अखंड आहे । तरी जाणावया म्हणिजेत असे । स्वरूपीं असिजे ऐसें. ॥ ४० ॥ असिजे नसिजे हें कांहीं । स्वरूपात्मया वियोग नाहीं । सागरांत तरंग वियोग असे [2]काई । मा तरंग सागरीं मेळविजे. ॥ ४१ ॥ ऐसा भासे कीं स्वरूपीं सागर मी तरंग । तरी मज स्वरूपा कैंचा वियोग ? । सागर माझें सर्वांग । अथवा सागरच मी. ॥ ४२ ॥ अहं ब्रह्म ऐसी स्फूर्ति । स्फुरे हेचि जयाप्रति । अखंडित बाणे ब्रह्म स्थिति । स्वरूपत्वेंचि असे. ॥ ४३ ॥ स्वरूपभावने देह पडे । तरी काय जाईल [3]आणिकीकडे । तया अंतकाळीं स्मरावें न लगे रोकडे । स्मरावें जया तोचि तो. ॥ ४४ ॥ तोचि तो अघवा असे । तया अंतीं स्मरण कायसें ? । जे व्हावे ते आधींच असे । [4]देहेंनसी ब्रह्म. ॥ ४५ ॥ देहेनसी ब्रह्म होणें । ते निर्गुण सायुज्यता म्हणणें । हे पांचवी मुक्ति जाणणें । वेदांतशास्त्रीं. ॥ ४६ ॥ क्षीरसागरीं तरंग दिसे । तो सबाह्य क्षीरचि असे । भंगता न भंगे निजांशें । सागरचि असे आपण. ॥ ४७ ॥ तेंवि ब्रह्म तो क्षीरसागर अभंग । देह तेथिंचा तरंग । तरंगास बाह्य सागराचेंचि आंग । स्वयं ब्रह्मसागरचि तो. ॥ ४८ ॥ आतां देह तेथिल तरंग । फुटत फुटत ब्रह्मचि असे अभंग । तो देहेनसी ब्रह्मचि असे चांग । तेचि निर्गुण सायुज्यता. ॥४९॥ ते तुवां पुसिलें, 'मी कोण ?। कोठोनि आलों ? कोठें जाईन ? । मी जीव कीं शिव ?' हे प्रश्न । पुसिले होते तुवां. ॥५०॥ जरी संकल्प विकल्प सांडसी । तरी तूंचि ब्रह्म असती । संकल्पें आणिलें होतें जीवदशेसी । संकल्प लोपलिया तूंचि परब्रह्म. ॥ ५१ ॥ वायूसंगें सागर । जाला दिसे तरंगाकार । वायू लोपलिया निरंतर सागर । जैसा तैसाचि असे. ॥ ५२ ॥

---

१. 'महदाकाशीं' असा पाठ असेल तर बरा. घटाकाश हा नेहमींच महदाकाशाचा भाग असतो. पुढें ओवी ५६ पहा. २. काय (प्रश्नार्थक). ३. दुसरीकडे. ४. देहानिशीं, देह असतांनाच.

संकल्प निमता जीवदशा जाये । मग स्वयें परब्रह्मचि आहे । तया मग येणें जाणें काये । उरलें असे? ॥ ५३ ॥ तयासि येणें जाणें नाहीं । घटभंगता घटाकाश काई । येणें जाणें असें पाहीं । विचारूनियां. ॥ ५४ ॥ तेंवि निर्विकल्प पुरुषा । येणें जाणें नाहीं सहसा । घट भंगता[1] घटाकाशा । येणें जाणें नसे. ॥ ५५ ॥ घटाकाश महदाकाशीं । काय वेगळीक आहे उभयांसी? । घट भंगता महदाकाशासीं । वेगळीक असेना. ॥ ५६ ॥ तेंवि देह पडता न पडता । आत्मा आत्मत्वेंचि असे तत्वता । तोचि सबाह्य व्यापकता । पूर्णपणें ॥ ५७ ॥ डोहामाजि कुंभ असे । तया सबाह्य जळचि असे । कुभ भंगतां न भंगतां सरसें । उदकचि आहे. ॥ ५८ ॥ घट भंगतां उदकीं उदक मिळालें । हेंहि बोलणें न साहे वहिलें । वेगळें होतें मा मिळालें । म्हणिजे तया. ॥ ५९ ॥ तेंवि देहकुंभ भंगलिया । मग आत्मा मिळे परमात्मया । पहिली वेगळीक होती काय तया । मा मिळाला म्हणिजे अंतीं. ॥ ६० ॥ तेंवि भूतें ब्रह्मचि असती । अंतर बाह्य ब्रह्मचि होती । परि ते आपणातें नेणती । भाविती जीवपण संकल्पें. ॥ ६१ ॥ ते बापुडे करतील काई? । सद्गुरु तया भेटला नाहीं । जो भेटला तयाची जीवदशा पाही । गेली नाहीं सर्वथा. ॥ ६२ ॥ गुरूची जीवदशा गेली नाहीं । जीवानें जीव उद्धरील काई? । जो स्वयंब्रह्म जाला असेल पाही । तो उद्धरील जीवातें. ॥ ६३ ॥ आंधळ्यानें आंधळे धरिले करीं । तरी दोघेही पडतील गारीं । तयां दोघां काढाया बाहेरी । तिसरा पैं पाहिजे. ॥ ६४ ॥ ते दोघेहि सद्गुरूसी । शरण जाती सद्भावेंसि । तरी दोघेही उद्धरती निश्चयेंसि । ना तरी जाती अधोगती. ॥ ६५ ॥ म्हणोनियां सद्गुरूसी । शरण जावें आदरेंसीं । तो तात्काळ करी शिष्यासी । परब्रह्म. ॥ ६६ ॥ तें परब्रह्म म्हणसी कैसें । तें सांगतां नयें ऐसें तैसें । सांगावें जरी हाच हा असे । तरी सांगणें घडे केंवि. ॥ ६७ ॥ हाचि तोचि ऐसें कांहीं । परब्रह्मीं नलगे पाहीं । पाहाणें न पाहणें दोन्ही नाहीं । तेंचि पाहे पाहण्याविण. ॥ ६८ ॥ पाहिलें तें ब्रह्म नव्हे । पाहतें ब्रह्मचि होईल काये? । हा विचार करूनि पाहे । पाहतें ब्रह्म कीं पाहिलें ब्रह्म. ॥ ६९ ॥ जरी पाहिलें ब्रह्म होय । तरी पाहतें आन होत आहे । पाहतें ब्रह्म होय । पाहिलें तेंचि. ॥ ७० ॥ दृश्याचा देखणा । तो हा द्रष्टा जाणा । हाही नामाभिधाना । दृष्टांतास्तव आला. ॥ ७१ ॥ दृश्याचा देखणा म्हणून द्रष्टा । ये[2]व्हवीं द्रष्टा ना अद्रष्टा । यदर्थीच्या चेष्टा । न चलती तेथें. ॥ ७२ ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी । वाचा बुडाल्या चारी । द्रष्टा महाद्रष्टा कोण अक्षरी । वाचा चारि निमालिया. ॥ ७३ ॥

१. नष्ट झाल्यावर. २. मग.

जेथें बावन अक्षरेंच नाहीं । तेथें द्रष्टा महाद्रष्टा उच्चार काई । हें अनिर्वाच्यचि पाही । वाचे केंवि बोलावें. ॥ ७४ ॥ परि वाचेवांचूनि कांहीं । अनिर्वाच्य न कळे पाहीं । बोलणेंविण कळेल काई । विचारिया. ॥ ७५ ॥ कर्में निषेधिती नेणोनि वर्म । कर्माविण पावेल केंवि परब्रह्म? । भक्तीविण पुरुषोत्तम । केंवि पाविजे? ॥ ७६ ॥ मार्गेविण नगरा केंवि जाइजे । नगरा गेल्या मार्ग राहे सहजें । पाक केलियाविण तृप्ति पाविजे । हें केंवि घडे? ॥ ७७ ॥ म्हणोनि कर्मेंविण ब्रह्म पाविजे । तें व्यर्थचि अनुमान बोलिजे । तृप्ति झालिया सहजें । पाक करणें ठेलें. ॥ ७८ ॥ हारपलें सांपडलियाविण । दीपक केंवि सांडिजे आपण । खणितां जोडलें जीवन । सहज खणणें राहे मग. ॥ ७९ ॥ तैसें कर्मेंचि ब्रह्म पाविजे । मग कर्में राहति सहजें । हें दृष्टांता आलें [1]वोजें । परि हें तैसें नव्हे. ॥ ८० ॥ ठेविलें सांपडलिया दीप ठेविजे । हा दृष्टांत बोलिला वोजें । परि न घडे न बोलिजे । तें तूं ऐक. ॥ ८१ ॥ कर्में ब्रह्म पाविजे । मग कर्मातें त्यागिजे । हें बोलणें न साजे । श्रुतीसि विरुद्ध दिसतसे. ॥ ८२ ॥ ज्या कर्में ब्रह्म पाविजे । तें कर्म न सांडिजे । लोकसंग्रहाकारणें कीजे । आज्ञा प्रभूची. ॥ ८३ ॥ भक्तिज्ञान वैराग्याविण । न पाविजे ब्रह्मपूर्ण । ऐसें वेदशास्त्र प्रमाण । सांगती प्रसिद्ध. ॥ ८४ ॥ म्हणोनि देहीं जंव असिजे । तंव कर्म सहज न सांडिजे । संतीं उदास होऊनी जरी सांडिजे । तरी केंवि वर्तावें? ॥ ८५ ॥ श्रेष्ठ जैसें आचरती । इतर जन तैसेंचि वर्तती । श्रेष्ठ जन न आचरीती । इतर जन भांबावती हें काय भलें? ॥ ८६ ॥ म्हणोनि संतीं कर्म भक्ती कीजे । न चाले त्या भक्ती लाविजे । परोपकारास्तव दाविजे । आचरोनियां. ॥ ८७ ॥ आतां असोत ह्या गोष्टी । तुवांहि वर्तावें येचि परिपाठीं । नातरि निर्वाण योगनिष्ठीं । निष्ठा धरोनि राहिजे. ॥ ८८ ॥ जो अंतर्निष्ठ राहे । अंतरीं तन्मय होये । तयासीच कर्म राहे । येऱ्हवि कर्म भक्ति न सांडिजे. ॥ ८९ ॥ जो जडभारताचे वृत्ती राहे । तया कर्म करावें काये । इंद्रियांचे कर्तव्यावरि जो न ये । तयासीच राहे कर्म. ॥ ९० ॥ जो [2]अंतरवोवरीं पहुडला । मन उन्मन होऊनि ठेला । तोचि कर्मासि आंचवला । आत्मनिष्ठ म्हणोनियां. ॥ ९१ ॥ परी कर्म न सांडिजे । देहें पडे तों आचरिजे । नाचरे त्या भक्ति लाविजे । त्या पुण्यास पार नाहीं. ॥ ९२ ॥ आपणां देखतां बुडते । सवेग उडी घालोनि त्यातें । काहाडिजे पार नाहीं पुण्यातें । आत्मघात चुकला म्हणोनियां. ॥ ९३ ॥ आतां असो हें जे परोपकारी । आपण तरोनि जडजीवा

---

१. उत्तम रीतीनें. २. हृदयरूप ओवरींत.

तारी। धन्य तो एक संसारीं । पुरुषार्थी जाणावा. ॥ ९४ ॥ जड उन्मत्त पिशाच जाले । त्याणीं आपणासींच तारिलें । आपलेंचि पोट भरिलें। परोपकार न घडेचि. ॥ ९५ ॥ 'ज्ञानीच भरतर्षभ' ।•ऐसा बोलिला पद्मनाभ । ज्ञानी जो आत्मा माझा स्वयंभ । सप्तमाध्यायीं बोलिले. ॥ ९६ ॥ आपण तरोनि अन्यासी तारित । म्हणोनि ज्ञानी आत्मा म्हणत । स्वमुखें भगवंत । बोले तोषोनियां. ॥ ९७ ॥ निर्विकल्पसमाधि[1] गुणयोगी। संप्रज्ञात[2] समाधी कर्मयोगी । जो कर्म आचरे सर्वांगीं । परी अकर्ता तो. ॥ ९८ ॥ निर्विकल्प समाधी म्हणसी कैसी । कांहीं कल्पना नाहीं जयासि । निस्तरंग सागराचिया ऐसी । स्थिति जयाचि. ॥ ९९ ॥ अंतरवोवरीं पहुडला । सहजचि इंद्रियव्यापार खुंटला । मग शुभाशुभ नाहीं त्याला । निर्विकल्प म्हणोनि. ॥ १०० ॥ तया देहावरी येणें नाहीं । मग देहभावनें आतळेल काई । देह पडलिया स्वयेंचि नाहीं । नसे कांहीं आठवण. ॥ १०१ ॥ ठाव नाहीं मन बुद्धिसी । मग आठव नाठव कैंचा तयासी ! । तो निर्विकल्प समाधिसी । रत झाला. ॥ १०२ ॥ अंतरीं कांहीं कल्पावें । कीं इंद्रियद्वारीं वर्तावें । केलें कर्तृत्व अघवें । नाहीं निर्विकल्प योगियासी. ॥ १०३ ॥ जाली जरी वर्तणूक । तरी परापेक्षा[3] वर्तणें देख । नातरि एकांतीं निर्विकल्प सुख । अखंड भोगिजे. ॥ १०४ ॥ निर्विकल्प समाधि पुरुष । आतां संप्रज्ञात समाधि परिस । जे अष्टहि प्रहर सावकाश । मोकळे इंद्रियांचे. ॥ १०५ ॥ तो इंद्रिय नाम नेणें । अघवी स्फूर्ति आपुलीच जाणे । सागराचे तरंग मानणें । सागरचि तो. ॥ १०६ ॥ तरी या इंद्रियांच्या लहरी । त्या तळपति तयाच वरि । विषय इंद्रिय हाचि जरी । वर्ततां बाधा काई ? ॥ १०७ ॥ हाचि हा अघवा जरी । तेथे मन बुद्धिसी कैंची उरी । नसतां उरी मग कोण कोणा मारी । अद्वयानंदीं बापा ! ॥ १०८ ॥ काय अग्नीचि अग्नीतें जाळी । कीं सूर्य सूर्यातें पोळी । कीं तेज तेजातें जाळी । कीं पाणी बुडवी पाणियातें. ॥ १०९ ॥ तेंवि हा अवघा असतां । आपणा करी बद्धता । आपण या द्वंद्वा लाविता । देखिला असे कोठें हें. ॥ ११० ॥ जरी अद्वयानंदज्ञान । जालें पाहिजे दृढीकरण । तयासि विषय इंद्रिय पूर्ण । ब्रह्म वें भासत. ॥ १११ ॥ तो जें जें करि तें तें ब्रह्म । हें नेणोनियां गुरुमुखें वर्म । जे करिती ब्रह्मचि म्हणोनि इंद्रिय कर्म । तरि बाधकता होये तयांसी. ॥ ११२ ॥ विद्या न जाणोनि आपण जीवें।

---

१. ज्यांत विकल्प किंवा वृत्ति नाहींशी होते तो निर्विकल्प समाधि. यांत कर्ता कर्म आणि क्रिया किंवा द्रष्टा, दृश्य आणि दर्शन या त्रिपुटीचा लय होतो. २. ज्यांत त्रिपुटीलय होत नाहीं पण एकच वृत्ती राहते तो संप्रज्ञात समाधि. ३. दुसऱ्या इच्छेप्रमाणें.

डोंब्या सर्प धरूं जाये । तो वांचे कीं जाये जीवें । विचारी पां. ॥ ११३ ॥ तेंवि अध्यात्मविद्या नसतां । ते संतस्थिती वर्तू जातां । तयांसि न चुके बद्धता । असांप्रदायी म्हणोनि. ॥ ११४ ॥ जीवदशा फिटली नसतां । तो पूर्णाची स्थिती वर्तू जाता । तयासि होय बद्धता । आत्मनिष्ठ नोहे म्हणूनि. ॥ ११५ ॥ आतां असो हे बहु झडती । तूं आत्मनिष्ठ ब्रह्मस्थिति । सोऽहं ब्रह्म मी हे स्मृति । असूं दे सदा. ॥ ११६ ॥ पूर्णब्रह्मज्ञानाची खूण । भावीं मी चैतन्यघन । हेचि निष्ठा असूं द्यावी पूर्ण । अहर्निशीं. ॥ ११७ ॥ मुळींचा मी परब्रह्म । ऐसें बिंबलें मुळींचें वर्म । तो न म्हणे मी जालों ब्रह्म । मुळींचाचि म्हणोनि ॥ ११८ ॥ असे म्हणतां नसेपण येतें । असे नसेविण आइतें । असे तेंचि निरुतें । अससी बापा ! ॥ ११९ ॥ तूं क्षराक्षराचा साक्ष । जीवशिवाचाहि साक्ष । तुज बंध ना मोक्ष । स्वतःसिद्धचि अससी. ॥ १२० ॥ तूं आत्म्याचाहि आत्मा । तूं उभयाचा जाण चिदात्मा । तूं परमात्म्याचाहि आत्मा । यालागीं बोलिलें. ॥ १२१ ॥ येऱ्हवीं आत्मा परात्मा बोलिजे । तरि दुसरा नसतां कोण म्हणिजे । जेथें दुसरा न साजे । तेथें आत्मा परमात्मा म्हणे कोण. ॥ १२२ ॥ म्हणोनि म्हणती अनाम अनिर्वाच्य । तेथें ॐकारासहित शब्दाची कचकच । राहिली विवेकाची खचखच । स्वतःसिद्ध कळलिया. ॥ १२३ ॥ दोर दोरपणें असे । दोर कांहीं सर्प जाला नसे । दोर सर्पत्वें भ्रांतासि भासे । आपभ्रांति करूनियां. ॥ १२४ ॥ तेंवि ब्रह्म ब्रह्मत्वेंचि असे । ब्रह्म कांहीं प्रपंच झालें नसे । ब्रह्म प्रपंचत्वें अज्ञानासी भासे । आपभ्रमीं जाणिजे. ॥ १२५ ॥ भूमींतूनि मडकीं निघती काये । ते कुंल्लाळमती होत आहे । तैसें ब्रह्म कांहीं करित नाहीं पाहे । करिता संकल्प येथें. ॥ १२६ ॥ पाहें पां वायोचा संयोग । सागरीं भरे तरंग । ते सागर करी कीं वायुयोग । होय विचारी पां. ॥ १२७ ॥ तेंवि ब्रह्म उगेंचि असे । संकल्पें प्रपंचाकार होत असे । संकल्प निमतां कांहींच नसे । ब्रह्म वेगळें. ॥ १२८ ॥ तूं म्हणसी ब्रह्मीं संकल्प नसे । तरी हा कोणापासाव होत असे । जो भावील तयासी दिसे । येऱ्हवीं नाहीं. ॥ १२९ ॥ सोनें तरि गेंठा तानवडे । बिजयाते न्यालेन्या(ले)चि आवडे । येऱ्हवीं भंगतां सोनें अखंड । भूषणाकार असे. ॥ १३० ॥ सोनें भूषणाचा दृष्टांत पाहें । सोनें तरि आंगें वि-

१. एक फार विषारी सर्प. २. साधूच्या स्थितीनें. ३. कुंभाराच्या इच्छेनें. ४. अलंकारविशेष. सोन्याचा गट? ५. बायकांच्या कानांत घालण्याचा दागिना, बाळी. ६. दुसऱ्यांना, निरनिराळ्या लोकांना. बीजा=दुसरा (गुजराथी); बिजयाते=दुसऱ्याला. ७. न्याला=न्यारा=चांगला, दुसरा.

स्तारिलें आहे । परि हें न विस्तारूनी विस्तारिलें आहे । अज्ञानवशें अज्ञासी. ॥ १३१ ॥ आपुलीच कल्पना । विविध रची स्वप्ना । तेणें करितां दिसे रचना । प्रबोधीं कांहींच नाहीं. ॥ १३२ ॥ तेंवि संकल्पें रचिलें दिसे । निर्विकल्पीं कांहींच नसे । रचे खचे संकल्पवशें । कल्पनानाशें दोन्ही नाहीं. ॥ १३३ ॥ आतां नसेल तरि नसो । त्याचा कायसा अतिसो । तुझें मन स्वरूपीं बैसो । अखंड तेंचि होऊनी. ॥ १३४ ॥ तेंचि अखंड होउनी राहें म्हणिजे । तें तें आधींच असती सहजें । परी नेणतपणाचें वाहसी वोझें । मी आपणातें नेणें म्हणसी. ॥ १३५ ॥ त्या नेणिवेतें तूं जाणसी । जाणतेंचि तूं होसी । आतां नेणीव वाहसी । व्यर्थचि तूं. ॥ १३६ ॥ नेणिवेसी कोण जाणे । त्या नेणिवेसी आत्माचि जाणे । तो तूं आत्मा जाणपणें । जाणिवेसी जाणसी. ॥ १३७ ॥ जाणीव नेणीव दोहींसी । तूंच जाणपणें जाणसी । जाणण्याचें जाणणें होसी । होण्याविण. ॥ १३८ ॥ होणें न होणें कांहीं । तुज उरलें नाहीं नाहीं । तूं स्वतःसिद्धचि पाहीं । आइताचि असती. ॥ १३९ ॥ ब्रह्म माया कांहीं । तुज-वांचोनि आन नाहीं । दोन्ही दैवतें तुजविण कांहीं । आन असती ? ॥ १४० ॥ सर्व सृष्टी चराचर । हा तुझाचि विस्तार । हाही भ्रम भासे साचार । निरसुनि पाहतां तूंचि तूं. ॥ १४१ ॥ डोंम्या[1] गोन्हाळ्या म्हणती । आपभ्रमें आपणचि नांव ठेविती । दीपें रज्जु पाहतां आपणचि म्हणती । सर्पभास लटिकाचि. ॥ १४२ ॥ पहा हो ! रज्जु रज्जुपणें असतां । म्यां भ्रमें सर्प मानिला होता । तो तरि ते रज्जुपणें आयिता । असतां भ्रांति केव्हडी. ॥ १४३ ॥ तेंवि ब्रह्म ब्रह्म-त्वेंचि असे । तेथें अपभ्रमें प्रपंचाकार भासे । तें तो गुरुकृपें. पाहतां कांहींच नसे । ब्रह्मचि असे स्वतःसिद्ध. ॥ १४४ ॥ पहा हो ! ब्रह्म ब्रह्मपणें असतां । तेथें म्यां जीव मानिला होता । तो गुरुकृपें भ्रम गेला आतां । स्वतःसि-द्धचि मी. ॥ १४५ ॥ ऐसें स्वतःसिद्धचि जाणे आपणासि । प्रपंच तोचि ब्रह्म भासे तयासि । सोन्याचें श्वान केलें तरि तयासि । कुतरें म्हणिजे काय ? ॥ १४६ ॥ तेंवि ब्रह्म प्रपंचाकार दिसे । परि तें प्रपंचाकार जालें नसे । तंतु पटाकार भासे । परि पट नव्हे तंतुचि. ॥ १४७ ॥ तूं म्हणसी पट प्रत्यक्ष दिसतो कैसा नाहीं । तरि पट काढोनि घेई तंतु आम्हास देई । तंतू काढितां, उरी[2] काई । पटासि उरे विचारी पां. ॥ १४८ ॥ पाहे या प्रत्यक्ष तरंग दिसे । परि तरंगरूपें पाणी दिसे । तरंग तो न गवसे । पाणीच कीं अवघें. ॥ १४९ ॥ तेंवि देहाकार

१. सर्पविशेष. २. शिलक.

ब्रह्म दिसे[१]। परि देह ब्रह्म जालें नसे। साकरेचें वृंदावन केलें असे। परि तें काय कडू जालें. ॥ १९० ॥ तेंवि ब्रह्म प्रपंचाकार भासे। परी प्रपंच ब्रह्म जालें नसे। प्रपंच म्हणणें सांडितां, असे। ब्रह्मचि आइतें. ॥ १९१ ॥ आतां किती वट वट वाचेची[२]। आयिता स्वतःसिद्ध तूंचि। गुढी उभारीं आनंदाची। मीच मी अवघा म्हणोनि. ॥ १९२ ॥ ऐसीच भावना भावी अखंडता। मीच मी स्वतःसिद्ध आयिता। नाना रूपें नाना नामें तत्वता। ते माझीच अवघी. ॥ १९३ ॥ मीच मी परब्रह्म। ऐसा असो देई नेम। मुळींचेंचि तें निःसीम। परी वर्म सांगतों तुज. ॥ १९४ ॥ आतां जीवपणा न भावीं। मीच ब्रह्म हे भावना भावी। मीतूंपणा जाणणें जें जाणवी। तें मीचि असे भावीं तूं. ॥ १९५ ॥ ऐसी ब्रह्मभावना दृढावली। बुद्धि ब्रह्मचि होऊनि ठेली। मग मी ब्रह्म हेही भावना राहिली। स्वतःसिद्ध असे म्हणोनि. ॥ १९६ ॥ मुळींचाच जो राजा असे। तया राजा म्हणणें कायसें? । म्हणतां कृत्रिम दिसतसे। म्हणोनि मी ब्रह्म म्हणणें ठेलें. ॥ १९७ ॥ गेठा म्हणे मी सोनें। म्हणतां येतसे उणें। आपण सोनें असतां म्हणणें। तें भुलीच जाणिजे. ॥ १९८ ॥ अहं ब्रह्म म्हणणें। तें म्हणती ज्ञान जाणणें। तें ज्ञानचि परि अज्ञानपणें। दिसतसे. ॥ १५९ ॥ ज्ञान तेंचि अज्ञान। अद्वयानंदीं कायसें जाणणें। द्वैत नसतां कोणासी कोण। जाणे तेथें. ॥ १६० ॥ जाणणें तें बोलिजे ज्ञान। आपणातें नेणणें तें अज्ञान। नेणणें म्हणिजे हाही शीण। तेथें जाणपण नेणपण कायसें. ॥ १६१ ॥ ज्ञानें उजळे ऐसा नाहीं। अज्ञानें मळे हें न घडे काई। तो स्वतःसिद्धचि पाहें। आयिताचि असे. ॥ १६२ ॥ दीपें सूर्य काय उजळे। आंधारें काय मळे। तो मळे ना उजळे। स्वतःसिद्धचि असे. ॥ १६३ ॥ सूर्य कधीं आंधारें वेष्टिला होता। मा दीप होय आंधार निवारिता। तो तरी स्वयंप्रकाश रूप असतां। दीप काय निवारी आंधारा. ॥ १६४ ॥ सूर्यास आंधारासी भेटी। कधीं तरि होय कल्पकोटी? । सूर्य अंधार देखिला नाहीं दृष्टी। तो वेष्टिला काई? ॥ १६५ ॥ तेंवि आत्मा वेष्टिला अज्ञानें। मा सोडविला ज्ञानें। आत्मा अज्ञाना भेटी होतां उणें। घडे काय तया. ॥ १६६ ॥ भेटी होतां तृणा अग्नी-सी। उरी नसे तृणासि। तेंवि आत्मया मिळणें अज्ञानासीं। उरी न उरे तया. ॥ १६७ ॥ मुळीं अज्ञानच नाहीं। ते आत्मा वेष्टिला काई। याची कल्पना तेचि पाहीं। अज्ञानरूप. ॥ १६८ ॥ ते कल्पना जैं मुरे। मग उरउरीत[३] जें

---

१. कडू वृंदावन नांवाचें फळ. २. (ब) नेणणें म्हणिजे तरी हाचि आपण. ३. उर्वरित, बाकी.

उरे । तें तूं होऊनि राहें बा रे! । अखंडित. ॥ १६९ ॥ अखंडित परब्रह्म। तें मी हा न विसरे नेम । तें विसरे तरी चुकलें वर्म । पुन्हा जीवदशा न जाये. ॥ १७० ॥ ज्याची जीवदशा न जाये । तो ब्रह्मत्व केंवि लाहे । मी सोऽहं ब्रह्म अद्वये । हाचि ध्यास असों दे. ॥ १७१ ॥ जें सच्चिदानंदघन । तेंचि मी असें आपण । येणें भावने दृष्टीकरून । तोचि जाण पूर्णब्रह्म. ॥ १७२ ॥ येणें-परि शिष्यराया! । लटिकी मानूनियां माया । मी साच परब्रह्म या । ध्यासा वि-सरूं नको. ॥ १७३ ॥ येऱ्हवी लटिकें तेंचि लटिकें । लटिकें तें साच होइ कें? । अथवा साच तरी लटिकें । होऊं शके काई? ॥ १७४ ॥ लटकियां साच सि-रेना । साच लटकियांत भरेना । दोहींची संगति घडेना । लटकियाचा भ्रम काइसा ॥१७५॥ साच आत्मा तोचि असे। लटकी माया ती कोठें नसे । नस-तियाचें भय कायसें । वाहासि व्यर्थ? ॥ १७६ ॥ त्या लटिकियासि जाणते[1] । लटिकें तरि साच ओळखतें। मा[2] गोष्टि भेटि होती दोहींतें। सुखदुःखाचिया १७७ हें साच लटिकें । या दोहींसी जाणतें निके । तैसें कीं म्हणसी लटिकें । तें दोहींहून वेगळें? ॥ १७८॥ साच जाणे तें साचवेगळें[3] । लटिकें जाणे तें लट-किया निराळें । उभयांसी जाणे तें केवळ । ज्ञप्तिमात्र तूं.॥ १७९ ॥ हें ज्ञान हें अज्ञान । दोहींचें जाणणें तें निजज्ञान । तेंचि मी स्वयें आपण । हाचि ध्यास असूं दे. ॥१८०॥ हाचि निश्चयो बिंबला पूर्ण । मग कोणाचें कोण करी ध्यान । ध्येय ध्याता हें बोळवण। त्रिपुटीसी जेथें. ॥१८१॥ ऐशा त्रिपुट्या[4] कोट्यानकोटी । सर्वांचा साक्षि तूं जगजेठी । साक्षीचे साक्षीतें अंतर्दृष्टि। तूंचि जाणता. ॥१८२॥ जाणता म्हणो तरी जाणपण नाहीं। नेणता म्हणो तरी नेणपण नाहीं । नेणण्या जाणण्या जाणतें पाही । तोचि तूं अससी. ॥ १८३ ॥ असणें आणि नसणें । उभय नसोनि तुजचि असणें । त्याही ज्ञान जाणे जें जाणणें । सांग तें बापा! ॥१८४॥ आतां तें म्हणणें कासयासि । जे असे नसे तें तूंचि अससि । गुंथागुंथी कास-यासि । बद्धमोक्षाचि. ॥ १८५ ॥ जो निरंजनवनीं निजला । तो कोणें सांग निजविला । पुन्हा जागृत कोणें केला । सांग बापा! ॥१८६॥ तैसा चेतो[5] चेत-विता हाचि । बोधा बोधविता हाचि । तेथें आन दुसरा नाहींचि । तूंचि तूं आ-इता ॥१८७॥ आतां तूंचि तूं होतासि । तरी भेद कैंचा कर्तृत्वासी । जें जें क-रिसी तें तूंचि अससी। अद्वयानंद पूर्ण. ॥१८८॥ आतां तुज जाणें नाहीं कोण्या

---

१. जाणणारें. २. मग. ३. साचाहून (खऱ्याहून) वेगळें. ४. ध्यान, ध्येय, ध्याता, दर्शन, दृश्य, द्रष्टा, इत्यादि. ५. चैतन्याला.

पदासी । भेटणें नाहीं कोण्या देवासी । देवाधिदेव तूंचि असती । सर्वव्यापक तूंचि तूं ॥१८९॥ व्यापक अव्यापकपण असतां पाहे। व्यापकपण केंवि साहे। आपणचि अघवा होये । व्याप्य व्यापकपण कैंचें. ॥१९०॥ हा कर्ता भोक्ता म्हणिजे। तरी हेंही बोलणें न साजे। कांहिं केलेंचि नाहीं मा भोगिजे। काय तेणें.॥१९१॥ भोक्ता भोग्य भोगपण । हे त्रिपुटी जेथें क्षीण । सर्व भोक्ता तयाविण कोण । परि भोक्ता ना अभोक्ता. ॥ १९२ ॥ जयाचा संकल्प गेला होय । तो भोगीत असतां भोक्ता नव्हे । पाहतां अघवा तोचि होय । तरि कोण कोणा भोगी. ॥ १९३ ॥ आकाश आकाशीं लोळे ।· पाणी पाण्यावरी खेळे । हें बोलणें कासया मिळे । तेंचि तें असतां. ॥ १९४ ॥ आतां असो हें तें ऐसें । वटवट करणें कायसें । आतां दृढ धरी मानसें । मीच अवघा म्हणोनि. ॥ १९५ ॥आतां मीच मी अवघा हेहि दंडीं । कांहीं न करी सांडीमांडी । तूंचि तूं अवघा जडाजडीं । अवघेवीणपणें. ॥ १९६ ॥ अघवा तूंचि तूं एक । हेंहि म्हणावया नाहीं आणिक । आतां तूं एकेवीण एक । येकला येकलाचि. ॥ १९७॥ येकला तूं म्हणणारा । हा कोण म्हणसी दुसरा । तरि तोचि तूं खरा । नाहीं दुसरा कोणीहि.॥१९८॥ आतां नसेल तरी नसो कां । व्यर्थ कचकचा चावूं नका । आतां तुझें सुख तूंचि घे का । ऐक्यबोधाचें. ॥ १९९ ॥ तें सुख गा! अभंग। सुख तें सुखसागरिंचा तरंग । मीच मी स्वयें अभंग । अखंड होऊनि राहें. ॥ २०० ॥ होयें म्हणो तरी अससी । येऱ्हवी विसर पडला होता तुझाचि तुजसी । चुकला सांपडला आपणासी । आतां विसंबूं नको सर्वथा.' ॥२०१॥ तंव शिष्य म्हणे, 'सद्गुरुराया! । तुमचा बोध केंवि जाये वाया । उगवला सूर्य अस्ता न्याया। सामर्थ्य असे काय तमासि? ॥२०२॥ तुमचा बोधसूर्य गहन । विसरतमा करी छेदन । स्वतःसिद्धबोध पालट कोण । करूं शके स्वामिया! ॥२०३॥ तुम्हां ऐसा दाता। पाहतां त्रिभुवनीं नाहीं सर्वथा । तुम्हासि उपमा देतां। नातुडे कांहीं. ॥२०४॥ कामधेनूची उपमा द्यावी । तरि कामनाचि पुरवी । परी परब्रह्म पदवी । न देववे तिसी. ॥ २०५॥ कल्पतरूची उपमा द्यावी । तो कल्पित अर्थ पुरवी । कल्पनातीत भेटवी । सद्गुरुरावो. ॥२०६॥ चिंतामणीची उपमा द्यावी । परि तो चिंतिला अर्थ पुरवी । सद्गुरुरावो भेटवी । सच्चिदानंदा. ॥२०७॥ परिस लोहाचें

---

१. (अ) व्यापक व्यापकपण असतां पाहे. २. 'एक' म्हटलें असतां दुसऱ्याची अपेक्षा भासते म्हणून सापेक्ष त्या एकापेक्षांहून, शुद्ध. ३. थोर. ४. (ब) उगवला सूर्य अद्धया । त्यासि उपमा काय यावी ? ॥. ५. विसर (विसरण) अज्ञानरूपी तमा (अंधकाराम).

सुवर्ण करी । परी आपणा ऐसें परिस न करी । गुरु आपणाऐसें करी । परब्रह्म शिष्यासी. ॥ २०८ ॥ याचिलागीं तुमचे दातेपणा । उपमा द्यावी जी कोणा । सच्चिदानंद चिद्घना । देता दाता तूंचि तूं. ॥ २०९ ॥ सच्चिदानंद दान । देउनि केले चिद्घन । ऐसिया उपकारा उत्तीर्ण । केंवि होइजे स्वामिया. ॥ २१० ॥ तुमचें देणें अविनाश सदोदित । संसारिक देणें सर्व नाशिवंत । तेणें उत्तीर्णपणाची मांत । काय करूं येईल.' ॥ २११ ॥ तंव सद्गुरु बोलती शिष्यासी, । 'आम्ही निरोपिलें तैसा वर्तसीं । तरि सर्वस्व पावलें आम्हांसी । निश्चयेंसी जाण पां. ॥ २१२ ॥ आम्ही ब्रह्मज्ञानी पूर्ण । जग हें सर्व अज्ञान । ऐसा धरिसी अभिमान । तरी ब्रह्मत्व जाइल. ॥ २१३ ॥ जो स्वयें ब्रह्म होये । तो जग ब्रह्मत्वेंचि पाहे । भेदाचें अंधारें जाये । अभेदसूर्य प्रकाशतां. ॥ २१४ ॥ पूर्ण प्रकाशतां गभस्ति । तया क्षणींच दिशा उजळती । कीं अंधारें वेष्टूनि राहती । कीं प्रकाशती सांग पां. ॥ २१५ ॥ तेंवि आपण ब्रह्म होये । तो जगती सर्व ब्रह्म पाहे । तयाचा भेदू जाये । होउनि ठाये जगचि ब्रह्म. ॥ २१६ ॥ तूं जगासी ब्रह्म होई । मग ब्रह्मत्वचि पाहीं । जग सर्व मानीं माझ्या ठाईं । हेंचि उतराई होणें आम्हां. ॥ २१७ ॥ तूं अहंममता अभिमान सांडिसी । वित्पत्ती चातुर्य गाळिसी । जगा धाकुटा म्हणविसी । हेंचि उतराई होणें आम्हां. ॥२१८॥ सर्व जीवांसी दशा कैंची । दुःख हरोनि सुख देसी । संतसेवे कुरवंडी करिसी । हेंचि उतराई होणें आम्हां. ॥ २१९ ॥ तूं म्हणसी उत्तीर्ण काय होइजे । तरि हेचि उतराई जाणिजे । जे सर्वाभूतीं असिजे । निर्वैर होउनियां. ॥ २२० ॥ अवघा तूंचि तूं अससी । तरी वैर करणें कोणासी । म्हणोनि आर्जव सर्वांसी । असो देई शिष्यराया. ॥ २२१ ॥ जीव म्हणितला म्हणोनि । हे भावना भाविसी क्षणी । ब्रह्मभावना भावीं मनीं । भेद सांडुनी बापा. ॥ २२२ ॥ जो हा भेदाकार प्रपंच दिसे । तें ब्रह्मचि विस्तारिलें असे । तेथें ब्रह्मावांचून आन नसें । हे भावना असों देई. ॥ २२३ ॥ ब्रह्म प्रपंचाकार विस्तारिलें. । तें लोपलें कीं शोभेसि[1] आलें । रत्न कीं लेणें लोपलें । कीं शोभलें तेणेंचि. ॥ २२४ ॥ सुवर्णखोटीचा[2] गोळा । बांधिला वधूच्या गळां । तरि ते काय शोभेची कळा । दिसों येईल. ॥ २२५ ॥ ते खोटीचीं भूषणें करूनियां । अंगेंप्रत्यंगें लेववीलिया । तेणें सुवर्ण जाय वाया । कीं शोभे आलें. ॥ २२६ ॥ तेंवि ब्रह्म प्रपंचाकार दिसे । परि तेणें तें काई लोपलें नसे । तेणेंचि शोभलें असे । ऐसें भासे जयासी. २२७

---

१. अलंकार झाल्यामुळें. २. खोटि किंवा खोट=गोळा.

सागर तरंगीं भरला। सागरपणा काय झांकला। कीं विशेष शोभे आला। विचारी पां. ॥२२८॥ ब्रह्मसागरींचे तरंग। तें हें जाणिजे जग। जगपण सांडिजे सर्वांग। ब्रह्मचि असे. ॥२२९॥ब्रह्मसागरींचा तरंग। तूं आपणिया भावीं जग। ब्रह्मसागरचि तूं सर्वांग। होऊनि असें. ॥ २३० ॥ होऊन ठाईं म्हणतां। तरी पूर्वीं काय न होतां। भ्रमें भ्रमला होता। तो गुरुखुणें प्रकाशला. ॥ २३१ ॥ जेंवि सूर्य अभ्रें आच्छादिला। अभ्र जातां काय सूर्य नवा झाला? । तेंवि तूं भावीं आपणाला। मी स्वतःसिद्धचि असें. ॥ २३२ ॥ आतां असे नसे हे किती। वटवट करितां संत कोपती। तूं अखंड राहें ब्रह्मस्थिती। समदृष्टी सदा.' ॥ २३३ ॥ हे वाक्पुष्पपूजा। घडो श्रीगुरुराजा!। येकनाथ म्हणे तुझा। गुरुपुत्र हो ॥ २३४ ॥ हा ग्रंथ जे अनुभवोनि पाहती। ते या देहींच ब्रह्म होती। जे जाणती बृहदारण्य श्रुति। ते ओळखती या ग्रंथातें. ॥ २३५ ॥ मी तरी संतांचा दासानुदास। मी नेणें ग्रंथ करूं पदपदास। तुम्ही बोलविलें हा विश्वास। दृढ माझा. ॥ २३६ ॥ जंव तुमची कृपा न घडे। तंव स्वानुभव ज्ञान केंवि घडे। तुमचे कृपेनें ज्ञान अनुभव उजेडे। म्हणे येकनाथ. ॥२३७॥ हा ग्रंथ अध्यात्मपूर्ण। गुह्याचेंही गुह्य ज्ञान। जो करी नित्य पठण। तो चैतन्यघन होऊनि राहे. ॥ २३८ ॥ येथिंचा गुह्यार्थ पाहतां। ब्रह्मपूर्ण होय वक्ता। मुक्ति सायुज्यता। पाया लागे. ॥ २३९ ॥ जो वेदशास्त्राचा गुह्यार्थ। त्याचाहि देखणा परमार्थ। निजज्ञानासि सामर्थ्य। होय या ग्रंथीं. ॥ २४० ॥ येथें विवेक उजळे। स्वानुभव विवळे। आपआपणा कळे। गुरुकृपें. ॥ २४१ ॥ हा ग्रंथ पढे पाहे। तो स्वयं ब्रह्मचि होये। नित्य पठण करितां लाहे। आपुला निज ठेवा. ॥ २४२ ॥

---

## १७. गोसावीनंदनकृत त्र्यंबकाष्टक.

(श्लोक.)

होवोनियां प्रकट ब्रह्म गिरीस्वरूपें, हें विश्व मुक्त करिशी निरसोनि पापें,।
तूझा अगाध महिमा नकळे महेशा! गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा! ॥ १
केलें प्रसन्न तुजला ऋषि गौतमानें, त्वां गौतमी मग तया दिधली कृपेनें,।
झाला तिचा उगम तेथुनि पार्वतीशा! गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा! ॥ २

---

१. रहा. २. 'अहं ब्रह्मास्मि' या वाक्याचें विवरण मूळ बृहदारण्यकांत केलें आहे, त्याचाच अनुवाद वर आपण केला आहे—असा कवीच्या म्हणण्याचा भाव.

जेथें ऋषी सकळ देव पवित्र गंगा, ऐसें नसे त्रिभुवनीं स्थळ ज्योतिर्लिंगा, ।
देखोनि जाय श्रम सर्व विचित्रवेशा ! गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥ ३
रुद्राक्षभूषण विभूति त्रिपुंड्रधारी, प्राणी असा शिव पुजील बऱ्या प्रकारीं, ।
पावेल तो सकळ संपति पुत्रवेशा[1], गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥ ४
श्रीसांब शंकर सदाशिव नाम गाती, जे गाति सर्व तुज सन्निध ते रहाती, ।
त्याला तुझीच उपमा दुःखवेशा (?), गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥ ५
जाणोनियां कलियुगीं तव साक्ष मोठी, सेवा अखंड करिती जन लक्ष कोटी, ।
देतोसि त्यांसि फळ वांछित नागभूषा ! गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥६
ज्याला तुझी जरि घडेल प्रदक्षिणा रे! त्याचें क्षणांत कलिकिल्मिष तेंहि वारे, ।
स्वामी दयार्णव परात्पर स्वप्रकाशा, गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥ ७
मृत्युंजया ! विनवितों तुज एकभावें, त्वां आपुलें भजन पूर्ण अखंड द्यावें, ।
याहून आणिक नसे मज जाण आशा, गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥८

---

उपसंहार.

जो हें पढेल 'शिवअष्टक' स्पष्ट वाचे,
संसारकष्ट अति दारुण त्यास कैंचे ? ।
तो नातळे मग गुणत्रयमोहलेशा,
गोसाविनंदन म्हणे जय त्र्यंबकेशा ! ॥ १

---

## ज्ञानेश्वरमहाराजविरचित

## १८. शुकाष्टकावरील टीका.

**भेदाभेदौ सपदि गलितौ पुण्यपापे विशीर्णे**
**मायामोहौ क्षयमधिगतौ नष्टसंदेहवृत्ती ।**
**शब्दातीतं त्रिगुणरहितं प्राप्य तत्त्वावबोधं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ १ ॥**

(ओव्या)

जयाचा भेदाभेद गळाला । शब्द ब्रह्मींच बुडाला । सकल ब्रह्मबोध आला । निश्चयेंसी ॥ १ ॥ जो पुण्यपापाशीं नातळे । अग्नींत न पोळे आपुलेनि ज्वाळें । न लिंपे मायामोहविटाळें । झाला संशयरहित. ॥ २ ॥ जयाचा वाच्यांश निरसला । आणि शुद्ध लक्ष्यांश लाधला । गुणत्रयीं दुरावला । निर्गुणबोधें. ॥ ३ ॥

---

१. पुत्रवंशा (?).

ऐसा झालिया तत्त्वबोध । तयासि कवण विधिनिषेध । तो स्वानंदसुखें क्रीडा विनोद । करित विचरे सदां. ॥ ४ ॥

**यद्वात्मानं सकलवपुषामेकमंतर्बहिःस्थं**
**दृष्ट्वा पूर्णं खमिव सततं सर्वभांडस्थमेकम् ।**
**नान्यत्कार्यं किमपि सततं कारणाद्भिन्नरूपं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ २ ॥**

ज्ञानरूप आत्मा जाणुनी । सर्वभूतीं व्यापक लक्षुनी । एकचि अंतर्बाह्यें कोंदोनी । परिपूर्ण सदा. ॥ ५ ॥ देखे आकाश निरंतर पूर्ण । एकचि घटमठीं अभिन्न । तैसें व्यापक चैतन्य । असे समान सर्वत्र पैं. ॥ ६ ॥ परी जें कार्य कारणारहित । सकळ होऊनि चेष्टे ना चेष्टवित । स्वप्रकाशमय दुमदुमित । नव्हे न्यून पूर्ण कांहीं. ॥ ७ ॥ ऐसा होय योगिराणा । सकळ द्रष्टाचि होऊनि आपण । गुणातीत शुभाशुभ भिन्न । विधिनिषेध त्या नाहीं. ॥ ८ ॥

**हेम्नः कार्ये हुतवहगतं हेम एवेति तद्व-**
**त्क्षीरे क्षीरं समरसगतं तोयमेवांबुमध्ये ।**
**एवं सर्वः समरसतया त्वंपदं तत्पदार्थे**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ३ ॥**

हें सकळ ब्रह्म जयाचिये दृष्टि । जैसे अलंकार आटितां अग्निपुटीं । तेथें होय सुवर्णगोटी । अनुभवसिद्धची. ॥ ९ ॥ ना तरी नाना वर्ण गाय । क्षीर मिळविल्या एकत्र होय । वापी कूप तडाग तोय । मिळवितां एक जैसें. ॥१०॥ तैसें सकळ देहीं त्वंपद शोधिलें । तत्पदासहित असिपदीं ऐक्य झालें । तेथें माया अविद्याद्वय आटलें । घटमठभंगीं गगन जैसें. ॥ ११ ॥ तेथें ज्ञप्तिमात्र चिन्मय उरे । तें तूं अखंड वस्तूचि असती बारे ! । अद्वयानंद बोध तो तूं रे ! । स्वतःसिद्ध आत्मा कीं. ॥ १२ ॥ ब्रह्म निर्विकल्प संप्रज्ञात । ऐसें असणें समाधिस्थ । शुभाशुभकर्मीं अलिप्त । विधिनिषेध त्या नाहीं. ॥ १३ ॥

**यस्मिन्विश्वं सकलभुवनं सामरस्यैकभूत-**
**मुर्वी ह्यापोऽनलमनिलखं जीवमेतत्क्रमेण ।**
**यत्क्षाराब्धौ समरसतया सैंधवैकत्वभूतं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ४ ॥**

जया स्वरूपाच्या ठायीं । विश्व चतुर्दश भुवनेसीं व्यापक पाहीं । समरसीं नुरेचि कांहीं । आटुनि जातील सकळही ब्रह्मांडें. ॥ १४ ॥ ना तरी पृथ्वी

आकाश । जीवशिव समरसीं नुरेचि लेश । मग उरे तें अविनाश । आत्मस्वरूप जें. ॥ १५ ॥ ना तरी जैसें सैंधव सागरीं । एकवट होतां उदकचि निर्धारीं । तैसें भूतजात संहारीं । होय आत्मस्वरूपीं. ॥ १६ ॥ तैसा तूं विधिनिषेधीं । न लिंपेसी या उपाधी । मग निखिल पूर्णबोधीं । रमे सुखें. ॥ १७ ॥

**यद्वा नद्योदधिसमरसौ सागरत्वं ह्यव्याप्तौ**
**तद्वज्जीवो लयपरिगतं सामरस्यैकभूतम् ।**
**भेदातीतं परिलयगतं सच्चिदानंदरूपं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ५ ॥**

जैशा नाना नदी सागरीं । एकवट होतां उदक निर्धारीं । तैसा जीवात्मा चराचरीं । ब्रह्मीं लीन होय. ॥ १८ ॥ तैसें समरस झालिया समस्त । मग वस्तूचि उरे अखंडित । सकलभाव लया जात । सच्चिदानंदस्वरूपीं. ॥ १९ ॥ ऐसा अनुभव जयासि झाला । तो गुणातीत परब्रह्मीं आथिला । बोधस्वरूप आत्माचि होऊनि ठेला । अद्वयानंदबोधीं. ॥ २० ॥ तेथें पैरादि वाचा चारी । मुरडलिया नेति नेति निर्धारीं । तो निजस्वरूपअंबरीं । तूंचि तूं स्वयें ॥ २१ ॥

**दृष्ट्वा वेद्यं परमथ पदं स्वात्मबोधस्वरूपं**
**बुद्ध्वात्मानं सकलवपुषामेकमंतर्बहिःस्थम् ।**
**भूत्वा नित्यं सदुदिततया स्वप्रकाशस्वरूपं**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ६ ॥**

देखोनियां ज्ञान परमामृत । तेंचि कैवल्यपद अखंडित । तो स्वात्मबोध मिळे निश्चित । स्वानुभव पैं. ॥ २२ ॥ जो तत्त्वबोधीं निश्चयो केला । सकलभूतीं समरस एकला । तो सच्चिदानंद प्रकाशला । अभेदरूप. ॥ २३ ॥ ऐसे स्थितिया आब्रह्मादिस्तंबपर्यंत । दृश्य द्रष्टा दर्शन सदोदित । तो आत्मा पूर्ण प्रकाशत । परमाद्वय तेज. ॥ २४ ॥ ऐसिया बोधा जाणोन । तो गुणातीत झाला आपण । विधिनिषेध दहन करून । पुण्य पाप त्या नाहीं. ॥ २५ ॥

**कार्याकार्ये किमपि सततं नैव कर्तृत्वमस्ति**
**जीवन्मुक्तस्थितिरवगतो दग्धवस्त्रावभासः ।**
**एवं देहः प्रविशति गतस्तिष्ठमानो विमुक्तो**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ७ ॥**

---

१. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी.

जेथें कार्यकारण कांहीं । मज सर्वथा कर्तृत्व नाहीं । शुद्ध चैतन्य जीवन्मुक्त देहीं । असे प्रारब्धवशें. ॥ २६ ॥ व्यवहरतसे कैसें देहद्वय । जैसी जळाली वस्त्राची घडीय । पुढती पांघुरतां नये । निर्धार पैं भासतसे ॥ २७ ॥ ऐसा हा निर्वाणमार्ग । सेवितां भवरोगिया आरोग्य । तेणें प्राप्त होय पूर्ण योग । प्रज्ञासमाधि. ॥ २८ ॥

**कस्त्वं कोऽहं किमपि च भवान्कोऽयमत्र प्रपंचः**
**स्वं स्वं वेद्यं गगनसदृशं पूर्णतत्त्वप्रकाशम् ।**
**आनंदाख्ये समरसघने बाह्यमंतर्विहीने**
**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ ८ ॥**

मी कैंचा मा मज संसार । कवण बंध मोक्षव्यवहार । प्रपंच मिथ्या साकार । साच नव्हे स्वप्नावस्था. ॥ २९ ॥ हे लटकीच मायिक रचना । दावितसे मी-तूंपणा । हें कांहीं नव्हे स्वयें जाणा । व्योम अखंड अद्वयत्वें. ॥ ३० ॥ तें तूं पूर्णत्वें प्रकाशस्वरूप । आनंद अक्षय ज्योती चिद्रूप । समरसोनि आपेंआप । अंतर्बाह्य कोंदोनि ॥ ३१ ॥ जैं अत्यंत सरे कर्मभोग । मग प्रपंचासि होय वियोग । सर्पभ्रमें होय भोग । माळेसि जैसा. ॥ ३२ ॥ मग सर्वसाक्षित्व होऊनि । स्वस्वरूपीं विश्रामुनी । आपुल्या स्वसुखीं समरसोनी । अखंड स्वयंप्रकाश. ॥ ३३ ॥ ऐसियासी कवण मोक्षबंध । गुणातीतासी कवण विधिनिषेध । तो परमहंस आनंद सुखावबोध । स्वयं आत्मा कीं. ॥ ३४ ॥

**सत्यं सत्यं परमममृतं शांतिकल्याणरूपं**
**मायारण्ये दहनमनले शांतिकल्याणदीपम् ।**
**तेजोरूपं निगमसदनं व्यासपुत्राष्टकं च**
**प्रातःकाले पठति मनसा याति निर्वाणमार्गे ॥ ९ ॥**

सत्य सत्य ज्ञान परमामृत । तेंचि कैवल्यपद अखंडित । मायाअरण्य दहन करित । क्षणमात्रें. ॥ ३५ ॥ जें निर्मळ शांत निर्वाणदीप । तें तेजोमय प्रकाशरूप । व्यासपुत्रें सुगमरूप । कथन केलें वेदोक्त. ॥ ३६ ॥ हें शुकाष्टक प्रातःकाळीं । जो पठे नित्य वेळोवेळीं । त्याचे संसाराची होळी । होय क्षणमात्रें. ॥ ३७ ॥ ऐसिया रहणी असतां । तया कवण विधिनिषेधता । पापपुण्य कथा वार्ता । तया नाहीं. ॥ ३८ ॥ मायावनीं लाविला ज्ञानवैश्वानर । सकल प्रपंचाचा होय संहार । मग आपणचि उरे निर्धार । निर्धारातीत. ॥ ३९ ॥

ऐसें तें नेतिमुखें शोधिलें । मायाअरण्यातें जाळिलें । अंतीं आपणचि उरलें । आपण आपणाविण. ॥ ४० ॥ हें ज्यासी गुरुकृपें होय । तोचि फळप्राप्तिसी लाहे । येरा बोला काय आहे । अप्राप्त्यांसीं. ॥ ४१ ॥ जो संसारतापीं अति संतप्त । आणि साधनचतुष्टयसंयुक्त । तया सद्गुरुप्रसादें वस्तू प्राप्त । शुकाष्टकार्थें. ॥ ४२ ॥ येथुनी ग्रंथाचा प्रांत झाला । निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोलिला । येथींचा अर्थ अलोट करितां भला । संत सज्ञान. ॥ ४३ ॥ ये ग्रंथींची जे जे ओवी । ते केवळ निजस्वरूपचि दावी । परी अर्थिता सज्ञान भावी । असावा पैं तो. ॥ ४४ ॥ येथींचा अर्थ बहुत गहन । जो नित्य करी श्रवण पठण । तो स्वतःसिद्ध झाला जाण । निजवस्तू पावला. ॥ ४५ ॥ येथील ओवीची गौल्यता । आणिक कोठें नाहीं तत्वता । ओवीहूनि ओवी अधिकता । अर्थविपयीं. ॥ ४६ ॥ तें हें जाण निरोप्रण । अर्थविता निवृत्ति आपण । संपूर्णासी संपूर्णता पूर्ण । जाहालें संपूर्ण. ॥ ४७ ॥ संपूर्ण झालें ज्ञान विज्ञान । संपूर्ण झालें संपूर्ण । संपूर्णता समाधान संपूर्ण । संपूर्ण झालें. ॥ ४८ ॥ संपूर्ण झाली योगयागयोग्यता । संपूर्ण झाली संपूर्णता । संपूर्ण संपूर्ण ऐक्यता । निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव धाला. ॥ ४९ ॥

---

## निरंजनकृत[2]

### १९. पतिव्रताआख्यान.

(ओव्या.)

वेद सर्वांसी आधार । वेद सर्वांचें माहेर । वेदाचेनि पैलपार । पावले सर्व. ॥ १ ॥ तेथें बुद्धि पतिव्रता । दुबळी होवोनि दुश्चिता । गेली सांगावया

---

१. गोडी. २. ह्या कवीचीं 'पतिव्रताख्यान' 'निरंजनपर ओव्या' व 'गोंधळी' अशीं तीनच प्रकरणें आम्हांस मिळालीं तेवढीं तूर्त दिलीं आहेत. बाकीची कविता लवकरच आम्हांस मिळणार आहे. ती मिळाल्यावर कवीची माहिती वगैरे देण्यांत येईल. प्रस्तुत प्रसिद्ध केलेल्या कवितेवरून तींत प्रसाद व सहज स्फूर्ति हे दोन गुण दिसून येतात. वेदांतविषयांतील कठिण विषय रूपकाच्या योगानें येथें फार मोहक व सुलभ रीतीनें सांगितले आहेत. ३. येथें जीव हा पति व बुद्धि ही त्याची स्त्री असें रूपक आहे. बुद्धि ही निश्चयात्मक व सदसद्विवेकपर अशी वर्णिली आहे. जीव वस्तुतः परमात्मरूप असून अविद्येच्या नादीं लागला आहे, व भ्रमांत पडला आहे अशी कुरकुर त्याची स्त्री बुद्धि ही आई(श्रुती)जवळ करीत आहे.

हिता । आपुलें गुज. ॥ २ ॥ वंदोनि श्रुतिमायेसी । सांगे दुःखाचिया राशी, । 'ऐक माते! स्त्रीदेहासी । निर्मिलें कोणें? ॥ ३ ॥ स्त्रियेचा देह अमंगळ, । स्त्रीदेह पापासी मूळ, । स्त्रीदेहाचा विटाळ । मानिती ज्ञानी. ॥ ४ ॥ स्त्रीदेह हें कोडें धन । स्त्रीचा देह पराधीन । स्त्रीदेह उघडें वान । झांकितां नये.' ॥ ५ ॥ मग म्हणे श्रुती आई, । 'ऐकलें कीं बुद्धिबाई! । स्त्रीदेहाची नैवाई । सांगतें तुज. ॥ ६ ॥ स्त्रीदेह रामाची सीता । रुक्मिणी श्रीकृष्णकांता । स्त्री द्रुपदाची दुहिता । अहिल्या तारा ॥ ७ ॥ वसिष्ठाची अरुंधती । अत्रीची अनुसूयासती । ऐशा स्त्रिया धन्य किती । जाल्या त्या सांगूं.' ॥ ८ ॥ बुद्धि म्हणे, 'ऐक माते! । धन्य होते त्यांचे भर्ते । जोडा माझिया दैवातें । मिळाला कैसा? ॥ ९ ॥ हांतें पायें लंगडा लुळा । नाहीं नाक कान डोळा । रूपाचा सोहळा । काय वो सांगूं? ॥ १० ॥ असो जैसा तैसा तरी । ऐक स्वभावाची परी । अविद्या दुराचारी । ठेविली तेणें. ॥ ११ ॥ करितां तयेसी संसार । शतावधि जालीं पोरें । मन आणि अहंकार । थोरले पुत्र. ॥ १२ ॥ त्यांनीं पापाचे पर्वत । उभारिले असंख्यात । विषयभोगें उन्मत्त । होवुनी ठेले. ॥ १३ ॥ आशा तृष्णा कल्पना । लेकी जाल्या या तुफाना । न म्हणती थोरसाना । भोगिती सर्व. ॥ १४ ॥ कामक्रोधादि लेंकुरें । खोडकर अनिवार । त्यांनीं हागोनिया घर । नासिलें सर्व. ॥ १५ ॥ हृदयाच्या माजघरीं । पति निजतो दिवसभरी । बरळतो नानापरी । अविद्यायोगें. ॥ १६ ॥ म्हणे जन्मतो मरतो । पापपुण्यादि भोगितो । स्वर्गनरकासि जातो । वारंवार. ॥ १७ ॥ माझें घर, माझें दार, । माझी संपत्ति, हें पोर । माझा अवघा संसार । असावा सदा. ॥ १८ ॥ असो. आतां मायबाई! । करूं उपायासी काई? । व्रत आचरोनि पाही । जाळीन देह.' ॥१९॥ श्रुति म्हणे, 'पतिव्रते! । ऐक लेकी गुणवंते । माझें वचन निरुतें । सांगतें तुज. ॥ २० ॥ पतिवांचोनिया वृथा (व्रता?) । स्त्रियेनें करूं नये सर्वथा । पतियोगें पतिव्रता । धन्य पैं जाल्या. ॥ २१ ॥ स्त्रियांचा तो

१. श्रुतीपासूनच सर्व सृष्टीचा पसारा आहे असें वेदांतमत असल्यानें श्रुतीस माता म्हटलें आहे. जीव व ब्रह्म यांच्या ऐक्याचा उपदेशही श्रुतीनेंच केला असून तो बुद्धिद्वारा जीवाकडे पोंचावयाचा आहे. श्रीमत् शंकराचार्यांनीं श्रुतीचा श्रुतिमाता म्हणून पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे. २. संकटाचें, त्रासदायक. ३. वाण, दान देण्याचा जिन्नस. ४. नवीन गोष्ट; महत्व. ५. हें आत्मस्वरूपी जो जीव त्याचें वर्णन. ६. स्वस्वरूपाचें अज्ञान. ७. बेफाम. ८. दिवसभर. ९. खरें.

पति देव । व्रतदान पुण्यें सर्व । पति स्त्रियेचा तीर्थराव । वंदावा सदा. ॥ २२ ॥ पति जाणावा निर्दोष । पाहूं नये त्याचा दोष । सदा सर्वदा संतोषें । सेवावा पति. ॥ २३ ॥ पति मानावा गणगोत । पति स्त्रीचा परम आप्त । पति स्त्रियेचा परमार्थ । जाणावा सर्व. ॥ २४ ॥ करितां नित्य पतिसेवा । संतोष वाटतो देवा । लक्ष्मी पार्वती हेवा । करिती तिचा. ॥ २५ ॥ बुद्धि लेकी! धरी धीर । माघारी घरासी फीर । भर्ताराची निरंतर । करावी सेवा. ॥ २६ ॥ वडिल बंधु तुझा सखा । विवेक नेई पाठिराखा । करिल अविद्येचा वोखा । देइल घालवूनि. ॥ २७ ॥ मन आणि अहंकार । अविद्येचा जो विस्तार । करिल तयाचा संहार । विवेक हा. ॥२८॥ घेउनि विवेकाचा फाटा । झाडुनि काढीं चारी वाटा । शमदमादि चोखटा । घाली गे! सडा. ॥ २९ ॥ मुमुक्षता घेउनी फणी । घाली त्रिगुणाची वेणी । शुद्धसत्वजीवनीं । सुस्नात होई. ॥ ३० ॥ गुरुभक्ति पातळ चोळी । नेसुनि होई सोवळी । निश्चयाचें कुंकू भाळीं । अक्षयीं लावीं. ॥ ३१ ॥ अमानित्वादि भांडार । उघडुनि घाली अलंकार । रत्नजडित परिकर । प्रकाशमय. ॥ ३२ ॥ सर्व शृंगारा करोनि । जाई पतिसन्निधानीं । स्तुतिस्तवना करूनी । उठवी पति.' ॥ ३३ ॥ श्रुतिमायेनें कथिलें । सद्बुद्धीनें तैसें केलें । स्तवनासि आरंभिलें । वेदांतें करूनि. ॥ ३४ ॥ 'उठा उठा पतिराया! । कैसे भ्रमलाति वायां? । जाणा ईश्वराची माया । मिथ्या ही सारी. ॥ ३५ ॥ तुम्हां नाहीं देह गेह । कैंचा पापपुण्या ठाय? । स्वर्गनरकाची त्रैय । फिटली सहजीं. ॥ ३६ ॥ तुम्ही निर्गुण निराकार । निर्मळ निश्चळ निराधार । अनंत पारावार-। रहित तुम्ही. ॥ ३७ ॥ तुम्ही ज्ञानघनानंद । परिपूर्ण असिपद । कैंचा वायां करितां खेद । जागे व्हा स्वामी!' ॥ ३८ ॥ ऐसें करितां स्तवन । सांडोनियां

---

१. नाश. २. केरसुणी. ३. चांगला. ४. सत्व, रजस्, तमस्, या तीन गुणांची. ५. शुद्धसत्वगुणरूपी पाण्यानें. ६. 'अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥' इ० पांच (७–११) श्लोकांमध्यें गीतेच्या १३ व्या अध्यायांत ज्ञानाचें लक्षण सांगितलें आहे. ७. रक्षण. ८. अमर्याद. ९. तत्त्वमसि (तत्+त्वम्+असि) ह्या महावाक्याचा उपनिषदांत उपदेश केला आहे. ह्यांतील 'तत् व त्वम्' यांचें ऐक्य दाखविणारें जें 'असि'पद त्याचा अर्थ जहदजहल्लक्षणेनें घ्यावयाचा आहे. जहल्लक्षणेंत शब्दाच्या कांहीं अर्थाचा त्याग केला जातो व अजहल्लक्षणेंत अत्याग असतो. जहदजहल्लक्षणेंत कांहींचा त्याग व कांहींचा अत्याग असतो. ही लक्षणा येथें लागते ती अशी. त्वंपद जीवास अनुलक्षून आहे. जीवाचें स्थूळ, सूक्ष्म, कारण व महाकारण,

जीवपण । प्रत्यगात्मा सावधान । होता पैं झाला. ॥ ३९ ॥ सद्बुद्धीसी आलिंगुन । पावला तो समाधान । जालें पूर्वील स्मरण । त्यालागीं सर्व. ॥ ४० ॥ बुद्धीसहवर्तमान । गेला सद्गुरूसि शरण । त्याच्यायोगें पूर्णपण । पावता झाला. ॥ ४१ ॥ तेथें बुद्धि पतिव्रता । विरूनि गेली सर्वथा । करूनि आपुल्या स्वहिता । पावली कीर्ति. ॥ ४२ ॥ पतिव्रताआख्यान । जे कां करिती स्मरण । तेहि होती निरंजन । रघुवीरकृपें. ॥ ४३ ॥

---

## निरंजनकृत

### २०. निरंजनपर ओव्या.

वंदोनिया सद्गुरूसी । शुद्ध विवेकाची राशी । सांगतों मी श्रोतियांसी । ऐकोनि ध्यावी. ॥ १ ॥ निजवर्णाश्रमधर्म । आचरोनि क्रियाकर्म । भगवंतीं सदा प्रेम । असूं द्यावें. ॥ २ ॥ नित्य आत्मा परिपूर्ण । अनित्य हे सर्व जन । ऐसें मनीं विवेचन । करित जावें. ॥ ३ ॥ सर्व त्रैलोक्यामाझारीं । उपभोग नानापरी । तुच्छ मानावे अंतरीं । विष्ठेसम. ॥ ४ ॥ शमदमादि[२] साधन । हळु-

---

हें देहचतुष्टय व त्यांच्या जागृत्यादि अवस्था, हें सर्व त्वंपदाचा शबलवाच्यांश आहे व ह्या देहचतुष्टयाहून वेगळें जें तें त्वंपद शुद्ध लक्ष्यांश. देहचतुष्टयाचा निरास झाला म्हणजे त्वंपदाचा शबल वाच्यांश गेला. जीवपण गेलें व केवल साक्षी चैतन्यमात्र उरलें. ह्यास त्वंपदाचें शोधन म्हणतात. आतां तत्पदाचें शोधन. स्वानंदघन परमात्म्यास ‘अहं’ ब्रह्म म्हणून स्फूर्ति झाली तीच स्फूर्ति माया. तिच्यांत जें चैतन्यरूप बिंबलें, त्या प्रतिबिंबाचें नांव ईश्वर. त्या ईश्वराचें विराट्, हिरण्यगर्भ, माया व महामाया हें देहचतुष्टय व उत्पत्तिस्थित्यादिक त्यांच्या अवस्था. हां सर्व तत्पदशबलवाच्यांश होत. हे विराटादि चारी देह व अवस्था यांचा निरास झाला म्हणजे उरणारें जें तें तत्पद शुद्ध लक्ष्यांश. आतां त्वंपद शबलवाच्यांश व तत्पदशबलवाच्यांश जहल्लक्षणेनें टाकावयाचे व त्वंपद शुद्धलक्ष्यांश व तत्पद शुद्धलक्ष्यांश, हे उभयतां शुद्धलक्ष्यांश अजहल्लक्षणेनें घ्यावयाचे. याप्रमाणें जीवाचें पिंडात्मक जीवपण निरसलें व ईश्वराचें ब्रह्मांडात्मक शिवपण निरसलें म्हणजे जी जीवशिवपणारहित एकात्मता उरली तिचें नांव असिपद. तेंच असिपद तुम्ही आहांत असें बुद्धिरूपी स्त्री जीवरूपी पतीस सांगत आहे. वर सांगितलेलें त्वंपदतत्पदाचें शोधन पुढील निरंजनपर ओव्यांमध्यें केलें आहे.

१. घटांतील आकाशास जसी घटाकाश संज्ञा आपण देतां तसेंच विशिष्ट देहादि उपाधींनीं परिच्छिन्न जो आत्मा त्यास प्रत्यगात्मा अशी संज्ञा आहे. २. साधनें चार आहेत:— (१) नित्यानित्यवस्तुविवेक, (२) इहामुत्र फलभोगविराग, (३) शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा, समाधान हें षट्क आणि (४) मुमुक्षुत्व.

हळू संपादून । मोक्षहेतूलागीं मन । उदित व्हावें. ॥ ५ ॥ जगामांजी सदाचारी । ब्रह्मनिष्ठ परोपकारी । ऐशा गुरूतें सत्वरी । शरण जावें. ॥ ६ ॥ मग ते अधिकार पाहून । सांगतील तुजला ज्ञान । जेणें होय समाधान । अक्षयीं तुझें. ॥ ७ ॥ सोडवुनी देहबुद्धी । लाविती आत्मसमाधि । ऐक आतां त्याचा विधी । सांगतों तुज. ॥ ८ ॥ नव्हेसी तूं स्थूळदेह । तुजला तो दृश्य होय । तैसाचि तो लिंगदेह । नोहेसी तूं. ॥ ९ ॥ स्वरूपाचें जें अज्ञान । दोन्ही देहांसी कारण । तोहि नोहेसी तूं जाण । द्रष्टा तूं त्याचा. ॥ १० ॥ तिन्ही देहांचें लक्षण । जाणसी तूं जेणें गुण । तो तूं महाकारण । नोहेसी बा ! ॥ ११ ॥ चहूं देहां विलक्षण । साक्षी याचा तूं चिद्घन । त्वंपदाचें शोधन । ऐसें करी. ॥ १२ ॥ आतां तत्पदशोधन । ऐक स्थिरावुनि मन । विराट पंचभूत जाण । सोडोनि द्यावा. ॥ १३ ॥ इंद्रचंद्रादि सुरगण । हिरण्यगर्भ येणें गुण । अव्यक्त अज्ञान । सोडावेंची. ॥ १४ ॥ चवथा देह मूळमाया ।

---

१. पृथिव्यादि भूतपंचकाच्या अस्थिमांसादि पंचवीस विकारात्मक जो तो स्थूलदेह. हा दृश्य असल्याकारणानें द्रष्टा जीव याहून भिन्न आहे. २. श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा व घ्राण, हीं पंचज्ञानेंद्रियें व वाचा, पाणि पाद, उपस्थ आणि गुद, हीं पंचकर्मेंद्रियें; व्यान, समान, उदान, प्राण, अपान हे पंचप्राण, व मन, बुद्धि, चित्त, अहंकार, हें अंतःकरणचतुष्टय मिळून १९ त्रिपुटींचा बनलेला जो देह तो लिंगदेह. ३. स्वस्वरूपाचें अज्ञान म्हणजे अविद्या, हा कारणदेह. स्वस्वरूप मला कळत नाहीं असें म्हणणारा जीव अज्ञानरूपी कारण देहापासून अर्थातच भिन्न आहे. ४. ज्या योगानें वरील तिन्हीही देहांचीं लक्षणें कळतात तो महाकारण देह. ह्यांतही जाणपणा ही उपाधि असल्यामुळें हा जडच आहे. व शुद्ध शांत ब्रह्म ह्या जाणपणाच्याही पलीकडे आहे. ५. येथपर्यंत त्वंपदाचें शोधन करून त्याचें निरसन केलें यापुढें तत्पदाचें विवेचन केलें आहे. ६. जसा जीवाचा स्थूलदेह तसा ईश्वराचा विराट देह, विराटाचा रजोगुण ही क्रियाशक्ति; सत्वगुण ही ज्ञानशक्ति; व तमोगुण ही द्रव्यशक्ति. द्रव्यशक्तीपासून पंचमहाभूतें व त्यांचा विस्तार चतुर्दशभुवनात्मक ब्रह्मांड हीं झालीं. ७. हा ईश्वराचा लिंगदेह. विष्णु, चंद्रमा, ब्रह्मा, नारायण व रुद्र, हें ईश्वराचें अंतःकरणपंचक; दिशा, वायु, सूर्य, वरुण व अश्विनीकुमार, हीं ईश्वराचीं पंचज्ञानेंद्रियें. अग्नि, इंद्र, उपेंद्र, प्रजापति व निर्ऋति हीं पंचकर्मेंद्रियें, व प्रसिद्ध पंच प्राण, हीं सर्व मिळून ईश्वराचा लिंगदेह झाला. ८. ईश्वरास जगत् व्हावें अशी इच्छा झाली हाच त्याचा मायादेह, अथवा अज्ञान (अव्यक्त) देह. ९. ब्रह्माचे ठिकाणीं 'अहं ब्रह्मास्मि' म्हणून जी स्फूर्ति झाली तीच मूळमाया अथवा महामाया, हाच ईश्वराचा चौथा देह. त्याच स्फूर्तिदर्पणीं प्रतिबिंबित झालेलें जें चैतन्य त्यास ईश्वरसंज्ञा प्राप्त झाली.

भासविली जगत्रया । तेहि समजोनि वायां । सांडावी पां. ॥ १५ ॥ चारीदेहां-
परता । परमात्मा निरुता । त्यासी तुर्शी अभेदता । पाहे पां बरी. ॥ १६ ॥
घटीं मठीं गगन । असे जैसें एकपण । पिंड ब्रह्मांडीं चिद्गगन[1] । तैसें पाहीं.
॥ १७ ॥ पिंडें[2] ब्रह्मांड उपाधी । सोडोनियां शुद्धबुद्धि । चिदाकाश निरवधि ।
पाहे पां सर्व. ॥ १८ ॥ शुद्ध नभ जें संपुर[3] । जया नाहीं अंतपार । तेंचि ब्रह्म
निर्विकार । जाणें बापा ! ॥ १९ ॥ तेंचि निर्मळ निराधार । अखंडित निरा-
कार । निश्चित पारावार-। रहित जें कां. ॥ २० ॥ सदा चिद्घनानंद । तें हें
जाणें असिपद । देशकाळवस्तुभेद । नाहीं जेथें. ॥ २१ ॥ करीं तयाचें
चिंतन । एकांतासीं बैसून । समकाय दृढासन । करोनियां. ॥ २२ ॥ सोडोनि
विषयध्यान । माघारीं फिरवीं मन । हृदयीं चिद्गगन । पाहें पां बरें. ॥ २३ ॥
तेथें न रहातां स्थिर । धावुनि जाईल विषयावर । त्यासी आणूनि वारंवार ।
स्वरूपीं ठेवीं. ॥ २४ ॥ ऐसा करितां अभ्यास । स्थिरावेल दिवसंदिवस ।
संकल्पविकल्पास । सांडोनिया. ॥ २५ ॥ जावोनियां विलयासीं । सर्व दुःखा-
चिया राशी । मोद प्रमोदानंदेसी । सुखिया तेथें. ॥ २६ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन ।
त्रिपुटी हे होय क्षीण । तेथें आपुला आपण । दुसरा नाहीं. ॥ २७ ॥
नाहीं सृष्टीचा व्यापार । ब्रह्मा विष्णु महेश्वर । इंद्रादिक सुरवर । नसती
तेथें. ॥ २८ ॥ तेव्हां स्फूर्ति स्फुरण । हेंहि जाय वितळून । न म्हणतां एक-
पण । जैसें तैसें. ॥ २९ ॥ ऐसें निर्विकारपण । सृष्टीपूर्वी ब्रह्म जाण । तेथें
अहं ऐसें स्फुरण । होतें जालें. ॥ ३० ॥ तिचें नांव मूळमाया । चिद्विवर्त गा
सखया ! । प्रसवली गुणत्रया । अहंकारासी. ॥ ३१ ॥ तया अहंकारापासून ।
जन्म अवकाशालागून । त्याचे पोटीं झाला पवन । अग्नी तेथें. ॥ ३२ ॥
अग्नीपोटीं जालें जळ । जळ अवनीचें तें मूळ । पृथ्वी वनस्पती सकळ ।
प्रसवली. ॥ ३३ ॥ वनस्पतीयोगें रेत । रेताचेनि प्राणी होत । ऐसा मायेचा
संकेत । प्रगटला. ॥ ३४ ॥ शुद्धस्वरूपीं स्फुरण । तया मायेमाजी जाण ।
व्यापक जें चैतन्य । ईश्वर तो. ॥ ३५ ॥ तेणें मायेच्या योगानें । केलें सृष्टि-
विस्तारण । पिंडब्रह्मांड रचून । व्याप्त जाला. ॥ ३६ ॥ तोचि अविद्या घेउनि ।
पिंडामाजी प्रवेशोनि । मिथ्या सृष्टी जीवपणीं । मानिली सत्य. ॥ ३७ ॥ ब्रह्मा
विष्णु महेश्वर । होवोनियां तो ईश्वर । स्थिति उत्पत्ति संहार । करीतसे. ॥ ३८ ॥

१. चिदाकाश, परमात्मा. २. ईश्वर व जीव या दोघांच्याही पिंडब्रह्मांडात्मक देहांच्या पलीकडे असणारें चैतन्य एकच आहे. ३. ब्रह्मस्वरूप.

अग्नि पाणी वर्षून । प्राणी मरती संपूर्ण । पृथ्वी जाय विरून । उदकामाजी ॥३९॥ अग्नि आपासि गिळून । जाय वाऱ्यासि मिळून । वायु आकाशीं पळून । लयासी जाय. ॥ ४० ॥ शब्द आणि अवकाश । अहंकार स्फूर्तिभास । प्रकृतींत सम[1]रस । होती सर्व. ॥ ४१ ॥ ब्रह्म आणि मूळमाया । एकपण असे तया । जैसी शरीराची छाया । शरीरासवें. ॥ ४२ ॥ जैसी सुवर्णाची कांती । किंवा दीपकाची दीप्ति । अभेदत्वें निश्चिती । असे सदा. ॥ ४३ ॥ मायायोगें भासे जग । तेंहि ब्रह्मीं एकलग । जैसे सुवर्णाचे नग । सोनेपणें. ॥ ४४ ॥ जैसा तंतुयोगें पट । किंवा मातीयोगें घट । दुजा भासे परिस्पष्ट । एकपणें. ॥ ४५ ॥ तैसें ब्रह्मीं जग भासे । भासे परी दुजें नसे । एकपणीं भ्रमवशें । भासलें दुजें ॥४६॥ भ्रमवशें शुद्ध दोर । भासूं लागे फणिवर[2] । तैसें ब्रह्म निर्विकार । विकारीं भासे ॥४७॥ आदिमध्यअवसानीं । रज्जू जाला नाहीं फणी । तैसें ब्रह्म जगपणीं । जहालें नाहीं. ॥ ४८ ॥ ब्रह्म अद्वय निर्मळ । शुद्ध बुद्ध सर्वकाळ । नसे द्वैताचा मळ । जयाठायीं. ॥ ४९ ॥ ऐसा अनुभव घेउनि । राजयोगिया होवोनि । जीवन्मुक्तीसी भोगुनी । राहें सुखें. ॥ ५० ॥ सेवुनि दया क्षमा शांति । भक्ति प्रेम भगवंतीं । करीं सत्कर्माची रीती । पहिल्यासम. ॥ ५१ ॥ रघुवीराची शिकवण । ऐशापरी उमजून । जहालों मी निरंजन । तैसा तूं होईं. ॥ ५२ ॥

---

## निरंजनकृत

### २१. गोंधळी.

शुक सांगे परिक्षिती । एक कथा[3] भागवती ॥ ध्रुवपद.॥

देहनगर अष्टपुरी[4] जी । पुरंजन[5] राज्य करी जी । बुद्धि तयाची अंतुरी[6] जी । गुणवती सुंदरी जी । त्याचा अहंकार परधान[7] जी । दुष्टराशी काय दुर्जन जी । राजा त्याच्या स्वाधीन झाला जी । त्यानें खेळ काय मांडिला जी । राणीराजाचे माझारि जी । विर्पट[8] पाडियलें भारी जी । पुढें होणाराची गती. ॥ शुक० ॥ १

याव याव काय परधाना जी । माझ्या जीवींच्या जीवना जी । जाउं विष-

---

१. ब्रह्मस्वरूप. २. मोठा सर्प. ३. जीवावरील एक रूपक भागवत—चतुर्थस्कंध—अध्याय २५ ते २९ मध्यें नारदानें प्राचीनबर्हिराजास सांगितलें आहे. त्यावरून कवीनें हें रूपक थोड्याशा फरकानें रचिलें आहे. ४. अविद्या, काम, कर्म, ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक, अंतःकरणपंचक, प्राणपंचक, विषयपंचक मिळून अष्टपुरी लिंगदेह बनती. ५. पुरं देहं जनयतीति पुरंजनः. कर्मानें शरीरास उत्पन्न करणारा. जीवास कर्मफलभोगास्तवच शरीरप्राप्ति आहे. 'भोगायतनं शरीरम्'. ६. स्त्री. ७. प्रधान. ८. वैषम्य.

याच्या वना जी । भोगूं[1] परावी अंगना जी । मनपवन वारूवरी जी । संकल्पाचा साज करी जी । इंद्रियदळभार हाकारी जी । राजा शिकारी निघाला जी । मनवारूवर बैसला जी । पुढें होणाराची गती. ॥ शुक० ॥ २

मग त्या पुरंजन रायानें जी । आतमराज्य[2] काय सोडिलें जी । नसतें जिवपण जोडिलें जी । पांच वनें[3] ओलांडिलीं जी । गेला विषयाच्या वना जी । गेला वासनेच्या दरीं जी । सहा[4] चोरांनीं गांठिलें जी । घे घे घे घे काय बोलती जी । आशा राक्षसिणी गर्जती जी । द्वेषभेदादि वनचरें जी । खाती फोडोनि ऊदर जी । राजा मनीं दचकला जी । काय रे! अहंकारा परधाना! जी । वन रे! मोठें भयंकर जी । त्याचा अंत काय लागेना जी । मला रे! दिशाभुली झाली जी । राणी कुठें रे! राहिली जी । ऐशा होणाराची गती ॥ शुक० ॥ ३

इकडे बुद्धि पट्टराणी जी । पतिव्रता सत्वगुणी जी । तिनें रोदना मांडिलें जी । हरि बा हरि नारायणा! जी । काय रे! करूं या प्राक्तना जी । राजा कोणीकडे गेला जी । ईनें[5] बा! तप काय मांडिलें जी । उपभोगासि सांडिलें जी । घालुनी वैराग्याची धुनी[6] जी । विवेकाच्या काय अंगणीं जी । संग्रामाच्या वज्रासनीं जी । मोक्षहेतु धरुनी मनीं जी । सद्गुरु देव आराधिला जी । त्यांनीं बोधपुत्र दीधला जी । पुढें होणाराची गती. ॥ शुक० ॥ ४

बोध बुद्धीतें बोलत, जी । 'राजा कोठें सांग मला जी । त्याचा शोध मी लावीन जी । तुजलागीं भेटवीन जी' । बुद्धि म्हणे, 'ऐक सुता रे! जी । विषयवनीं तुझा पिता रे! जी । अहंकार घेउनी गेला रे! जी । तेथें गुंतोनि राहिला रे! जी' । ऐकुनि मातेच्या वचना जी । बोध प्रतिज्ञा बोलत जी, । 'राजा घेउनि येइन जी । तुला सुखी काय करिन जी' । पुढें होणाराची गती. ॥ शुक० ॥ ५

विवेकाचा वारु भला जी । त्यावरी बोध स्वार झाला जी । शांति क्षमा दोहीं करीं जी । चौऱ्या ढाळिती सुंदरी जी । शमदम संगें दळ जी । तोफा वैराग्य तुंबळ जी । मग त्या विषयवनाला जी । त्यागरूप अग्नी दिला जी । सहा चोर काय पळती जी । भेद वनचर जळती रे! जी । मग त्या बोधराजियानें जी । अद्वैताच्या काय शस्त्रानें जी । अहंकार तो मारिला जी । इंद्रियबंध तो बांधिला जी । मनवारू फिरविला जी । ऐशा होणाराची गती. ॥ शुक० ॥ ६

---

१. परकी. २. परब्रह्मींचें ऐक्य. ३. आनंदमय, विज्ञानमय, मनोमय, प्राणमय, व अन्नमय असे पांची कोश ओलांडून, बाह्यविषय भोगाकरितां अहंकाराचा अवलंब करून जीव आत्मत्वास विसरून बाहेर आला—असा भाव. ४. षड्रिपूंनीं. ५. बुद्धिराणीनें. ६. धुमी, आगटी.

पुरंजन राजियाला जी । रामा बोध घेउनियां आला जी । बुद्धीलागीं भेटविलें जी । बुद्धि आत्मयाची भेटी जी । निरा[1]लंबीं मिठी पडली जी । गेला दुःखाचा दुकाळ जी । झाला सुखाचा सुकाळ जी । ब्रह्मपदसिंहासनीं जी । आत्मा शोभे अद्वयपणीं जी । वसता झाला निरंजन जी । ऐशा होणाराची गती ॥ शुक० ॥ ८

---

## शि[2]वरामकृत

### २२. ल[3]घुवाक्यवृत्ति.

(श्लोक.)

श्रीगुरूवर **गणेश भारती**, वंदुनी निजमनें अतिप्रिती ।
**वाक्यवृत्ति** [4]उगवीन हि कौतुकें, ऐकतां मन विरे महासुखें. ॥ १
त्वग्मांसरूप पहिली तनु हे पहा हो! तो [5]काय, नामहि दुजा निजसूक्ष्मदेहो, ।
वि[6]ज्ञानकर्मकरणें मिळुनी [6]दहा हीं, प्रा[7]णां सतीसह दुजें तनुमाजि पाहीं. ॥ २
अज्ञान कारण यया [8]शरिरद्वयासी, साक्षी प्रबोध; हरि भासक या तिहींसी. ।
तो बुद्धिसी कवळितो विसरूनि [9]आपा, होऊनि जीव करितो मग पुण्यपापा. ॥ ३
आत्मप्रभा स्फुरलिया मतिदर्पणेसीं, आभास तेथ झमके म्हणुं जीव त्यासी ।
त्याच्या गळांच पडला [10]जनिमृत्युगोवा, [11]आभासिहूनि हरि शुद्ध मथोनि घ्यावा.॥४
जों स्वप्नजागृतिसि सावध बुद्धि आहे, [12]आत्मावभासे तंव दोनि दशेसि पाहे, ।
बुद्धी सुषुप्तिसि लपे तरि भास नाहीं, तैं शुद्ध भासवि तयाहि ज़डासि, पाहीं. ॥ ५
हे बुद्धि होत उगली जरि जागृतीसीं, शुद्ध प्रकाशक तिच्या उगलेपणासी ।
व्यापार सर्व मतिचे हरि भासवीता, आभासयुक्त तरि ते घडताति ताता ! ॥ ६
जैसें वन्हीं तापलें अंबु पाही, त्या तापेसी युक्त दे ताप देहीं, ।
तैसी दैवें भासवी बुद्धि ताता, आभासेसी भासवी त्या पदार्था. ॥ ७
शब्दादि पांच विषयांप्रति भासताहे मानी मनांत असि तूं मतिची क्रिया हे, ।
त्या त्या क्रियेसि विषयांसह निर्विशेषीं, आत्मा प्रकाशवितसे अपुल्या प्रकाशीं. ॥ ८

---

१. ब्रह्मामध्यें. कारण ब्रह्म सर्व निषेधांचा शेष आहे. २. या कवीबद्दलची माहिती लघुकाव्यमाला–भाग १ पृ० १८२ मध्यें पहा. ३. आचार्यांच्या लघुवाक्यवृत्तीवर ही पद्यात्मक टीका आहे. ४. उत्पन्न करीन, रचीन. ५. शरीर. ६. पंच ज्ञानेंद्रियें आणि पंच कर्मेंद्रियें मिळून दहा. करण=इंद्रिय. ७. सती (बुद्धी) सह प्राणां पाहीं शरीरांस. ८. स्थूल आणि सूक्ष्म. ९. आपणाला. १०. जन्ममृत्युरूप गुंता. ११. आभासापासून. १२. साक्षीरूप जो आत्मा.

रूपाहुनी दोषगुणांहुनी हो! जो वेगळा देव असे सबाहो, ।
तोची रसस्पर्शरुपांसि कल्पी, असे अनस्यूतचि निर्विकल्पी. ॥ ९
क्षणक्षणीं बुद्धि अनामसी घडे, तयासवें चिन्मय तें न पालटे, ।
मोत्यांत जैसा गुण ओंविलासे, बुद्धी विकल्पांत हरी तसा दिसे. ॥ १०
मुक्ताफळीं गुण उभारविला विशेषें, मुक्तां द्वयां निवडितां गुण मध्य भासे, ।
तैसा अनुस्युत हरी गुणवृत्तिमाजी, वृत्तीतरेऽनुदितवृत्तिमधें पहा जी! ॥ ११
पूर्वील जो मतिविकल्प निमोनि गेला, जो अन्यवृत्ति गुणही उदया न आला, ।
तो निर्विकल्प नृहरी जिविंचा विसावा, चिन्मात्र केवळ असे निहूरूनि ध्यावा. ॥
निरोधा करी एक दों ती क्षणांचा, अभावची होय विकल्प जयाचा, ।
हरिप्राप्ति व्हावी असी आर्त ज्यांसी, तिहीं हाचि अभ्यास कीजे मनासी. ॥ १३
जो जीव मोहें सविकल्प आहे, तो याचि देहीं शिवराम होये, ।
वेदीं अहंब्रह्म म्हणोनि वाक्य, मिळोनिही अर्थ ययासि ऐक्य. ॥ १४
जे जे स्वतःसिद्ध विकल्प येती, निरोधिल्या स्वानुभवप्रतीती, ।
स्वयें विकल्पात्मक जीव येणें, लुटी किजे ब्रह्मनिधान केणें. ॥ १५
जों शक्ति आहे गुणवृत्तिरोधीं, अभ्यास कीजे तितुक्याच आधीं ।
शक्ती नसे सर्व निरोधभावा, क्षणक्षणाभ्यास तरी करावा. ॥ १६
ऐसाचि जो सर्व विकल्प रोधी, त्या योगिया योगगती समाधी, ।
भक्तीबळें आणुनि वाक्यवृत्ती, आत्माच मी निश्चय जे प्रतीती. ॥ १७
ते चिंतिती तें कथि शिष्यलोकां, बोधी अशा बोधिति एकमेकां, ।
त्यावांचोनी अन्य कांहीं न पाहे, मुख्य ब्रह्माभ्यास तो हाचि आहे. ॥ १८
जैसा आहे देहबुद्धी दृढावो, तैसा झाला पाहिजे ब्रह्मभावो, ।
तो चिन्मूर्ती मानवी वेषधारी, त्याला नाहीं जन्ममृत्यादि वैरी. ॥ १९
हे वाक्यवृत्ति गुरु शंकर बोलिलाहे, जो तेथ वृत्ति पसरोनि तदर्थ पाहे, ।
अभ्यासिं ती स्थिति धरोनि अखंड राहे, तो या जगीं विचरतां शिवराम होये. ॥ २०

---

१. वृति+इतरे+अनुदित+वृत्ति+मध्यें. एकवृत्ति उत्पन्न झाल्यानंतर तिचा लय होऊन दुसरी वृत्ति उत्पन्न होईपर्यंत मधला जो काळ त्यामध्यें. २. बुद्धीच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली कल्पना. ३. निह्याळून, न्याहाळून, रेखून. ४. हें भुजंगप्रयातवृत्त आहे. या दुसऱ्या चरणांत छंदोभंग होतो. ५. केणें=विकावयाचा पदार्थ. ६. येथें पहिले दोन चरण भुजंगप्रयाताचे व शेवटचे दोन मालिनीवृत्ताचे आहेत. चरणांत दोन ठिकाणीं व वरील चरणांत एक ठिकाणीं छंदोभंग झाला आहे. ७. दृढाव=दृढभाव. ८. वेरझारा.

## [1]संतराजकृत

## २३. चिंतानिवारण[2] ग्रंथ.

### प्रकरण पहिलें.

(अभंग.)

'ॐ नमो केशवे परब्रह्म माये ! । मजकडे पाहे विश्वरूपे ! ॥ १
विश्वरूपें तूंचि अवघा संपूर्ण । आतां मीतूंपण कोठें आहे. ॥ २
आहे नाहींपण तूंचि तूं आपण । दृश्यद्रष्टाभान कैचें तेथें. ॥ ३
येथें तुजवीण विवर्ण[3] बोलतां । नये नये आतां ऐसें जालें. ॥ ४
जालें तें मावळलें होणें नाहीं तूज । म्हणोनि विश्वबीज म्हणितां नये. ॥ ५
न येतां तूं ठाव मुक्तासी मिरासी[4] । तूंचि जगदाभासीं येसी जरी. ॥ ६
तरी मुक्त तेही विश्वरूप जाले । ज्ञानें पैं नासले काय येथें ? ॥ ७
येथें विश्वरूप म्हणतां नये तूज । विश्वाचें हें बीज सांग माया !' ॥ ८
माय म्हणे, 'वत्सा ! सावधान आतां । मूळ तुझी सत्ता कांता तेचि. ॥ ९
तेचि कांता तूज दर्पण[5] जहाली । विश्वरूपें व्याली तुझ्या रूपें. ॥ १०
रूप तुझें सर्व म्हणोनि बोलावें । मायेचें करावें नाम मिथ्या. ॥ ११
मिथ्या विश्व त्याचें बीज त्वां पुशीलें । यालागीं घेतलें माया नाम. ॥ १२
माया नाममात्र विश्व तिचे पिलें । दोहीसही आलें लटिकेपण. ॥ १३
नव्हे निद्रा साच स्वप्नही लटिकें । त्याचें रूप येके ज्ञानें होय. ॥ १४
होय ज्ञानमात्र रूप तुझें पाही । तुजलागीं नाहीं नामरूप. ॥ १५
नामरूप तूझें तुझिया स्वरूपें । दीपप्रभा दीपें निबीड हे. ॥ १६
हेतुमातु[6] येथें दृष्टांत न साहे । सिद्ध तुझें आहे निजरूप.' ॥ १७

---

१. संतराज हा भागानगरकर केशवस्वामीचा शिष्य होय. केशवस्वामी हे रामदास पंचकापैकीं एक होते. या पंचकांत रामदास, रंगनाथ निगडीकर, जयरामस्वामी वडगांवकर, आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर आणि केशवस्वामी भागानगरकर हे पांचजण येतात. संतराजानें हा ग्रंथ शके १६०९ म्हणजे इ० स० १६८७ मध्यें लिहिला. सहाव्या प्रकरणांतील ओवी ६८।६९ यांवरील टीप पहा. २. यांत गुरूचा उपदेश ऐकून शिष्याची चिंता निवारण होऊन त्याला आत्मसाक्षात्कार कसा झाला हें सांगितलें आहे. ३. विवरण, निरूपण. ४. हक्काची जागा. ५. आरशांत जसें पाहणाराचें प्रतिबिंब दिसतें तसें ईश्वराचें जगरूपी प्रतिबिंब सत्तेमुळें भासतें. ६. हेतूची भाषा. कारणाची किंवा दृष्टांताची गोष्ट येथें लागू नाहीं.

निजीं निजरूप चमत्कार जाला । पुन्हा शरण आला लोटांगणीं. ॥ १८
लोटांगणासवें झेलित पावला । हृदयीं आलिंगीला ऐक्यभावें. ॥ १९
भावाभावातीत करुनी ठेवीले । अपरोक्ष दाविलें परब्रह्म. ॥ २०
ब्रह्मानंदतृप्ती अपरोक्ष आत्मा । अपरोक्षभ्रमा दवडीलें. ॥ २१
दवडीलें परी दिसों नाहीं दिलें । कैसें नवल केलें गुरुदेवें. ॥ २२
देव मीच जालों अपरोक्ष आपण । परोक्ष अज्ञान नाहीं नाहीं. ॥ २३
नाहीं आहे भाव अभाव पावले । अपरोक्ष फावलें स्वसंवेद्य. ॥ २४
वेद्य होय कोणा आपण परिपूर्ण । पूर्णअपूर्ण कवण जाणे. ॥ २५
जाणणें तेंचि जाणें नेणणें कांहीं नेणें । याही उभय खूणा आपणची.॥ २६
चिंता निवारीली आकळिले अपरोक्ष । अज्ञान प्रत्यक्ष नाहीं नाहीं. ॥ २७
नाहीं म्हणावया पुरतें कैचें बापा ! । आकाशीं पैं पुष्पा बोलों नये. ॥ २८
नये पैं अज्ञान तुजमाजी बोलता । वेगळें ठेवीतां नये कोठें. ॥ २९
कोठें दोरसर्प वेगळा करावा । अथवा धरावा आपणांत. ॥ ३०
आंत ना बाहेर सांपडेल विखार । दोरचि साचार सर्पभाव. ॥ ३१
वाव जाले जीणें मरणें अज्ञानाचे । उरलें निजाचें रूप एक. ॥ ३२
एक ते अनेक बोलणेंचि वाव । अनेकासी ठाव एकीं नाहीं. ॥ ३३
नाहीं ठाव आतां चिंता कासयाची । तुझ्या स्वरूपाची प्रभा सर्व. ॥ ३४
सर्व रूप तूझें अद्वय चिन्मात्र । नाहीं भवचित्र तूजवीण. ॥ ३५
विनियोग होत जात दीसे कांहीं । निर्मूळ तो पाही दृश्य तूज. ॥ ३६
तुजवरी तूझें होणें जाणें दीसे । तरंग जळमीसें एकवट. ॥ ३७
वटबीजन्याय बीजचि वाढलें । परिणामीं उरलें बीज एक. ॥ ३८
एक तैसे असतां भासे तेथें सर्व । नसतां अपूर्व भासनास. ॥ ३९
भासनास दीसे परोक्ष अज्ञानीं । अपरोक्ष ज्ञानीं मिथ्या जाले. ॥ ४०
झाला अपरोक्ष साक्षात्कार तूज । परोक्ष तो निजभ्रम गेला. ॥ ४१
गेला भ्रम संतकेशवपणाचा । अपरोक्ष साचा केशवची. ॥ ४२

---

### प्रकरण दुसरें.

प्रीति पैं धरावी अपरोक्षज्ञानीं । परोक्षवार्ता कानीं नायकावी. ॥ १ ॥

---

१. प्रत्यक्ष. २. विषार, विष. ३. अनुभवून पाहतां. ४. तुझ्या (स्वरूपा)हून निराळें. ५. संतराव आणि केशवस्वामी या दोन व्यक्ती आहेत असा.

विकळ होती जेथें[1] मुमुक्षु जन पाही । अपरोक्ष नाहीं श्रवण जेथें. ॥ २
नेथें अपरोक्ष आपण आईता । तेथें परोक्षवार्ता व्यर्थ शीण. ॥ ३
न कळे गुरुमुखेंविण आत्माराम । अपरोक्ष परम असे जरि. ॥ ४
जैरि[2] जीव शिव अविद्या वाव । तरी अहंभावनाश नव्हे. ॥ ५
नव्हे अपरोक्ष वृत्तिरूपें ज्ञान । जाणती सज्ञान स्वानुभवी. ॥ ६
स्वानुभवीं भैवीं[3] एकरूप ज्यासी । वृत्तिरूप त्यासी ज्ञान काय? ॥ ७
काय नाहीं त्याचें अपरोक्ष आपण । अपरोक्षज्ञान होय जेव्हां? ॥ ८
जेव्हां अपरोक्ष वृत्ति कैंची तेथें । स्मरणास्मरण जेथें लय होय. ॥ ९
होय अपरोक्ष साक्षात्कार ऐसा । परोक्ष सर्वथा नाहीं नाहीं. ॥ १०
नाहीं शिंणगार[4] पूर्वींच घातला । अपरोक्ष साधिला आत्माराम. ॥ ११
आपणचि साध्य जाणावें आपण । आणिक साधनें न लगती. ॥ १२
गतीनें स्वगती साधावी निश्चिती । वेदांतीं सिद्धांतीं हेंचि बोले. ॥ १३
बोले शिवीं शिव जाणावा निखोळ । साधन विटाळ विचारेंसीं. ॥ १४
सीस[5] जैसें नाहीं राहुसि वेगळें । तैसे हे सगळे विश्वासिया[6]. ॥ १५
याचि देहीं येथें जैसें आहे तैसें । फांवे[7] कृपालेशें आपेंआप. ॥ १६
आपणासी एक आपणचि आहे । साध्य साधन होय आपणची. ॥ १७
चिंतानिवारण अपरोक्षसाधन । परोक्ष नव्हे जाण गम्य कधीं. ॥ १८
कधीं तरि कोणी आपणा नेणता । जाणे अपरोक्षता आपणासी? ॥ १९
सिद्ध हे निजखूण अपरोक्ष असतां । ज्ञानाज्ञानवार्ता वाऊगिया. ॥ २०
यालागिं आपुला दृष्टांत दिधला । विसर आठव जाला आपणचि. ॥ २१
चिन्मात्र व्हावया नलगे साधन । सिद्ध निजखूण गुरुकृपा. ॥ २२
पायधूळी ज्याची लागतां कपाळीं । स्वानंदनव्हाळी नित्य होय. ॥ २३
नित्यानंद नव्हे परोक्ष सर्वथा । अपरोक्ष आईता आत्मरूप. ॥ २४
परात्पर वस्तु नव्हे नव्हे कांहीं । पर अपर पाहीं आपणची. ॥ २५
चित्तचतुष्टय ग्रासूनि उदय । हाचि पैं अव्यय भ्रांतीरूप. ॥ २६
रूप नाम निरसे उर्वरीत ऊरे । हेही साधन बा रे ! काय काज. ॥ २७
काजेंविण मिथ्यारोप अपवाद । कासया प्रसिद्ध सिद्धरूपा. ॥ २८

---

१. परोक्षवार्तेच्या ठिकाणीं. २. जोंपर्यंत जिवशिवही वाव अविद्या आहे. ३. विश्वरूपीं. ४. नामरूपादिक विकार. ५. शीर्ष, मस्तक. ६. स्वस्वरूपीं ज्यास विश्वास आहे त्याला. ७. सांपडे.

पाप आणि पुण्य कैंचा बंधमोक्ष ।....अपरोक्ष करणें काय? ॥ २९
एक सच्चिन्मात्र निरास क्वणाचा । गुरुशिष्य वाचा....गुरु. ॥ ३०
गुरु परब्रह्म प्रकाशी आपणा । आपुलिया खूणा आपणची. ॥ ३१
चिन्मात्रचि स्फुरे चिन्मात्रचि उरे । उभयभागीं वा रे! निजतत्त्व. ॥ ३२
त्वंपद तत्पद शबळ आणि शुद्ध । निवडेना प्रसिद्ध समन्वयें. ॥ ३३
अन्वयस्वरूप[1] वाखाणिले जेव्हां । व्यतिरेक तेव्हां अन्वयरूप. ॥ ३४
रूप अन्वयाचे तोचि व्यक्तिरेक । सुवर्ण लेणें एक द्वैतभावें. ॥ ३५
भावरूप सुवर्ण लेणीया अभाव । अन्वयेसीं वाव व्यतिरेक. ॥ ३६
एक सदा शिव जीव म्हणिजे ज्यासी । आकाश अवकाशीं अभिन्नत्व. ॥ ३७
त्वंपद[2] तत्पद एक असिपद । शबळ शुद्ध, भेद नाहीं नाहीं. ॥ ३८
नाहीं नाहीं जीवशिवपणा वेगळा । चिन्मात्र सगळे परब्रह्म. ॥ ३९
ब्रह्मीं ब्रह्मपण, कासया कारणें? । अखंड रमणें नीजपदीं. ॥ ४०
पदीं पदमय केला अर्थ जाला । वाक्यार्थ फळला आहे तैसा. ॥ ४१
साच केला पण सद्गुरु केशवें । संत जिवेभावें ऐक्यपदीं. ॥ ४२

---

## प्रकरण तिसरें.

केशवा! उदारा स्वानंदसागरा । मी तुंजभीतरा पैठा[3] जालों. ॥ १
पैठा झालों परी तुझे जे तरंग । साधु अंतरंग सखे माझे. ॥ २
माझे सखे मज प्रगट दावावे । करिन जिवेंभावें निंबलोण. ॥ ३
नमितों वारंवार तुझे मी चरण । तूं तव दयाघन बापमाय. ॥ ४
मायबाप बंधु गणगोत सर्व । अपर आणि पर मज तूंचि. ॥ ५
तूंचि साधुरूप जालासि म्हणूनि । वळखावया खाणी[4] जाली मज. ॥ ६
मज साधुचिन्हें सांग विवंचूनि । जेणें जनीं वनीं वळखों येती. ॥ ७
यति ब्रह्मचारी सिद्ध साधु फार । परि साक्षात्कार दुर्लभ कीं. ॥ ८
दुर्लभ ते साधु सुलभ ते होती । ऐसी कृपामूर्ति! कृपा कीजे. ॥ ९
कृपेनें द्रवला कृपेचा सागर । साधुरत्नाकर उचंबळला. ॥ १०
लाहूनियां निजानंद साधुजन । निजरूपीं निमग्न सर्वकाळ. ॥ ११
काळवेळ त्यासी नाहीं जगद्भान । स्वरूपदर्शन अखंडीत. ॥ १२

---

१. संबंधरूप. २. तत्त्वमसि=तत्+त्वम्+असि=तें तूं आहेस. ह्याच भागांतील पृ० १४२ टीप पहा. ३. तुजमध्यें प्रविष्ट झालों, मिळून गेलों. ४. खूण.

खंडण पडाया पुरते नाहीं दृश्य । जाले समरस[1] क्षेराक्षर[2]. ॥ १३
क्षर तें अक्षर अक्षर तें क्षर । विकारी आकार देखती जे. ॥ १४
तेचि देहातीत निर्वाण पावले । जिवन्मुक्त जाले साधुजन. ॥ १५
नव्हे जीवशीव तेंचि उदया आलें । चिन्मात्र हें जालें विश्व तयां. ॥ १६
याति कुळकर्म भ्रमाची रहाटी । पूर्वपरिपाटी संपादीती. ॥ १७
तिनी कांडें वेद विरुद्ध नव्हती । सर्व संपादीती वेदवाणी. ॥ १८
निरामय निराकारता संचली । परि व्यक्ति धरिली सहज लीला. ॥ १९
लीलाविग्रहधारी ईश्वर प्रत्यक्ष । उद्भवस्थिति पक्ष दोन्ही जाणे. ॥ २०
जाणे सर्वरूप व्यवहारींचे करूं । तैसाचि संहारु होय नव्हे. ॥ २१
नव्हे तेंचि नव्हे होय तेंचि होय । होय आणि नोहे भिन्न नेणे. ॥ २२
नेणणें जाणणें स्वरूपेंचि पाहे । स्वरूपेंचि होय भोग्य भोग. ॥ २३
गाय गीत नाचे स्वरूप पहात । त्रिपुटी[3]सहीत आपणची. ॥ २४
चित्त चैतन्य जाहलें स्वानंदें डुल्लत । जाहला एकांत सर्वांठायीं. ॥ २५
वर्तमानदेहीं देहभाव नाहीं । स्वानंदमदें पाहीं विसरला. ॥ २६
लागला स्वानंद गोड घास····। म्हणोनि येणें नाहीं देहावरी. ॥ २७
रिता ठाव नाहीं स्वानंदें कोंदला । भूगोल आटला सूखमात्रीं. ॥ २८
त्रिविध हे काया त्रिगुणेसि नेणें । जिता ब्रह्म होणें हेची खूण. ॥ २९
खूण समाधीची नित्य निर्विकल्प । उपजेना संकल्प कर्माकर्मीं. ॥ ३०
मीच ब्रह्म पूर्ण दृश्य सत्य नाहीं । सविकल्प पाहीं नाम तीचें. ॥ ३१
चेतची निजणें त्रिपुटिभोगांत । त्रिपुटीची मात आठवेना. ॥ ३२
नांव निर्विकल्प पूर्ण हे समाधि । सुखदुःख आधीं कधीं नेणें. ॥ ३३
नेणणें जाणणें एकवट नांदे । स्मरणास्मरणभेदें दुखवेना. ॥ ३४
नाहीं सुखभोग त्रिकाळ उगडा(?) । स्वानंदाचा लुगडा (?) पहूडत. ॥ ३५
तळीं धरणी गोड वरी गगन सुखाचे । मध्यें गोडगोडाचे प्रांत नाहीं. ॥ ३६
हिंडता स्वानंदडोल्हारा[4] डोलत । बैसतां निर्जे घेत आनंदाची. ॥ ३७
चिदानंद घन सत्ता मात्र पाहीं । द्वैताद्वैत नाहीं उरलें तया. ॥ ३८
याचिलागीं आतां साधूचा विश्राम । साधितो परम साधूराव. ॥ ३९
वर्णवेना महिमा साधूचा कवणा । कोण जाणे खूणा मूकीयाच्या. ॥ ४०
चारीसाहीजणें[5] अठराहि भांडती । त्यांचीही पैं गती नाहीं येथें. ॥ ४१

---

१. एकरस, एकवट, ब्रह्मरूप. २. विनाशी आणि अविनाशी. ३. ज्ञान, ज्ञाता, ज्ञेय; ध्यान, ध्याता, ध्येय; ह्यांस त्रिपुटी म्हणतात. ४. झोंप. ५. चार वेद, सहा शास्त्रें आणि अठरा पुराणें.

येथें रागद्वेष हर्षामर्ष गेले । तेच्चि पैं पावले परमानंद. ॥ ४२
परमानंद ख्रूण **चिंतानिवारण** । **संत केशवि** ज्ञान भोगीतसे. ॥ ४३

---

**प्रकरण चवथें.**

'जे कोणी अष्टांग योग संपादीती । तेहि पैं नेणती साधुसुखा. ॥ १
खानपानक्रिया वर्जितां न कळे । तीर्थें तपें मेळे ऐसें नाहीं. ॥ २
नाहीं दृश्य निरसे शास्त्राचेनी बळें । म्हणतां न टळे संवसार. ॥ ३
सांडुनिया दृश्य नेति मुखें पाहीं । तेथें स्थिर राही गुरुमुखें. ॥ ४
गुरुवीण आन दैवत भेटतां । साधनीं शिणतां कैंचें सुख ? ॥ ५
सुखासी कारण सद्गुरूचे पाय । सुखाची पैं माय गुरुकृपा. ॥ ६
पायचि वंदावे हृदयीं धरावे । स्वानंद हा फावे येणें द्वारें. ॥ ७
येणें द्वारें ख्रूण सुखाची दावीली. । साधि तूं आपूली जन्मभूमी. ॥ ८
मीपणावेगळा होई लवकरी । तूंपणा बाहेरी करूनीया. ॥ ९
याति अभिमान सांडूनिया देई । निज सुख घेई, मुक्त होसी. ॥ १०
शीतळ होई वेगें, तापों नको तापें । अवघें स्वरूपें पाहे विश्व. ॥ ११
विश्व हें चिद्रूपेंविण तो न भासे । चिन्मात्रचीं असे विचारीतां. ॥ १२
तारकासि आतां अनन्यभावें भजें । पावसी सहजें समाधान. ॥ १३
नरदेह पावन दवडूं नको वायां । साधीं शिष्यराया! आत्मज्ञान. ॥ १४
ज्ञानाहूनि पर साधन असेना । संसारच्छेदना खड्ग हेंची. ॥ १५
चिरकाल विचारी अखंड साधन । असंभावना शून्य मननें करीं. ॥ १६
रिता ठाव नको देवाविण देखों । मन नको राखों देवावीण. ॥ १७
न करी अन्यथा बुद्धीचा निश्चय । मग मन चिन्मय होउनि टाके. ॥ १८
केल्या मनन होय चिन्मय हा लोक । असंभावनाशोक दूरी तेव्हां. ॥ १९
तेव्हांचि विश्वास आस्तिक्य भावाचा । मनें काया वाचा ब्रह्म मीच. ॥ २०
मीच ब्रह्म ऐसा विश्वास थांबला. । संभावित जाला गुरुवाक्यें. ॥ २१
गुरुवाक्यासी तो विश्वास बैसेना । ते असंभावना ओळखावी. ॥ २२
विपरीत भावना देहीं अहंपणा । वर्णाश्रम भिन्न रूपनाम. ॥ २३
नामरूप ध्यास मोडाया उपावो । निशिदिनीं ध्या हो! अखंड देव. ॥ २४
जें जें दिसे डोळां तें तें आत्माराम । स्थावर जंगम इत्यादीक. ॥ २५
कल्पना सांडोनि सृष्टि हे वंदावी । धारणा धरावी आत्मारामीं.' ॥ २६
आत्मारामख्रूण वळखूनि **संत** । मग काय बोलत गुरूप्रती. ॥ २७

प्रतीती पैं माझी ऐकावी ती देवा! । तव कृपा केशवा जाली मज. ॥ २८
मजवीण देह अन्यथा असेना । सुवर्णभूषणा भेदू काय. ॥ २९
एक [1]चामीकर नाना अळंकारीं । तैसें चराचरीं माझें रूप. ॥ ३०
रूप माझें सत्य ज्ञानानंदघन । ब्रह्मांड भरूनि उर्वरीत. ॥ ३१
उर्वरीत परी गगन पोकळ । मी नित्य निर्मळ सच्चिद्घन. ॥ ३२
घन तरी कां हो! विश्वभास भासे । भान मात्र असे म्हणोनीयां. ॥ ३३
उणी पुरी एथें गोष्टी नाहीं कांहीं । प्रवेशाप्रवेश पाहीं बोलों नये. ॥ ३४
एक जळ जैसें तरंग जहाले । परि काय संचलें तरंगांत. ॥ ३५
आंत बाहेर एक जळचि सघन । प्रवेशाप्रवेश शून्य येणें रीती. ॥ ३६
येणें रीती असे भावना पळाली । भावना गळाली विपरीत. ॥ ३७
रिते बोल आतां कासयासी पाही । दृश्य द्रष्टा नाहीं भिन्नभाव. ॥ ३८
भावरूप आत्मा अभाव दृश्याचा । ऐसा स्वरूपाचा निजध्यास. ॥ ३९
सद्गुरुचें वाक्य त्याचें केलें मनन । तें निजध्यासन होऊनि ठेलें. ॥ ४०
ठेलें जैसें तैसें होऊनि आईतें । आपणापरतें न दिसे आतां. ॥ ४१
आतां साक्षात्कारीं पहुडलों निवांत । दुजयाचा सांगात मज नाहीं. ॥ ४२
नाहीं मज आन आश्रय कवणाचा । अद्वय मी साचा अपरोक्ष. ॥ ४३
अपरोक्षज्ञान हेचि माझी खूण । सुख सनातन भोगीतसें. ॥ ४४
भोगीतसे परी सांगतां मज नये । सद्गुरूनें काय केलें नेणों. ॥ ४५
केलेंसे नेणण्या जाणण्या परतें । स्वरूप आईतें दावूनीयां. ॥ ४६
निजानंदघन नामरूपशून्य । ऐसे निरंजन अनुभवले. ॥ ४७
अनुभवले एक अनेक मावळले । येथें जे चावळले तेचि वेडे. ॥ ४८
वेडे केशवकृपेंवीण वायां गेले । ते चिंतूं लागले दृश्य पापी. ॥ ४९

---

## प्रकरण पांचवें.

पीवळे ढवळे काळे आणि नीळे । तेज मुक्ताफळें सुमनाकार. ॥ १
रंग नानापरी देहांत दिसती । चक्राचिये गती देहरूप. ॥ २
रूप जें जें भासे तें तें दृश्य शून्य । अविनाश पूर्ण रूप माझें. ॥ ३
माझें रूप दृश्य नव्हे नव्हे सत्य । साक्षी सदोदीत दृश्य कैसा? ॥ ४
साक्षी कवणाचा दृश्य नाहीं नाहीं । परिपूर्ण पाहीं मीच एक. ॥ ५

---

१. सोनें.

एकपणा ठाव नाहीं ऐसें जालें । ब्रह्मांड हें गेलें विलयासी. ॥ ६
विलयासी काय असोनियां गेलें । नाहीं तेंचि जालें नाहीं आतां. ॥ ७
आतां आत्मसूखाविण दुजें कांहीं । मज उरलें नाहीं विषयसूख. ॥ ८
सुखाचा सुर्वाडा दुःखाचा दुर्वाडा । फावला अखंड सूखभोग. ॥ ९
भोगु भोक्ता भोग्य नासुनी त्रिपूटी । सुखाची रहाटी सर्वकाळ. ॥ १०
काळ वेळ नाहीं निजात्मसुखासी । कालत्रय प्रासी ऐसें सूख. ॥ ११
सुखाचें वसन सुखाचें आसन । सुखाचें बैसणें सुखरूप. ॥ १२
सुख देणें घेणें सुखही हरणें । ऐसें सुख घेणें सुखरूप. ॥ १३
रूप तें अरूप परि सच्चिद्रूप । ऐसी हे अमूप गुरुकृपा. ॥ १४
गुरुकृपाश्रवण अपरोक्ष केलें । मननही झालें अपरोक्ष. ॥ १५
अपरोक्ष नीजध्यास हा सावला । अपरोक्ष जाला साक्षात्कारू. ॥ १६
जाला साक्षात्कार रूपीं मावळला । स्वानंद कोंदला आपोआप. ॥ १७
आपोआप सिद्ध सुखलाभ जाला । मननेंसि आटला निजध्यास. ॥ १८
संत म्हणे आतां केशव चिन्मात्र । विश्वसुख मात्र तुझी कृपा. ॥ १९
कृपेचा महीमा सांगावा कवणासी । तुझा तुजपाशीं निवेदीला. ॥ २०
निवेदिलें जैसें सागरा लवण । तैसें अहंपण तुझ्याठायीं. ॥ २१
पायीं पदमय होउनि राहीलों । मी नाहीं उरलों केशवराजा ! ॥ २२
केशवराज कृपासिंधु उचंबळले । बाहु पसरीले खेंवालागीं. ॥ २३
लगबग जाली पूर्वेच्या सागरा । मज जाला सामोरा पश्चिमेसी. ॥ २४
सिद्ध आलिंगनु उभयतां जालें । माजी हें विरालें जगद्भान. ॥ २५
जगद्भान संतकेशवीं दिसेना । ऐक्य उमसेना ऐसें झालें. ॥ २६
जालें सुख आतां उतराई जालासी । आपुली मिरासी बळकावीली. ॥ २७
बळकाविलें निज पूर्वजा आनंद । येथें रंग बोध सुखी झाले. ॥ २८
सुखी झाले तुझें परिसोनिया ज्ञान । सहज बोध पूर्ण ओसंडलें. ॥ २९
ओसंडले जगन्नाथ महामुनि । तुज पैं देखोनि सुखरूप. ॥ ३०
सुखरूप जाले नृसिंहभारती । तुज संतमूर्ति अवलोकूनि. ॥ ३१
अवलोकुनि परिपूर्णरूपा तूज । जाले मुकुंदराज सुखमय. ॥ ३२
सुखमय जाले रामचंद्रमुनि । तुज पैं पाहूनि शुद्धबुद्ध. ॥ ३३

---

१. सुकाळ. २. प्राप्त झाला. ३. आलिंगन देण्याकरितां. खेंव=आलिंगन. ४. जगन्नाथ-नृसिंहभारति-मुकुंदराज-रामचंद्र-हरिनाथ-केशव ही कवीची गुरुपरंपरा असें पुढील अभंगावरून दिसतें.

शुद्धबुद्ध मुक्त नित्य हरिनाथ । स्वानंदभरीत जाले तेही. ॥ ३४
तेहि झाले आतां राहिले कवण । मूळ गुरु पूर्ण आनंदले. ॥ ३५
आनंदले सर्व साधुसंतमूर्ति । वाढविली कीर्ति केशवाची. ॥ ३६

---

**प्रकरण सहावें.**

कीर्ती तुझी देवा! वेदीं वाखाणीली । अंतीं मौनावली वाणी त्यांची. ॥ १
त्यांचे ऐसें मज जाहलें केशवा! । माझ्या अनुभवा जाणसी तूं. ॥ २
'[2]तुझा माझा अनुभव एक खरा । आतां माझी मुद्रा जतन करीं. ॥ ३
करीं घालुनीयां माझी सिद्ध मुद्रा । बैसें निजभद्रासनीं सूखें. ॥ ४
सुखरूप तुज देखुन संतराजा!। भवदुःखी प्रजा शरण येती. ॥ ५
शरण येती लोक अज्ञान नासूनी ।' त्यासि माझी वाणी उपदेशी. ॥ ६
उपदेशुनि देई स्वानंद सहज । अधिकचि मज प्रीय होसी. ॥ ७
होसी धुरंधर तूं कुळटिळक । आपुले व्यापक स्वरुपबोधें. ॥ ८
बोध तुझा परी पूर्ण तेजोराशी । अज्ञानतमासी उरों नेदी. ॥ ९
दीन जन तारी हेचि माझी आज्ञा । तूं तंव सर्वज्ञा जीवन्मुक्त. ॥ १०
जीवन्मुक्त जन विजन न देखे । बंधन नोळखे मुक्ततेसी. ॥ ११
शिण जेथें नाहीं विश्राम कवणा? । आत्मारामीं खूणा जाणवती. ॥ १२
जाणता न जाणे ब्रह्मांडरहाटी । जीवशिव गोष्टी वंध्यापुत्र. ॥ १३
वंध्यापुत्र सर्व साधन संपदा । ज्ञानाज्ञानवादा तेची परी. ॥ १४
परि हें शुद्धज्ञान मुक्ताची संपदा । मुमुक्षासी कदा [3]वंचूं नये. ॥ १५
वंचूनीयां गोष्टी बद्धासि सांगावी । प्रीति धरावी गुरूपायीं. ॥ १६
गुरुपायीं भक्ती जडलियावरी । अद्वैत वैखरी प्रगटावी. ॥ १७
प्रगटावी सोपी वारुनियां भेदा । सूचक आत्मपदा मंदमती. ॥ १८
मंदमतीलागीं श्रवण उपाव । भासे सर्व देव आईकता. ॥ १९
आईकता होय वैराग्यसंपन्न । स्त्रिया पुत्र धन तुच्छ मानी. ॥ २०
मानीं अपमानीं समबुद्धि होय । क्षुद्र दृष्टि जाय भूतमात्रीं. ॥ २१
भूतमात्रीं देव देखे आपणांत । मत्सराचा अस्त होय तेणें. ॥ २२
तेणें गुणें हित आपुलें विचारी । निवृत्ति अंतरीं धरी एक. ॥ २३

---

१. मागील पृष्ठांतील ४ थी टीप पहा. २. हें गुरूचें भाषण. ३. फसवूं नये.

एक आत्मा करी त्रैलोक्याभीतरी । त्रैलोक्याची उरी उरों नेदी. ॥ २४
नेदीं उरी उरों श्रवणाची तत्त्वतां । मननाच्या माथा आरूढोनि. ॥ २५
आरूढोनि निजध्यासाचिये शिरीं । स्वयें साक्षात्कारीं पहुडे सुखें. ॥ २६
सुखीं सुख मात्र दुःख तेथें कैचें? । निजात्मसुखाचें पद प्राप्त. ॥ २७
प्राप्तकाळीं होय सुखाची दिवाळी । सद्गुरुवनमाळीपादस्पर्शें.[1]' ॥ २८
पादपांशुमहिमा[2] नेणति ब्रह्मादीक । संत केशवीं एक तेंचि मागे. ॥ '२९
मागीतला वर पूर्वींच दिधला । आजिचा आगळा लाभ झाला. ॥ ३०
लाभावरी लाभ या ग्रंथश्रवणीं । फिटली शिराणी[3] साधनाची. ॥ ३१
**चिंतानिवारण** ग्रह हा अपूर्व । परंपरा सर्व दाखवीली. ॥ ३२
दाखविलें सर्व मुळीच्या अन्वयें । कार्यकारणन्यायें चूकवूनि. ॥ ३३
उणें पुरें येथें संतीं सांभाळावें । संत केशवीं मिरवे ऐसें कीजे. ॥ ३४
कीजे कृपा स्वामी संत केशवीं म्हणे । आपुलीया खूणें परिपूर्ण. ॥ ३५
पूर्ण ग्रंथ जाला **चिंतानिवारण** । सद्गुरूची खूण प्राप्त झाली. ॥ ३६
लिहीते समयीं विचार सुचेना । सद्गुरूच्या खूणा न्याहाळीतां. ॥ ३७
न्याहाळितां पूर्ण लवकरी देखीलें । तेचि आंगीं भरलें सर्वकाळ. ॥ ३८
काळवेळ नाहीं संचले अद्वय । सुख मात्र होय श्रवणीं श्रोता. ॥ ३९
श्रोता सावधान तरी वक्ता बोलका । येरवीं निजसूखामाजी पडे. ॥ ४०
पहुडलों सुखें चिंता निवारूनि । निजसेजे उन्मनीं आलिंगन. ॥ ४१
आलिंगनेंवीण नवल थोर जालें । प्रकृतिपुरुषा आलें एकपद. ॥ ४२
एक एक वेचे शून्य बिंदु पुसे । अभावचि असे भावरूप. ॥ ४३
भावरूप स्वयें करोनियां खरें । गुरुवाक्यविचारें सदा सम. ॥ ४४
सम शांत मूर्ति गिळोनियां स्फूर्ति । केशवाच्या कीर्ति गाऊं आतां. ॥ ४५
आतां या ग्रंथासी विसंबों ना आम्ही । केशवाच्या नामीं धरुनि प्रीति. ॥ ४६
प्रीति पावो येणें केशवचक्रपाणी । स्वभक्ताची धणी पुरवो तोचि. ॥ ४७
तोचि पैं उद्धरो त्रैलोक्य सगळें । हें काय वेगळें आहे त्यासी. ॥ ४८
सिंहाचा चैंपटा[4] **चिंतानिवारण** । हा भैववारण[5] उरों नेदी. ॥ ४९
उरों नेदी म्हणुनी मुमुक्षीं मागावा । संताचा हा ठेवा जतन कीजे. ॥ ५०
जतन कीजे याचा अर्थ विचारूनि । संतासि पुसोनि भक्तिभावें. ॥ ५१

---

१. सद्गुरु हाच वनमाळी म्हणजे विष्णु त्याच्या पादस्पर्शानें. २. पदरजाचा महिमा. ३. आवड, हौस. ४. बचा. ५. संसाररूपी हत्ती.

भक्तिभावें संत केशवीं विनटला । कृपेनें तुष्टला गुरुदाता. ॥ ५२

दाता हे केशव संत हा मागता । स्वपदीं सरता केला तेणें. ॥ ५३

केला तेणें सर्व जगाचा उद्धार । धरुनि अवतार [1]भागानगरीं. ॥ ५४

भागानगरीं वस्ती कीर्ति देशावरी । स्वसुख शेजारीं पहुडले. ॥ ५५

पहुडते समयीं स्वपदीं अधिकारी । बळात्कारें करी संतदेवा. ॥ ५६

संतदेवासी तो संतोष वाटेना । [2]उभड सांठवेना हृदयांत. ॥ ५७

हृदयींचा उबड बाहेर पडों पाहे । [3]निबुजोनि राहे कंठ तेव्हां. ॥ ५८

तेव्हां कृपाहस्तें केशवें वारीलें । हृदयीं धरीलें आलिंगूनि. ॥ ५९

आलिंगनासवें हृदयीं प्रवेशे । संतामाजी वसे केशवस्वामी. ॥ ६०

स्वामी प्रसादीले हृदयमंदिरीं । [4]क्रोधन संवत्सरीं संतदेवें. ॥ ६१

संतदेवकीर्ति वानावया लागीं । गेले लागवेगीं [5]दशमखंडी. ॥ ६२

दशमखंडीं वास [4]क्षयसंवत्सरीं । मग [6]चंद्रपूरीं स्थिर जाले. ॥ ६३

जाला देशोदेशीं पूर्ण आनंद । पूर्णिमेचा चंद्र देखुनि जैसा. ॥ ६४

देखोनियां अस्त केशवसूर्याचा । जनासी तमाचा धाक होता. ॥ ६५

तंव संतचंद्र उगवे तेजोराशी । अज्ञानतमासी ठाव कैंचा? ॥ ६६

कैंचा क्षय, संत चंद्र परिपूर्ण । **चिंतानिवारण** प्रभा त्याची. ॥ ६७

[4]प्रभव संवत्सरीं ग्रंथाचा प्रभव । जाला संतदेवमूखें पूर्ण. ॥ ६८

[4]शालिवान शके सोळाशें पैं नव । वोविये केशव वाखाणीला. ॥ ६९

(वसंततिलका)

**चिंतानिवारण** समीरण सूटला हो!
तेणें विशाळ भववृक्ष उफाटला हो; ।
त्यानंतरें सहज चिद्गगनीं विराला,
नारायणासि सुखलाभ यथार्थ जाला. ॥ १

---

१. दक्षिण हैद्राबादेस. २. उमाळा. ३. गोंधळून, दाटून. ४. क्रोधन, क्षय आणि प्रभव हे संवत्सर अनुक्रमें शके १६०८,१६०९ आणि १६१० मध्यें येतात, म्हणून ६८ आणि ६९ या ओंव्यांतील प्रभव आणि शके १६०९ यांचा मेळ बसत नाहीं. ५. काशीक्षेत्रांत नवखंड पृथ्वी आणि दहावें खंड काशी. ६. हैद्राबादेजवळचा चंद्रघाट?

## व्यंकटकविकृत[1]

## २४. श्रीयोगवासिष्ठसारसमश्लोकी टीका.

( अनुष्टुप्छंद. )

### प्रकरण पहिलें.

ॐ नमो श्रीअनिर्वाच्या परमानंदविग्रहा ।
सच्चिदानंद ! अनंगा (?)षड्गुणैश्वर्यभूषणा ! ॥

१. हा कवि गोमांतकांतील आनंदसांप्रदायी सारस्वत ब्राह्मण असावा. याची गुरुपरंपरा सहजानंद–ब्रह्मानंद–आनंदनाथ–मंगेश–आत्माराम अशी कवीनेंच आपल्या 'वेदस्तुती'वरील 'श्रुतिदीप' नांवाच्या टीकेंत दिली आहे. प्रस्तुत प्रकरणाच्या शेवटीं 'दुंदुभिनाम संवत्सरे श्रावण मासे शुक्लपक्षे दशमी रविवासरे अनुराधानक्षत्रे लेखक नारायणस्य पुस्तकं–श्रीमंगीशमहालक्ष्मीप्रसादो भव' असा लेख आहे. त्यावरून हा लेखनकाल शके १७२४ (९ जुलई १८०२) ठरतो. याच कवीची 'उत्तरगीते'वरही एक समश्लोकी टीका आहे. २. श्रीरामचंद्र सुमारें सोळा वर्षांचे असतां त्यांनीं 'माझ्या मनांत देश पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे, याजकरितां मला तीर्थयात्रा करण्याची आज्ञा मिळावी' म्हणून आपला पिता दशरथ राजा याची प्रार्थना केली. त्यावरून त्यानें श्रीरामचंद्रास तीर्थयात्रेस जाण्यास आज्ञा दिली. त्याप्रमाणें श्रीरामचंद्र तीर्थयात्रेच्या निमित्तानें सर्व देश पाहून परत आले व आपल्या मंदिरांत कालक्रमणा करूं लागले. परंतु तेव्हांपासून त्यांच्या मनाची स्थिति अगदीं वेगळ्या प्रकारची झाली. राजपुत्र असल्यामुळें त्यांना सर्व उपभोग्य वस्तूंची अनुकूलता असे व त्यांचा ते यापूर्वी उपभोग घेत असत, परंतु आतां त्यांस त्यांपैकीं एकापासूनही सुख होईना असें झालें. खाणेंपिणें देखील विशेष आवडेनासें झालें. सेवकजनांशीं भाषणही बहुतेक वर्ज्य केलें. सर्वकाळ खिन्न होऊन एकांतांत बसूं लागले. ही त्यांची अवस्था सेवकांनीं दशरथ राजास निवेदित केली. दशरथ राजानें त्यावरून श्रीरामचंद्रास भेटीस बोलाविलें. श्रीरामचंद्रांनीं येऊन पित्यास वंदन केलें व पित्यानें त्यांस वामांकावर बसवून 'रामभद्रा! तुला काय पाहिजे व तुला काय वाटतें?' असें विचारिलें. त्यावरून त्यांनीं उत्तर दिलें कीं 'मला कांहीं नको. मला एकांतीं बसून कालक्रमणा करावी असें वाटतें.' हें ऐकून दशरथास फार खेद झाला व याला काय उपाय करावा अशी त्यास मोठी चिंता उत्पन्न झाली. इतक्यांत विश्वामित्रमुनि दशरथ राजाच्या भेटीस आले. राजानें त्यांचा योग्य आदरसत्कार केला. त्या वेळेस मखसंरक्षणाकरितां त्यानें दशरथाजवळ रामास मागितलें. तें त्यानें मोठ्या संकटानें मान्य केलें. आणि आपल्या पुत्राची सर्व अवस्था निवेदन करून त्याचा कांहीं तरी परिहार करावा म्हणून विश्वामित्राची प्रार्थना केली. त्यावरून 'तुला असें खिन्न होण्याचें कारण काय?' म्हणून विश्वामित्रांनीं श्रीरामास विचारिलें. श्रीरामांनीं हें सर्व विश्व क्षणभंगुर आहे व त्यांतील सर्व विषय व त्यांपासून होणारें सुख हें सर्व तुच्छ आहे म्हणून यांच्या ठायीं माझें मन रमत नाहीं व मला सुख कसें प्राप्त होईल ही चिंता

त्यामध्यें नित्यमुक्तत्वें ऐश्वर्यादिक षड्गुण ।
हेमालंकार हे युक्त बिंबोपाधिक शुद्ध जे ॥ २
सर्वज्ञत्वाद्यलुप्तत्व वाच्य तत्पद षड्गुण ।
द्वितीयैश्वर्य सामर्थ्य तेंचि वस्त्रें सुशोभित ॥ ३
उत्पत्तिनिधनत्वादि तपोसामर्थ्य षड्गुण ।
तृतीयैश्वर्य तें पुष्पें नानाळंकृत उत्तम ॥ ४
एवं त्रीषड्गुणैश्वर्यें भगवद्गुणमंडित ।
तेंचि अळंकार वस्त्रें पुष्पें सोपाधिलक्षणें ॥ ५
ऐसा निरूपाधि तोचि सोपाधि बिंबअन्वयें ।
सद्गुरूनाथ सर्वात्मा आत्माराम सदाशिव ॥ ६
लयपालनउत्पत्ती सुषुप्तिस्वप्नजागृती ।
एवं तत्त्वंपदैक्यत्वें त्रयावस्था त्रिवाहनें ॥ ७
शिबिका गज वा अश्व जैसीं हीं त्रयवाहनें ।
समष्टिव्यष्टिरूपत्वें आत्माराम तसा रुढे ॥ ८

उत्पन्न झाली आहे' असें सांगितलें. हें ऐकून हा ज्ञानास अधिकारी झाला आहे असें पाहून त्याला ज्ञानोपदेश करण्याविषयीं त्याचा कुलगुरु श्रीवसिष्ठ यास सूचना केली. त्यावरून श्रीवसिष्ठमुनींनीं रामास ज्ञानोपदेश केला, तो या ग्रंथांत आहे. उपदेशाचा प्रसंग मनांत आणिला म्हणजे असें समजतें कीं ज्ञानाचा अधिकार येण्यास वैराग्य हें आवश्यक आहे. हा मूल संस्कृत ग्रंथ वाल्मीकिकृत मोठा आहे. त्याची श्लोकसंख्या ३२००० आहे. त्याचीं १ वैराग्य, २ मुमुक्षुव्यवहार, ३ जगदुत्पत्ति, ४ जगत्स्थिति, ५ जगल्लय आणि ६ निर्वाण म्हणजे मोक्ष अशीं सहा प्रकरणें आहेत. याचाच संक्षेपरूपानें 'लघुयोगवासिष्ठसार' म्हणून संस्कृत ग्रंथ आहे. त्याचीं १ वैराग्य, २ जगन्मिथ्यात्व, ३ जीवन्मुक्तलक्षण, ४ मनोलय, ५ वासनोपशमन, ६ आत्ममनन, ७ आत्मशुद्धि, ८ आत्मार्चन, ९ आत्मनिरूपण, आणि १० शून्याशून्ययोग म्ह० निर्वाण, अशीं दहा प्रकरणें आहेत. त्या 'लघुयोगवासिष्ठसारा'ची श्लोकसंख्या २२५ आहे. त्यावर ही 'समाक्षरी' नामक टीका आहे. यांत संगतिश्लोक ३९४, टीकाश्लोक २२३ व दशम प्रकरणाचे अंतीं 'अवतारिका' श्लोक ७५, एकूण श्लोक ६९२ आहेत. ३. विग्रह=शरीर. ४. ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य हीं प्रत्येकीं समग्र ज्याला आहेत तो षड्गुणैश्वर्यसंपन्न. येथून पुढें चार श्लोकांत आपल्या गुरूचें षड्गुणैश्वर्यपर वर्णन करण्याचा कवीचा बेत दिसतो, पण तें वर्णन स्पष्ट समजत नाहीं.

१. विश्वांतील प्रत्येक पदार्थाची वेगळी वेगळी कल्पना करणें यास व्यष्टि म्हणतात आणि सर्व पदार्थांची समुदायरूपानें कल्पना करणें यास समष्टि म्हणतात. उ० वेगळे वेगळे आम्रवृक्ष हें व्यष्टिवन आणि समुदायरूप आम्रवृक्ष हें समष्टिवन.

एवं अनिर्वाच्य तोचि भक्तानुग्रहलक्षणीं ।
सवाच्य होउनी वर्ते अनन्यत्वें तया नमो ॥ ९
नमनावांचुनी अन्य पूजोपचार सर्वही ।
अर्पिले तरिही देव संतुष्ट न घडे कधीं ॥ १०
म्हणोनि वाक्य कीं ऐसें **'वंदनांतोपचारकं,'** ।
तेंही वंदन भेदत्वें करितां न प्रसन्नता. ॥ ११
**'अनन्याश्चिंतयंतो मां'** म्हणोनि वाक्यसंमत ।
श्रीकृष्णें अर्जुनालागीं **गी**तेमाजी प्रबोधिलें. ॥ १२
तसेंच **शि**वगीतेंत **रा**मीं श्रीशिवही वदे, ।
**'तस्मात्सर्वात्मना राम! भक्तिं कुर्यादनन्यधीः'** ॥ १३
एवं अद्वैतभक्तीनें सर्वात्मा **राम** सद्गुरू ।
अनन्यभावना वंदूं व्याप्य व्यापक जो तया. ॥ १४
वस्तुत्वें ईश्वरत्वेंही तोचि चैतन्य चाळक ।
बिंबत्वें प्रतिबिंबत्वें तेव्हां सहज ऐक्य तो. ॥ १५
म्हणोनि जीवशीवैक्य तत्वमस्यार्थ गुह्य हें ।
बोलिला वेद तें स्पष्ट सद्गुरूत्वेंचि दावितो. ॥ १६
यालागीं सद्गुरू साक्षात् **आ**दिनाथ, **स**दाशिव, ।
**आ**त्माराम अशा नामें अवतार धरोनियां. ॥ १७
बोधूनि तारक ब्रह्म तारी या भवसागरीं ।
कीं जे प्रत्यक्ष **का**शींत **वि**श्वनाथ जगद्गुरू. ॥ १८
उपदेशी अंतकाळीं उजवे श्रवणीं जिवां ।
तेव्हांचि पावती मोक्ष निगमागमसंमत. ॥ १९
ऐसें सामर्थ्य बोधाचें बोलिलें श्री**स**दाशिवें ।
मंत्रमाहात्म्यही साक्षात् विश्वात्मा तोचि सद्गुरू. ॥ २०
गुरुरूपचि हें विश्व तेव्हां विश्वास वंदन ।
परंतु तारतम्येंही अवतार धरी **ह**री. ॥ २१
तशा विभूति मुख्यत्वें ब्रह्मज्ञ भुवनत्रयीं, ।
सुरासुर ऋषी योगी मुनि तापसि सर्वही. ॥ २२

१. काशीमध्यें अंतकाळीं श्री**वि**श्वेश्वर जीवास तारक मंत्राचा उपदेश करितो तो उजवे कानांत करितो म्हणून काशीक्षेत्रामध्यें मरतेवेळीं सर्व प्राणी डाव्या अंगावर पडतात व त्यांचा उजवा कान वरील बाजूस होतो ही गोष्ट प्रसिद्ध आहे.

श्रीदत्त, शुकयोगीही, वसिष्ठ, व्यास, वाल्मिक, ।
नारदादि संतवृंद आचार्य कवि संस्कृत. ॥ २३
कवि प्राकृत जे संत सर्वही गुरुरूप हे, ।
विलोकितां ग्रंथ ज्यांचे प्रसादें ब्रह्म लाभतें. ॥ २४
वंदूं तयां अशेषांतें भक्तभाविक सज्जनां ।
जयांच्या वंदनें साक्षात् कृपानुग्रह होउनी. ॥ २५
व्यंकटाख्यात्मता बुद्धी स्वयें नाथें प्रकाशुनी ।
योगवासिष्ठसाराची टीका समाक्षरी करी. ॥ २६
वसिष्ठरामसंवाद योगवासिष्ठसागर ।
असंख्य त्यामधें सार दहा अध्याय अमृत. ॥ २७
भारतीं भगवद्गीतासार जें मंत्ररूप तें ।
श्रीकृष्णें अर्जुनालागीं बोधिली जेंवि त्यापरी. ॥ २८
असंख्यनाद वाद्यांचे त्यामधें बीजरूप ते ।
दशधा[१] भेदरूपत्वें अनाहताख्य बोलिजे. ॥ २९
तैसा हा योगवासिष्ठ उपदेशाख्य वाग्ध्वनी ।
त्यामाजी सार गुह्यार्थ दहा अध्याय बोलिजे. ॥ ३०
वेदांतोपनिषद्भाग रहस्य अति अद्भुत ।
त्याची समाक्षरी टीका मंदधीतें कशी घडे ? ॥ ३१
परंतु स्वप्रकाशात्मा राम, सांब, सदाशिव ।
प्रकाशी जडबुद्धीतें सबाह्यांतर बोधवी. ॥ ३२
सूर्यकांतीं निघे अग्नी अर्कयोगें जशापरी ।
अथवा चुंबकासंगें जड तें लोह चेष्टतें. ॥ ३३
ऐशा अनेक दृष्टांतें श्रीगुरूचें महत्त्व तें ।
न वर्णवेचि कल्पांतीं विधिशेषादिकांसही. ॥ ३४
'को वेत्ति भूमन्भगवन्' ऐसें ब्रह्मस्तुतीमधें ।
श्रीमद्भागवतीं ब्रह्मा दशमस्कंधीं बोलिला. ॥ ३५
तस्मात् अनिर्वाच्य ज्याचें स्वरूप तें न वर्णवे ।
महत्त्वही अनंतत्वें अलक्षत्वें न वर्णवे. ॥ ३६
एवं तो स्वप्रकाशत्वें सूत्रधारक होउनी ।

---

१. दहा प्रकारचे.

बोधवी जडबुद्धीतें तेव्हां काय न होय तें? ॥ ३७
समष्टिरूप बिंबात्मा राम तो सद्गुरु स्वयें ।
समस्त व्यष्टिबुद्धीतें प्रतिबिंबास चेष्टवी. ॥ ३८
म्हणोनि येथ कर्तृत्वीं अभिमानी नसे दुजें ।
कर्ता कारयिता साक्षात् आत्माराम सदाशिव. ॥ ३९
वेदांत गुह्य हा अर्थ गुरुशिष्योपदेश जो ।
पारंपर्यरक्षणार्थ वसिष्ठ राघवीं वदे. ॥ ४०
वस्तुता राम सर्वात्मा बिंबात्मा विश्वव्यापक ।
उपदेश वृथा तेथें परंतु धर्मरक्षणा. ॥ ४१
करावी म्हणुनी शिष्य स्वयें होऊनी प्रवृती ।
चालवी तोचि गुह्यार्थ अंतरीं सूक्ष्मबुद्धिनें. ॥ ४२
बोधतां तत्क्षणीं नासे अज्ञानतमभ्रांति हे ।
ऐसे श्लोकप्रकाशार्क योगवासिष्ठसारिं या ॥ ४३
त्याची समाक्षरी टीका जेथूनि श्लोक तेथुनी ।
आदीं प्रकरणांतीं ही वेगळी अवतारिका. ॥ ४४
कोठें पद पदार्थातें कांहीं तात्पर्य मात्र ही ।
बोलेल भगवान् तेथें संगतिश्लोक हे पृथक्. ॥ ४५

---

श्रीवसिष्ठ उवाच—**दिक्कालादिकिं अच्छेदा! चिन्मात्रानंत व्यापका!** ।
**स्वानुभूतिस्वरूपैका शांततेजोरुपा! नमो.** ॥१॥
बद्ध मी मुक्त व्हावें हा असे निश्चय ज्यासि तो ।
न अती अज्ञही तज्ज्ञ तो शास्त्रीं अधिकारि या. ॥ २
परेशापासुनी साक्षात् अनुग्रह न होय जों ।
न लाभे तों स्वतां कोणा सच्छास्त्र सद्गुरूहि वा. ॥ ३
ब्रह्मज्ञ गुरुसेवेनें भवाब्धितरणी बरी ।
सद्युक्ति लाभते रामा! तारकास्तव नावसी. ॥ ४
कोण मी कवणाचा हा संसार सुविचार जो ।
त्याच दिव्यौषधज्ञानें संसाररोग नाशतो. ॥ ५
फळ वा शीतळ छायायुक्त पादप सज्जन ।
तत्वज्ञ ज्या स्थळीं नाहीं न तेथ वसिजे दिन. ॥ ६
सेवावे संत ते नित्य जरी न उपदेशिती ।

ज्या कथा स्वेच्छ त्यांच्या त्या उपदेशचि होति ते. ॥ ७
अपमृत्यू शून्य जें तें संपत् अमृतपूर्णता ।
सत्संगें होतसे कीं हें सुख सच्चित्रयात्मक. ॥ ८
ज्ञान्यांचेंही चित्त एका स्वसुखींच जडे तरी ।
जाती शरण तैं कोणा जीव संसारदुःखित. ॥ ९
तें ज्ञान तोचि शास्त्रार्थ तत्प्रबोध अखंडित ।
सच्छिष्याला विरक्ताला साधु जें उपदेशितो. ॥ १०
क्रमोपदेश जो रामा! संप्रदायचि रक्षणा ।
प्रबोधी मुख्य तों शुद्ध शिष्यप्रज्ञाचि केवळ. ॥ ११
शास्त्रें वा गुरुदीक्षेनें न दिसे परमेश्वर ।
स्वप्रकाशेंचि स्वात्मा हा स्वसत्वामतिनें दिसे. ॥ १२
अनभ्यासेंचि शास्त्रादि नाशती सर्वही कळा ।
एकदां लाभल्या वाढे जीवां अंतरिं चित्कळा. ॥ १३
असे वस्तु स्वकंठींही ते अलभ्य भ्रमें जसी ।
भ्रमांतीं लाभते तद्वत् आत्माही गुरुउक्तिनें. ॥ १४
स्वात्मसुख न जाणे तो जन हा दैववर्जित ।
विषयीं सुखसें मानी परिणामीं विषान्नसें. ॥ १५
विषयीं अतिदुःखत्व जो कळूनीहि दुर्मती ।
तद्भावना पुन्हा भावी न हा नरकि तो खर. ॥ १६
किंचित् केल्याहि संकल्पें नर दुःखांत बूडतो ।
निःशेषकल्पनात्यागें होतो स्वसुख अक्षय. ॥ १७
होतो स्वप्नमुहूर्तेंही संवत्सरशतभ्रम ।
तसा हा जागृती होतो भ्रम मायाविलासही. ॥ १८
अंतर्शीतळ बुद्धीनें रागद्वेषविमुक्त जो ।
साक्षिवज्जग हें पाहे त्याचें सार्थक जीवित. ॥ १९
ग्राह्य त्यागार्थ संकल्पत्यागें चित्सुख जाणुनी ।
अंतरीं स्थिरचित्तें जो त्याचें सफळ जीवित. ॥ २०
देहनाशें तदात्माख्य योगमात्रचि नाशतो ।
आत्मा नासे अशा शंके शोकी होती वृथा जन. ॥ २१
घटादिकीं [1]उदोनाशीं जसें नभ अखंडित ।

---

१. (घटादिकांचा) प्रादुर्भाव किंवा नाश झाल्यावर. उदो=उदय, प्रादुर्भाव.

तसा देही व्यापकात्मा सदा अलिप्त तद्गुणीं. ॥ २२
न जन्मे न मरे आत्मा कोठें कांहीं कदापिही ।
मृषा जग विवर्तत्वें[1] ब्रह्म एक प्रकाशतें. ॥ २३
नभाहुनिहिं विस्तीर्ण सूक्ष्म सच्चित्सुखार्णव ।
आत्मा जडोर्मियोगें तो **राम**! जन्मे मरे कसा. ॥ २४
सर्व हें मी एक शांत आदिमध्यांतवर्जित ।
अस्तिनास्ति न जेथें तें ऐसें मानूनि हो सुखी. ॥ २५
चांडाळगृहिंही **रा**मा! हातीं खापर घेउनि ।
भिक्षार्थ फिरणें श्रेय परि मौर्ख्यें न जीवणें. ॥ २६
आपद्वा[2] व्याधिविषही न तसें अन्य भूतळीं, ।
दुःखदातें जसें देहीं स्वमूर्खत्व घडे नरां. ॥ २७
**यो**गवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी वदे ।
**व्यं**कटाख्यमुखें **आ**त्माराम **सां**ब **स**दाशिव. ॥ २८

प्रकरण दुसरें.

पूर्वप्रकरणारंभीं जाणाया तत्व केवळ ।
शिष्यप्रज्ञाचि ते मुख्य ऐसें **रा**मीं प्रबोधिलें. ॥ १
कीं शिष्यें स्वहितालागीं जें साधनचतुष्टय ।
बोलिलें त्या रितीयुक्त वर्तावेंचि निरंतर. ॥ २
तेव्हां जिज्ञासु तो होय मग आपण कोण हें ।
जाणावें हेचि उत्कंठा लागते अति तत्पर. ॥ ३
तैंचि सद्भावही होय सद्गुरुत्वीं खरा दृढ ।
तेव्हां जें सद्गुरू सांगे तेंचि शिष्यास बोधतें. ॥ ४
या भावें बोलिला गुह्य आदेशयुक्त वाक्य हें ।
कीं ऐसा नाचरे तैं हें बोलिलें व्यर्थ जातसे. ॥ ५
पुढां दावील हा भाव **'त्वयि भस्मनि हूयते'**।
म्हणोनि वाक्य कीं भस्मीं होमिलें सारिखें घडे. ॥ ६
तस्मात् खापर जें तापे बरवें तैं तयावरी ।

१. दृष्टीच्या भ्रमामुळें जें दिसतें त्याला विवर्त म्हणतात. जसें—मृगजळ. त्याप्रमाणेंच ब्रह्माच्या ठिकाणीं जग भासतें म्हणून जग हा विवर्त होय आणि ब्रह्मास विवर्तोपादान म्हणतात.
२. आपत्=विपत्ति.

भाजे भास्कर सर्वांतें अन्यथा वा रडे कळे. ॥ ७
तैसीच शिष्यप्रज्ञाही साधनें निर्मळा तरी ।
बोधिले अर्थ ते चित्तीं बाणतां पूर्णता घडे. ॥ ८
तस्मात् लाभालाभदोष गुरुत्वीं हा घडेचिना ।
म्हणोनि बोलिलीं वाक्यें वसिष्ठें राघवाप्रती ॥ ९
दृढता साधनाचीही व्हावी म्हणुनि केवळ ।
वैराग्य बोधिलें कीं हे विश्वविषय नैश्वर. ॥ १०
स्वप्नवत् पाहुनी यांतें आत्मा शाश्वत जाणिजे ।
येविशीं लागुनी सर्व भिक्षा ते मागणें बरी. ॥ ११
ऐसा बोलून निर्धार आत्मानात्मविचार तो ।
जाणावा म्हणुनी तेचि वैराग्य दृढता करी. ॥ १२
कीं मिथ्या निश्चयें विश्व ऐसें अनुभवासि ये ।
तैं स्वयें स्वस्वरूपात्मा सत्य शाश्वतसा कळे. ॥ १३
या भावें बोलतों रामीं वसिष्ठ हे समाक्षरी ।
टीका तेथूनियां चाले संगतिश्लोक हे पृथक्. ॥ १४
मनाच्या नियमें पावे संसारभ्रम शांतता ।
निश्चळता मंदरीं तैं क्षीराब्धि स्थिरता जशी. ॥ १
चित्ताच्या निमिषोन्मेषें संसाराचा लयोद्भव ।
वासना वा प्राणरोधें निर्विकल्प करी मन ॥ २
संसार स्वविकल्पीं हा भासे त्या विस्मृतिक्षयें ।
नासे निःसार संसार दग्ध ऐसा न संशय. ॥ ३
चित्रसर्पपरिज्ञानें नासे सर्पत्वभ्रांतिही ।
जसें तैसाचि संसार नासे स्वात्मत्व लक्षितां. ॥ ४
स्वकल्पनात्मतामोहें अनादि भवबागुल ।
मृषा परी दुःख देतो ब्रह्मज्ञानेंचि नासतो. ॥ ५
रामा! हे यापरी माया जे स्वनाशेंचि हर्षदा ।
ईचा स्वभाव लक्षेना लक्षितां नाश पावते. ॥ ६

---

१ विस्मृति=विस्मरण, क्षय=नाश, आपण कोण या गोष्टीचें विस्मरण होणें याला अज्ञान म्हणतात त्याचा क्षय म्हणजे नाश.

आश्चर्य बापा कीं चित्रा माया हे विश्वमोहिनी ।
जन्ही सर्वांग व्याप्तात्मा जिणें स्वात्मत्व नाकळे ॥ ७
जें हें दृश्य दिसे कहीं न तें किमपि निश्चयें ।
जसें गंधर्वनगर जसें जळ मरुस्थळीं. ॥ ८
समीपही असोनी जें कांहींही न दिसे परी ।
अक्षय तें नित्य आहे सच्चिदात्माचि तो स्वयें. ॥ ९
मुखस्वभाव आदर्शीं मृषाही प्रतिबिंबती ।
नामरूपात्मका वस्तु नदींत तटवृक्षसे. ॥ १०
चिद्रूपात्मक हा सर्ग चित्स्वानुभवें नाशतो ।
ब्रह्मविस्मृतिनें होतो दोरी सर्पभ्रमें जसा. ॥ ११
अज्ञानजन्य जो बंध दृढ भोगस्पृहेन[1] तो ।
होय जैं वासनाशांति बंधही तुच्छ तैं जगीं. ॥ १२
परमात्मा व्यापक जो स्थीर त्यास्तव हें मन ।
उपजे अस्थिराकार तरंग सागरीं जसे. ॥ १३
मन जें कल्पितें स्वेच्छा सदा तत्काळ तैं मृषा ।
तेणें हे इंद्रजालश्री विश्वत्वें होय जागरीं. ॥ १४
जसा बागुल बाळांतें मृत्युपर्यंत दुःखद ।
मृषा परी सत्यसा तैं अज्ञानास तसें जग ॥ १५
सुवर्ण नेणत्या हेमीं तदाकारीं नगीं जसी ।
आकृतीच सत्य वाटे न हेममति स्वल्पही. ॥ १६
अज्ञानां दृश्य हें तसें गृहग्रामादि गोचर ।
हेचि दृष्टि असे अन्य न कधीं परमार्थधी. ॥ १७
अज्ञाना हें दुःखमय जग ज्ञात्यास सौख्यद ।
अंधा भुवन तें अंध, डोळसा सुप्रकाशवत्. ॥ १८
सहजें निर्मळाकाशीं अभ्रमंडळ होउनी ।
लय होय जसें तैसें आत्मत्वीं जग सर्व हें. ॥ १९
ब्रह्मादित्यान्वयें जेणें विश्वरश्मीस भाविल्या ।
ब्रह्मात्मार्कचि त्या त्याला बोलिजे निर्विकल्प तो. ॥ २०
विचारें होतसे जेंवि पट तो तंतुमात्रची ।

1. भोगस्पृहा=भोगाची इच्छा.

सच्चित्सुखात्म तन्मात्र विचारें विश्व हें तसें. ॥ २१
चित्सुधाब्धींत उल्हासे विश्ववीचि विलास हा ।
तेथेंचि लयही पावे मध्यें कैसा अतन्मय. ॥ २२
न जळापासुनी भिन्न फेनोर्मिहिमबुद्बुद ।
तसें भिन्न न तें विश्व आत्म्यापासूनि उद्भवे. ॥ २३
आत्म्याचपासुनी विश्व आत्मत्वीं लयही तसा ।
मातींत कुंभ लहरी जळीं हेमीं जसे नग. ॥ २४
आत्मविस्मरणें भासे जग तत्स्मरणें[1] नसे ।
रज्जू न कळतां सर्प भासे तत्प्रत्ययीं नसे. ॥ २५
आत्मप्रत्यय नाहीं त्या भ्रांति तों स्थिरता जगा ।
ईश्वरास्तव जे रामा! होय रज्जु भुजंगसे. ॥ २६
जागृतींत नसे स्वप्न स्वप्नींही जागृती नसे ।
जन्माठायीं नसे मृत्यू मरणीं जन्मही नसे. ॥ २७
एवं ना तें भ्रमें भासे सदसत्कार्य कारण ।
या ब्रह्मानुभवें किंचित्सर्व तत्काळ तद्रुप. ॥ २८
योगवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी वदे ।
व्यंकटाख्यमुखें आत्माराम सांब सदाशिव. ॥ २९

## प्रकरण तिसरें.

पूर्वप्रकरणीं रामीं वशिष्ठ स्पष्ट बोलिले ।
जगन्मिथ्यात्वदृष्टांतें ज्ञाताज्ञानहि बोलुनी. ॥ १
अज्ञानें बंध वा ज्ञानें मोक्ष ऐसा द्विधारुप ।
मनोकल्पित हे माया मृषा हेंही निरूपिलें. ॥ २
तस्माद्विलास हा सर्व चिदात्मसागरीं स्फुरे ।
मुरे वा त्यामधें ऐसा वस्तुस्वभाव जाणुनी. ॥ ३
निर्मळांतःकरणें जो स्वरूपीं लक्ष ठेवुनी ।
लोकीं लोकां असा वर्ते स्वधर्मभक्तियुक्त जो. ॥ ४
तो जीवन्मुक्त बोलावा त्याचीं चिन्हें स्थिती कशी ।
तें या प्रकरणीं बोले वसिष्ठ राघवाप्रती. ॥ ५

---

१. तत्=आत्मा. स्मरण=आठवण.

तेथूनि चालवी श्लोकीं टीका समाक्षरी स्वयें ।
पृथक् कांहीं चूर्णिकाही आत्माराम सदाशिव. ॥ ६

सर्वाशातृण जें जाळी आत्मज्ञानचि एक तें ।
समाधिशब्दें बोलावें न मौन स्वरुपस्थिती. ॥ १

चिद्रूप जग हें सर्व ऐसें लक्षूनि अंतरीं ।
राहे जो स्थीर तो शांत ब्रह्मरक्षकही सुखी. ॥ २

सर्वातीतपदीं ऐक्य पूर्णेंदुपरि शीतळ ।
अंतरींच सदा योगी राहे तो परमेश्वर. ॥ ३

ब्रह्मोपनिषदीं तत्व जो भावी हृदयीं मनें ।
हर्षशोकीं लिप्त नोहे संसारीं तोचि निर्भय. ॥ ४

जळत्या पर्वतीं जैसे मृगपक्षी न राहती ।
भयादि दोष हे ज्ञात्या कधीं नातळती तसें. ॥ ५

असंतसे संतही ते कोपवीती परा नरा ।
स्वानुभवस्थितीचा हा परिपाक पहावया. ॥ ६

कांपणें न सुटे जैसें रज्जुसर्प कळोनि ही ।
अज्ञानमोहनाशें ही आत्मत्वीं दैवभुक् तसे. ॥ ७

रंगोनि प्रतिबिंबत्वें रंगीं स्फटिक निर्मळ ।
तसा कर्मफळीं ज्ञाता बिंबात्मत्वें अलिप्त तो. ॥ ८

अंतर्मुख स्वरूपीं जो शांत तो बाह्यवृत्तिही ।
श्रांतत्वें सर्वदा वर्ते तऱ्ही निद्राळुसा दिसे. ॥ ९

वासनाशांति चित्तींही अद्वैतीं स्थैर्य पावलें ।
योगिये करिती कर्म पाहात स्वप्नसें जग. ॥ १०

आजची मृत्यु येऊ वा जिवों (वा) कल्पांतकोटिही ।
तद्दोषां नातळे ज्ञानी पंकींही शुद्ध हेमसें. ॥ ११

त्यजूं काशींत देहातें चांडालसदनीं हि वा ।
गतस्पृहा निजज्ञानप्राप्तिकाळींच मुक्त हा. ॥ १२

त्रैलोक्य तृणवत्[१], मेरु स्थाणु, पृथ्वीहि गोपदा[२] ।
रामा! आकाश मुद्रासें नैराश्ययुक्त त्या नरा. ॥ १३

---

१. जमिनीवर गाईचें पाऊल उमटून त्यांत पाणी सांठून झालेलें डबकें. २. लहान गाठोड्यासारखें.

अंतर्बाह्य द्वैतशून्य शून्य कुंभ नभीं जसा ।
आत्मा अंतर्बाह्य पूर्ण पूर्णकुंभ जळीं जसा. ॥ १४
अंतर्वस्तु सुखी दृष्टी त्या इष्टानिष्टही नसे ।
निद्रितापरि जो वर्ते ऐसा तो मुक्त बोलिजे. ॥ १५
अहंत्यागी न संदेह जीवन्मुक्त स्वभावता ।
वर्ततांही शांतरूपीं चित्रदीप असा असे. ॥ १६
लीलेनें त्यागुनी राहेऽहंकारमयि वासना ।
अहंब्रह्महि जो ग्रासी जीवन्मुक्तस्वरूप तो. ॥ १७
दूरीं टाकित अंधकापरि सुहृद् संगास सर्पापरी
त्रासे जाणत भोग रोग समजो कीं सत्सुखी अंतरीं. ।
निंदी स्त्रीसमुदाय जो तृण असा, मित्रीं अमित्रीं सम
ज्याचें चित्त असे परत्र इहही तो मुक्त सर्वोत्तम. ॥ १८
त्यागुनी दृश्य संकल्प वासना शांतबुद्धि जो ।
निर्मळाकाशवत् स्वस्थ मुक्त तो परमेश्वर. ॥ १९
सर्व ब्रह्मात्ममति तो कर्में न करु वा करू ।
न आशा मनिं तो मुक्त जो शुद्धात्मैक्यभक्तिनें. ॥ २०
अनात्मत्वीं आत्मधी तो बंध तन्नाश मोक्ष तो ।
आत्म्यास नित्यमुक्ताही बिंबा न बंध मोक्षही. ॥ २१
दृश्य नाहीं अशा बोधें मनापासूनि हे मृषा ।
जरि ऐसें कळे तेव्हां घडे मोक्षैक चित्सुख. ॥ २२
नाहीं मोक्ष नभोलोकीं पाताळीं वा न भूतळीं ।
तृष्णाक्षयीं लिंगदेहक्षय तो मोक्ष बोलिजे. ॥ २३
निर्विकल्पैकरूपीं जो अनंतानंद चिद्घनीं ।
स्थैर्य द्वैत नसे तेथें बद्ध तो कोण मुक्त वा. ॥ २४
तस्मात् ज्ञातृत्व तादात्म्य क्रियत्व बंध या त्रयें ।
होय तन्नाश तैं रामा ! आत्मावशेष मोक्ष तो. ॥ २५
योगवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी करी ।
व्यंकटाख्यमुखें आत्माराम सांब सदाशिव. ॥ २६

---

पूर्वप्रकरणीं बोले श्रीरामीं श्रीवसिष्ठ हें ।
कीं जीवन्मुक्त तो सारे प्रारब्धभोग भोगितो. ॥ १

परंतु विषयीं बाधा वासनेनें घडे न त्या ।
वर्ततो निस्पृहत्वें तो म्हणोनी मुक्त तो सदा. ॥ २
होऊनि निजबिंबात्मा प्रतिबिंबावलंबुनी ।
भोगितो भोग प्रारब्ध तो जीवन्मुक्त बोलिजे. ॥ ३
म्हणिजे देहभावाची न लागे वासना तया ।
जरी लोकां असा वर्ते तऱ्ही अंतरिं निस्पृह. ॥ ४
देहाचा जन्म वा मृत्यु मिथ्या मानुनि निर्भय ।
अंतरीं होउनी सर्व ब्रह्मात्मत्वचि पाहतो. ॥ ५
बंध वा मोक्ष हे दोन्ही शुद्धात्मत्वीं नसेचि कीं ।
मनोकल्पीत म्हणुनी जीवन्मुक्तत्वही तसें. ॥ ६
शुद्धात्मत्वीं न जीवत्व तेथें बद्धत्व तें कसें? ।
जेथें बद्धत्व नाहीं तें मुक्तता म्हणणें मृषा. ॥ ७
तस्मात् बद्धत्व, मुक्तत्व, जीवन्मुक्तत्व सर्व हें ।
मनोकल्पित आद्यंतीं मन तें स्वरुपीं नसे. ॥ ८
जऱ्हि सोपाधि बिंबत्वें नित्य मुक्तत्व बोलिलें ।
तऱ्हि तो साक्षि व्यापात्मा निर्लेपत्वें मनोजयीं. ॥ ९
कर्तृत्वोपाधि त्या नाहीं तेणें सापेक्ष धर्म त्या ।
कांहींच लागेना ऐसा सत्तास्वभाव वस्तुचा. ॥ १०
म्हणोनि निर्लेप साक्षी व्यापकात्माच ईश्वर ।
सोपाधि म्हणणें तें हें उपाधिस्तव भासणें. ॥ ११
नगाच्या विकृतीयोगें हेमपीतत्व भासणें ।
त्वंपदाकृतिच्या योगें तसें ब्रह्मत्व भासणें. ॥ १२
जे सत्ता केवळ ब्रह्मीं निर्धर्मत्वीं स्वभावता ।
असे तेचि सधर्मत्वीं ईश्वरत्वीं प्रकाशते. ॥ १३
म्हणोनि नित्य मुक्तत्व बोलिजे ईश्वरा तया ।
म्हणिजे जीवभावाचा बंध मोक्ष नसे तया. ॥ १४
म्हणोनि साक्षिव्यापात्मा निर्लेपत्वेंचि ईश्वर ।
त्वंपदीं स्वप्रकाशत्वें जीवधर्मास चाळक. ॥ १५
सापेक्ष धर्म त्या नाहीं नित्य मुक्तत्व यास्तव ।
सापेक्ष धर्म तो अंगीं जीवाच्याच म्हणोनिया. ॥ १६

सापेक्ष धर्मयोगें हें बंधमोक्ष घडे द्वय ।
सापेक्ष धर्म म्हणिजे त्वंपदात्मकवृत्तिनें. ॥ १७
अवस्थात्रयसाक्षित्व होणें तें त्वंपदात्मक ।
वासनाजीवबंधत्वत्यागें मुक्तत्व बोलिजे. ॥ १८
तोचि साक्षी त्वंपदात्मा त्वंपदात्मकवृत्तिनें ।
त्रयावस्थाहि विश्वत्वें अन्वयें व्यापक स्वयें. ॥ १९
व्यतिरेकान्वयें साक्षी व्यापक द्वयलक्षणें ।
हें सापेक्षधर्मयुक्त जीवत्वीं मुक्तलक्षण. ॥ २०
सापेक्षधर्म हा नित्यमुक्तत्वीं न घडे कधीं ।
जऱ्ही व्यापक साक्षित्व नित्यमुक्तींहि बोलिलें. ॥ २१
तऱ्ही निर्लेप तें तेथें सापेक्ष धर्म तो नसे ।
निर्लेप म्हणिजे ऐसें कीं जो स्वभाव ब्रह्मिचा. ॥ २२
प्रपंचाकार वस्तुत्वें होणें मागुति तल्लय ।
करणें ब्रह्म निर्धर्मीं जे सत्ता तेचि ईश्वरीं. ॥ २३
सोपाधि धर्मयोगींही निर्लेपत्वें प्रकाशक ।
झालियास्तव नित्यमुक्त सधर्मब्रह्म बोलिजे. ॥ २४
हेमपीतत्व सत्तेनें नगाचा ग्राह्य त्याग तो ।
होतो निर्लेप तैसा हा नित्यमुक्तत्वि ईश्वरा. ॥ २५
व्यापकत्वेंचि ग्राह्यत्व साक्षित्वें त्यागणें असे ।
द्विधा निर्लेप हें रूप प्रपंचवर्तनीं घडे. ॥ २६
जीव अज्ञानरूपी वा ज्ञानरूपीहि होउनी ।
प्रपंचीं वर्ततो तेथें सत्ता निर्लेप ते असे. ॥ २७
त्याच ईश्वरसत्तेनें प्रपंचीं जीव वर्ततो ।
सत्तेवांचूनि न घडे कांहींही जीववर्तन. ॥ २८
परंतु जीवसापेक्ष धर्म त्या ईश्वरीं नसे ।
म्हणोनि बंध वा मोक्ष जीवाचा घडला तरी. ॥ २९
जीवाच्या बंधमोक्षींही सत्ता समान ईश्वरीं ।
म्हणोनि त्याच निर्लेप सत्तेनें जीव वर्ततो. ॥ ३०
जऱ्ही चिदंश तो जीव तऱ्ही भोक्ताच केवळ ।

१. त्रय=तीन गोष्टी. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ति ह्या तीन अवस्था.

स्वसत्ता ते जिवीं नाहीं त्वंपदात्मक यास्तव. ॥ ३१
अविद्या त्वंपदोपाधि त्रिगुणात्मक ते असे ।
ज्ञातृत्व क्रियत्व आणि तादात्म्य त्रिविधा रुप. ॥ ३२
जडरूप अविद्या हे तीतें सत्ता न यास्तव ।
प्रतिबिंब जीव तोही तीतें तादात्म्य पावला. ॥ ३३
तीच्या पराधीनपणें सत्ता निःशेष जाउनी ।
पुरूष लक्षणांयोगें भोक्तृत्व मात्र पावला. ॥ ३४
या भोक्तृत्ववासनेनें जीवाचा बंध बोलिजे ।
भोक्तृत्ववासना त्यागी तेव्हां जीवास मुक्तता. ॥ ३५
सापेक्षज्ञानसाक्षित्वें जीवाचा मोक्ष बोलिजे ।
जऱ्ही गुरुत्वसत्तेनें ईश्वरें मोक्ष देइजे. ॥ ३६
तऱ्ही तो नित्यमुक्तात्मा स्वसत्तेनेंचि घेउनी ।
त्वंपदोपाधिवृत्तीतें गुरुत्वें मोक्ष दावितो. ॥ ३७
तस्मात् सापेक्षज्ञानाच्या त्वंपदोपाधिवांचुनी ।
न घडे मोक्ष देणें तें तत्पदात्मक ईश्वरीं. ॥ ३८
यालागीं तत्पदात्मा तो नित्य मुक्तचि ईश्वर ।
साक्षिव्यापक या चिन्हें त्वंपदींच प्रकाशला. ॥ ३९
त्वंपदोपाधिसापेक्ष ज्ञान त्या तत्पदीं नसे ।
परि तत्पद बिंबात्मा निर्लेप नित्यमुक्त तो. ॥ ४०
सधर्मत्वें स्वसत्तेनें त्वंपदोपाधिअन्वयें ।
भासतो चित्स्वरूपत्वें नित्यमुक्त द्विलक्षणें. ॥ ४१
उपाधिसंग जैं नाहीं तैं निरूपाधि केवळ ।
बोलिजे ब्रह्म निर्धर्म नित्य मुक्तत्व तें नसे. ॥ ४२
तस्मात् सधर्म निर्धर्म ब्रह्म एकचि हें परी ।
सधर्म उपाधींसंगें निर्धर्म निरुपाधिक. ॥ ४३
उपाधिचा योग मात्र यास्तौं सधर्म बोलिजे ।
सधर्में नित्यमुक्तत्व भासे चिद्लक्षणान्वित. ॥ ४४
तस्मात् तो बंध वा मोक्ष जीवात्म्यासचि बोलिला ।
नित्यमुक्तीं नसे दोन्ही स्वरूपींही न केवळ. ॥ ४५
पूर्वप्रकरणीं हेंचि बोलिला गुह्य उत्तम ।

त्याचा भावार्थ संक्षेपें दाविला वाक्य तें असें. ॥ ४६
‘अनात्मत्वीं आत्मधी तो बंध तन्नाश मोक्ष तो ।
आत्म्यास नित्य मुक्ताही बिंबा ण बंध मोक्षही.’ ॥ ४७
जीवन्मुक्तत्व बोलोनि अंतीं हें वाक्य बोधिलें ।
तेथें त्रिधा अभिप्रायें गुह्यार्थ दाविला असा. ॥ ४८
कीं बंध मोक्ष जीवत्वीं सापेक्षज्ञानलक्षणें ।
बोलिजेतें, नसे दोन्ही नित्यमुक्तत्व ईश्वरीं. ॥ ४९
कीं तो निर्लेप म्हणुनी बिंबात्मा स्वप्रकाशक ।
चकारें स्वस्वरूपींही निरुपाधिकि ते नसे. ॥ ५०
एवं त्रिधा अभिप्रायें अर्थीं दृष्टांत तो असा ।
कीं निर्धर्म सूर्य तोचि निरुपाधिक ब्रह्म तें ॥ ५१
प्रकाशत्वें सधर्मार्क तो नित्यमुक्त ईश्वर ।
अर्कांश नेत्र तो जीव बंध मोक्ष तया असे. ॥ ५२
कीं मृगांबु वासनेनें लक्षी ते जीवबद्धता ।
मृगांबु मिथ्या तत्साक्षी होणें ते जीवमुक्तता. ॥ ५३
एवं मृगांबु वा नेत्र त्याचें द्विधाहि देखणें ।
न लागोनि प्रकाशार्कीं त्या निर्लेप प्रकाशितो. ॥ ५४
तोही प्रकाशत्वधर्म निर्धर्मार्कीं न केवळीं ।
ऐसें असोनि तो अर्क वस्तुत्वें सर्वही घडे. ॥ ५५
ऐशा दृष्टांतयोगें जें संक्षेपयुक्त बोलिलें ।
विस्तारें तें गुरूक्तीनें त्रिधा स्वरूप जाणिजे. ॥ ५६
तस्मात् जीवीं बंध मोक्ष मनोकल्पीत जैं तधीं ।
तदुपाधिकसंबंधें जीवन्मुक्तत्व ही तसें. ॥ ५७
नित्यमुक्तत्व निर्लेप परि तेंही सधर्मक ।
तेव्हां सोपाधिसंबंध तेथें नसोनि लागला. ॥ ५८
ऐशा सोपाधिसंबंधें नित्यमुक्तत्वही तसें ।
मनोकल्पीत मन तें निर्धर्म स्वमुखीं नसे ॥ ५९
या भावें बोलतों आतां कीं निःशेष मनोलय ।
होईल तैं आत्मसिद्धी सत्सुखांबुधिची घडे. ॥ ६०

तो हा मनोलयो जेथें श्लोक तेथूनि चालवी ।
टीका समाक्षरी कांहीं चूर्णिकाही जगद्गुरू. ॥ ११

---

'स्वतःस्वभाव हा युक्त कीं अवीट स्वचित्स्थिती ।
आत्म्यास्तौं होय संकल्पें तेचि येथें मनोरुप. ॥ १
महात्मा हा परंज्योति षड्गुणी व्यापकास्तव ।
मनोशक्ति पृथक्.जैसी जळास्तौं लहरी निघे. ॥ २
तस्मात् संसारमाळा हे ज्या संकल्पेंचि होय ते ।
तन्नाशें नाशते जेंवी वन्हिज्वाळाहि वायुनें. ॥ ३
स्वल्पही स्वविसरें या संकल्पेंचि मनोद्भव ।
जसा स्वमृत्यु स्वप्नींही लक्षितांही न जागरीं. ॥ ४
अनात्मत्वीं आत्मभाव मृषा दर्शन होय जें ।
सत्यत्व तन्मृषत्वीं जें मन तें जाण राघवा ! ॥ ५
हा देह तो मि, हें माझें ऐसा संकल्प तें मन ।
न मी देहादि कीं मिथ्या जें विचारेंचि नासतें. ॥ ६
प्रतिकूळानुकूळत्वें विषयीं ग्राह्य त्याज्य जें ।
तें मनोरूप हें सर्व बंध तो जाण बाऽन्यथा. ॥ ७
जगाचा कर्ता मन जें तेंची पुरुष बोलिजे ।
मनें केलें तेंचि केलें देहें केलें न तें कृत. ॥ ८
चित्त कारण अर्थाचें तदर्थात्मक त्रीजग ।
अर्थनाशें विश्व नासे यत्नें तेंचि चिकित्सिजे. ॥ ९
वासनेनें बद्ध रामा ! मुक्त निर्वासना मनें ।
अर्थी निर्वासना तस्मात् विवेकें शीघ्र संग्रहीं. ॥ १०
अभ्रें मळिण तो चंद्र, मषीनें तें चुनेगृह, ।
नरांचे दोषिते तैसें चित्त आशापिशाचिका. ॥ ११
अंतर्मुख मनें सर्व ब्रह्माग्नींत जगत्तृण ।
होमीं त्या अंतरीं रामा ! चित्तादि भ्रम नासती. ॥ १२
ग्राह्य त्याज्य पदार्थींतें मिथ्या जाणूनि त्यागुनी ।
वासना न स्मरे कांहीं तेव्हां चित्तलयो घडे. ॥ १३

---

१. चुन्याच्या योगानें पांढरें दिसणारें घर.

स्थूळत्वें जागरीं चित्त वर्ते स्वप्नांत वृत्तिक ।
सुषुप्तींत निर्विकल्प शुद्धात्मत्वीं न स्फूर्तिही. ॥ १४
समळ जळीं [1]कतक घातल्या मळ नासतो ।
आत्मत्वीं मन हें तैसें लयें निर्मुक्त जाण तें. ॥ १५
चित्तची जाण संसार बंधही चित्त बोलिजे ।
चळतो पवनें वृक्ष देह चित्तें चळे तसा. ॥ १६
हस्तपादादि सर्वांगें तदात्मत्वेंचि दंडुनी ।
जिंतूनि वासना आधी स्वाधीन मन तें किजे. ॥ १७
[2]स्वाधीनवर्ति जें चित्त एक जैं कां न जिंतवे ।
न लाजे मूढ कां लोकीं ध्यानवार्ताच जो वदे. ॥ १८
एकचि तो मनोदेवजय सर्वार्थसिद्धिद ।
त्या जयावीण सर्वांचे श्रम निर्फळ जाणिजे. ॥ १९
जो अवीट प्रियद्वात्र परेचें मूळ त्याहुनी ।
वर्ते; मनोजया अन्य त्रैलोक्यजयही तृण. ॥ २०
सत्संग, वासनात्याग, अध्यात्मज्ञाननिर्णय, ।
प्राणायामादि हे चारी यत्न श्रेष्ठ मनोजयीं. ॥ २१
चित्तीं पूर्णत्व तैं सर्व जग पूर्ण सुधारसें ।
[3]वाहाणायुक्त पादांतें भूमि चर्मावृता जसी. ॥ २२
न मी ब्रह्म अशा ज्ञानें दृढत्वें बंध पावतें ।
सर्व ब्रह्म अशा ज्ञानें निश्चयें सुटतें मन. ॥ २३
त्यक्त आशा [4]जीतचित्तीं द्वैत नासूनि ऐक्य तें ।
उरे परब्रह्म शांत नित्य निर्दोष व्यापक. ॥ २४
ब्रह्मात्मभावप्राप्तातें जन्ममृत्यु मनोचिता ।
जो होय परमानंद उपमात्रा [5]कैशान हा. ॥ २५
योगवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी करी ।
व्यंकटाख्यमुखें आत्माराम सांबसदाशिव ॥ २६

---

१. कं (जलं) [शुद्धं] तनोति. गढूळ पाणी शुद्ध करणारें बीं, निवळी. २. आपल्या ताब्यांत वागणारें. ३. वाहाणा, चेपल्या. ४. जिंकलेलें. ५. कशानें.

प्रकरण पांचवें.

पूर्वप्रकरणीं बोले चतुर्थीं जो मनोलय ।
तेथें कळायुक्त आत्मा निर्धर्मत्वेंचि बोधिला. ॥ १
कीं मनोलय हा जेथें तत्वावस्था न कांहिं ही ।
निर्निमित्त प्रियात्मा तो तेथें निर्धर्म वस्तुता. ॥ २
ऐसा निर्धर्म जो आत्मा तोचि होऊनि व्यापक ।
अन्वयें सर्व ब्रह्मैक्य तेथें चित्त लयंगत[1]. ॥ ३
कराया साधनें चारी सत्संगादीक बोलिलीं ।
तेणें मनोजयो साधे तैं स्वकार्यार्थसिद्धता. ॥ ४
मनोजयो असा तो कीं सर्वही सुख इच्छिती ।
स्वसुखांबुधिचा अंश मन जीवोर्मि यास्तव. ॥ ५
अथवा मीनरूपत्वें मन केवळ बोलिजे ।
स्वसुखांबुविना त्याचें जीवणें न घडे कधीं. ॥ ६
वस्तुत्वें भरतें आलें कीं विश्वात्मक चिद्रुप ।
तेथें काळेंचि विस्मृती होते ते जळिं शुष्कता. ॥ ७
विस्मृतीशुष्कतायोगें सर्वात्मांबु असोनिया ।
नाकळे मनमीनातें तैं देहात्मत्व भावुनी. ॥ ८
जळांश कर्दमीं तैसा विषयीं स्वसुखांश तो ।
सेवितो वासनायोगें परि तो लघु नैश्वर. ॥ ९
अनेक साधनें केलीं सकामें तरिही सुख ।
अनंतत्वें सांपडेना सद्गुरूचे कृपेविना. ॥ १०
पर्जन्य सद्गुरू तोचि कृपेनें वर्षतो तेधीं[2]. ।
पृथ्वीतळ जळें पूर्ण तें सर्वात्मक चित्सुख. ॥ ११
विषयीं वासनात्यागें कर्दमेच्छा त्यजी तई ।
अनंत स्वसुखाब्धीची घडे प्राप्ती मैनोमिना[3]. ॥ १२
निर्वासनाबळें जेव्हां स्वसुखांबुधिप्राप्तता ।
झाली तेव्हां तदंशाचा लय होय मनोमिना. ॥ १३
अनंत स्वसुखांबूची प्राप्ती झाली खरी तधीं ।
वासना उपजे कैसी कीं तेथें त्रिपुटी नुरे. ॥ १४

१. लयास गेलेलें, लीन झालेलें. २. तेव्हां. ३. चित्तरूप मीन म्ह० मत्स्य त्यास.

हे न होनि अंतवंत सुखांश मात्र प्राप्त तैं ।
भोगावें सर्वदा तेंचि वासना उपजे असी. ॥ १५
अनंतत्वें ठाव नुरे उठाया वासनेसही ।
कीं भोक्ता भोगही भोग्य तदात्मक म्हणोनिया. ॥ १६
तदंश मनसंबंधें तद्विस्मृति घडे तधीं ।
भोक्तृत्व त्रिपुटी होते स्वसुखींच तदंशक. ॥ १७
तें स्वसूख अनंतत्वें प्राप्त झालें तधीं मन ।
विघरोनि लयो होय जसें सैंधव सागरीं. ॥ १८
तदात्मकत्व म्हणुनी मनोलय घडे तईं ।
तत्संबंधेंच भोक्त्याचे त्रिपुटीचा लयो घडे. ॥ १९
मनोलय असा तोचि मनोजय म्हणोनिया ।
'अनुद्वेगः श्रियो मूलं' या श्लोकीं स्पष्ट बोलिला. ॥ २०
ऐशा मनोजया अन्य त्रैलोक्यजयही तृण ।
ऐसें बोलूनि प्राप्तीचा उत्कर्षहि निरूपिला. ॥ २१
कीं हा स्वसुखप्राप्तत्वें परमानंद होय जो ।
दृष्टांतें कवणेंही तो वाच्य नोहे कदापिही. ॥ २२
ऐसें केवळ आत्मत्व बोलिलें परि प्राक्तनें ।
चेष्टतें देह तैं भोग प्रारब्धात्मक भोगितो. ॥ २३
मनावांचूनि तो भोग न भोगेचि स्थुळीं जडीं ।
जेथें मनोरूप तेथें वासनाही धरी बळ. ॥ २४
यालागीं बोलतों आतां वासनानाशसाधन, ।
कीं निरंतर अभ्यास आत्मत्वाचा किजे बरा. ॥ २५
हें वासनोपशमन जेथूनि श्लोक तेथुनी ।
टीका समाक्षरी कांहीं संगती श्लोक हे पृथक्. ॥ २६

---

'कोण रूपी असें ऐसा रामा! स्वात्मविचार हा ।
अग्नी कीं भववृक्षाचे वासनाबीजभंजनीं. ॥ १
विचारदर्पणीं बिंबीं संलग्ना धैर्यबुद्धितें ।
तृष्णा न बाधती जेंवी वातोर्मी चित्रवेलितें. ॥ २
ब्रह्मविद्यांमधें ज्ञान तेंचि ज्ञाते विचार हा ।

---

१. एथें 'मी' हा अध्याहृत कर्त्ता. २. चित्रांतील वेलीला. ३. ब्रह्मविद्यांमधें (संबंधीं) विचार हा (हेंच) तें ज्ञान (असें) ज्ञाते जाणती—असा अन्वय करावा.

जाणती, त्यामधें ज्ञेय असे गोडी दुधीं जसी. ॥ ३
ब्रह्मात्मानुभवें साक्षात्कार झाला अशावरी ।
सकृपा तुष्टती येथें ब्रह्माविष्णुशिवादिक. ॥ ४
काय हें विश्व सकळ स्वयें मी काय होउन ।
ऐशा विचारनिष्ठाला मृषाच जग होय हें. ॥ ५
सर्व ब्रह्म अशा भावें ज्याचें मूर्खत्व नासतें ।
तुटे त्या वासना सुज्ञा मारुडी जळबुद्धिवत्. ॥ ६
निःशेष वासनात्यागें पावतें चित्त ब्रह्मता ।
प्राणरोधेंहि यामध्यें जसी इच्छा तसें करी. ॥ ७
साधुसंगहि सच्छास्त्र सुबुद्धा होसि तत्पर ।
तद्दिनींच न मासें कीं मत्पराबुद्धि पावसी. ॥ ८
सत्संगव्यवहारें वा भवचिंतानिवारणें ।
देहविभाग मिथ्यत्वें वासना न उरे भयें. ॥ ९
दृढ ब्रह्मानुसंधानें संसार विषही मुढां ।
होय अमृत न ध्यासें ब्रह्मामृतहि तें विष. ॥ १०
देह हा सत्य मी ऐशा भावें बंधन पूर्ण तें ।
असदेह न मी पाहें शून्य कीं मुक्त होय तैं. ॥ ११
निजेला असतां रामा! स्वप्नदेहें दिशांतर ।
भ्रमसी तो देह कोठें जागरीं कीं तुतें मृषा. ॥ १२
जग मिथ्या जाणिल्याही त्यागावी देहें मी मती ।
जसी सुज्ञें नातळावी श्वमांसासह पुल्कसी. ॥ १३
साधु शांतहि निश्चिंत चित्त(त्तीं) ब्रह्मैक्य भाविता ।
होय तैं हा अहंभाव स्वयेंचि न उरे तुज. ॥ १४
सदा सर्वात्मैक्यबोधें स्वस्थ अंतर शीतळ ।
न अहंता स्पष्ट तेणें निर्मळाकाशसा असे. ॥ १५

---

१. 'विचारेण परिज्ञातः स्वभावस्योदितात्मनः । अनुकंप्या भवंतीह ब्रह्मविष्णुशिवादयः ॥' असा ळ श्लोक आहे यावरून या समश्लोकींत याचा अर्थ बरोबर केला नाहीं असें दिसतें. २. हा ब्द मूळांतील 'मरु' शब्दाबद्दल योजिला आहे. मरु म्हणजे निर्जल प्रदेश यावरून 'मारुड' णजे मारवाड असा अर्थ दिसतो. तेथेंही जलाचा अभावच आहे. ३. देह मी अशी मति म्हणजे मजूत. ४. श्व+मांस=कुत्र्याचें मांस. ५. चांडाल इत्यादि नीचजातींसारखी एक जाती आहे, ा जातीची स्त्री.

सुखें शीतळ जैं चित्तीं तैं तया विश्व शीतळ ।
चित्तीं संतप्त दुःखें त्या दावाग्निमय हें जग. ॥ १६
योगवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी करी ।
व्यंकटाख्यमुखें आत्माराम सांबसदाशिव. ॥ १७

---

**प्रकरण सहावें.**

पूर्व प्रकरणीं बोले वासनानाश त्यामधें ।
सत्संगव्यवहारादि मुख्यत्वें साधनत्रय. ॥ १
बोलूनि तेथ तात्पर्य त्यागावी देह मी मती ।
हाचि सिद्धांत कथिला कीं सर्वात्मक ब्रह्मही. ॥ २
जरी झाला असा बोध तरी देहात्मका मती ।
स्फुरतां मात्र तत्काळ आणिते ते अधोगती. ॥ ३
यास्तौं नातळिजे तीतें ब्रह्मज्ञेंही कदापिही ।
ब्राह्मणें जेंवि चांडाळी नातळावी तयापरी. ॥ ४
ऐसी देहात्मबुद्धी हे त्यागाया अतिदुस्तर ।
म्हणोनि सर्वदा तीतें ब्रह्माभ्यासींच लाविजे. ॥ ५
ऐकदेशी तिचें रूप लाविली तेथ लागते ।
यास्तौं स्वात्मसुखाब्धीच्या स्वादीं अभ्यास लाविजे. ॥ ६
जेव्हां स्वात्मसुखाचा हा स्वादें अध्यास लागतो ।
तेव्हां सोडूनि ते गोडी असद्देहाकडे न ये. ॥ ७
कीं अमृत सेविल्यातें कांजी जैसी रुचेचि ना ।
तैसी ब्रह्मसुखा सेवी मति ते विषयीं न ये. ॥ ८
यालागीं सर्वदा ऐसा अध्यास दृढ होय तौं ।
विवरोनि निजात्मत्व आत्ममनन तें किजे. ॥ ९
याभावें बोलतों आतां आत्ममनन स्पष्ट जें ।
त्याची समाक्षरी टीका संगतीश्लोक हे पृथक् ॥ १०

---

प्रकृतीपर मी शुद्ध बोधानंत अगोचर ।
मत्सत्ताचेष्टत्या देहा पाहे कीं अन्य देहवत्. ॥ १

---

१. देहच मी अशी मति. २. थोडासा देश, अवकाश, विषय इत्यादि व्यापून राहणारी, सर्वव्यापक नव्हे अशी. ३. सवय, अभ्यास अशा अर्थी हा शब्द योजिलेला दिसतो, ध्यास. ४. तंव, तोंपर्यंत. ५. प्रकृतीहून वेगळा. ६. माझ्या सत्तेनें चालणाऱ्या.

मनबुद्धींद्रियादि जे सर्वही जड भाव हे ।
चिद्बोधें अंत ज्यां ऐसे कीं सद्विवर्त भासते. ॥ २
दु:खी असे स्थीरचित्तें सुखीं विश्वांत मित्रता ।
जन्मनाशातीत आहे तेणें आरोग्य जीव तों. ॥ ३
चेष्टाआशास्पृहातीत[1] स्वस्थ मी नभसा असें ।
निर्धर्म शांतही शाश्वत् स्वभावें अचलस्थिती. ॥ ४
खल्विदं ब्रह्म श्रुत्यर्थें भूतभौतिक[2] ब्रह्म हें ।
जाणिलें बरवें आतां कीं ब्रह्म मीचि सर्वही. ॥ ५
व्यतिरेकान्वयें[3] सर्व साक्षि जें व्याप्त व्योमसें ।
ब्रह्म तें मीचि हा आहें जेथें वैक्ते[4] नुरे पृथक्. ॥ ६
चिदब्धिमद्रुपानंतीं[5] जीववीची[6] विचित्र कीं ।
स्फुरती मुरती वस्तुस्वभावेंचि प्रवर्तती. ॥ ७
चिदब्धिमद्रुपानंतीं विश्ववीच्यादि कल्पना ।
उत्पत्तिलय होतांही वृद्धि क्षय न मद्रुपा. ॥ ८
मद्रूप नेणतां विश्व होय लयहि मद्रुपीं ।
ज्ञानें सच्चित्सुखी साक्षात् आतां साम्राज्य मी असें. ॥ ९
सर्वभूतीं प्रियद्भावा नित्यमुक्तेश[7] चिद्रुपा[8] ।
प्रत्यक्[9] जीवन्मुक्त[10] बिंबा[11] अशा मातें नमो नमः. ॥ १०
**यो**गवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी करी ।
**व्यं**कटाख्यमुखें **आ**त्माराम **सां**बसदाशिव. ॥ ११

---

१. चेष्टा+आशा+स्पृहा यांच्या विरहित असा. २. भूत+भौतिक. भूत=पंचमहाभूतें. भौतिक=पंचमहाभूतांपासून झालेले पदार्थ. ३. जेथें मी नाहीं अशी वस्तु ब्रह्मांडांत नाहीं. हा व्यतिरेक आणि जी जी वस्तु आहे ती सर्व मीच आहे—हा अन्वय. (व्यतिरेकउदा० यत्र वन्ह्यभावस्तत्र धूमाभावः—अन्वयउदा० यत्र धूमस्तत्र वह्निः.) ४. बोलणारें. ५. चित्+अब्धि+मद्रूप+अनंत. मूल संस्कृत श्लोकाप्रमाणें ह्या समासांत 'अनंत' हा शब्द 'चित्' या शब्दापूर्वी असला पाहिजे. 'अनंत असा जो चैतन्यरूप समुद्र हेंच माझें रूप त्याचे ठायीं. ६. जीवरूप वीची म्ह० लाटा (समुद्राच्या). ७. निरंतर मुक्त असा ईश. ८. चैतन्यरूप, ब्रह्मरूप. ९. आत्मरूप. १०. देहीं असून मुक्त. ११. ज्याचें प्रतिबिंब पडतें ती मुख्य वस्तु. आत्मा हा बिंबरूप आणि बुद्धीच्या ठायीं पडलेलें त्याचें प्रतिबिंब तो जीव.

**प्रकरण सातवें.**

पूर्वप्रकरणीं षष्ठीं आत्ममनन बोलिलें ।
व्यतिरेकान्वयें तेथें शुद्धात्मत्व निरोपिलें. ॥ १
'सर्वं खलु इदं ब्रह्म' श्रुत्यर्थें सचराचर ।
ब्रह्मरूप तधीं वक्तें बोलाया न उरे दुजें. ॥ २
ऐसा बोलुनि सिद्धांत दृष्टांतें गुह्य दाविलें ।
कीं निर्धर्म प्रियद्रावी आदीं स्फुरण होय कीं. ॥ ३
निर्विकल्प स्फुरे स्फूर्ती प्रकृतीपुरुषात्मक ।
एकात्मत्वें तत्व एक ज्ञानअज्ञानरूपक. ॥ ४
सधर्म ब्रह्मसत्ताही या तत्वींच स्फुरद्रुप ।
म्हणोनि हें स्फूर्तियोगें प्रियत्वें स्फुरतें जग. ॥ ५
तस्मात् सत्ता निर्विकल्प तत्व आठव रूप तें ।
विद्या अविद्या या दोघी तद्योगें जीव ईश्वर. ॥ ६
त्याच तत्वीं स्फुरद्रूप होतीं आपापुलीं रुपें ।
परंतु भिन्नभिन्नत्वें एकदा न स्फुरे कधीं. ॥ ७
अविद्या स्फुरते तैं हा प्रपंच विलसे बरा ।
विद्या स्फुरे कधीं त्याचा स्वात्मत्वीं लय होतसे. ॥ ८
ऐसें सत्तास्फूर्ति तत्व ज्ञातृत्व आठवात्मक ।
त्यापासूनि सविकल्प तत्वें चव्वीस उद्भवे. ॥ ९
चोविसांमाजि मुख्यत्वें वृत्तिरूप चैतुष्टय ।
मन बुद्धि चित्त आणी हंकारात्मक हें जग. ॥ १०
भासतें कल्पनायोगें तल्लयें लय होतसे ।
तस्मात् मनोमय विश्व वृत्त्यात्मकचतुष्टय. ॥ ११
एवं हीं कारणें चारी तत्कार्यें च्यारि पंचकें ।
भूतें विषयही पांच ज्ञानकर्मदशेंद्रियें. ॥ १२

---

१. सगळें. २. निश्चयेंकरून. ३. हें. ४. स+चर+अचर. चर=जंगम. अचर=स्थावर. स्थावर जंगम यांसहित. ५. ब्रह्मज्ञान. ६. अज्ञान. ७. चार वस्तूंचा समुदाय, चौकडी. ८. वृत्तिचतुष्टयात्मक? ९. (१) भूतपचंक=पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश. (२) विषयपंचक=शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध. (३) ज्ञानेन्द्रियपंचक=चक्षु, श्रोत्र, त्वक्, जिव्हा, घ्राण. (४) कर्मेन्द्रियपंचक=वाक्, पाणि, पाद, पायु, उपस्थ. पायु म्ह० मलद्वार. उपस्थ=मूत्रद्वार. याप्रमाणें हीं चार पंचकें.

एवं चोविस तत्त्वांचें स्थूलसूक्ष्मरुपें जग ।
समष्टिव्यष्टिरूपत्वें त्रिगुणत्वें चराचर. ॥ १३
याही चोविस तत्त्वांचें महाकारण तत्त्व तें ।
सत्तास्फूर्ति निर्विकल्प संख्या पंचविसावि ते. ॥ १४
या सत्तास्फूर्तिचे आंगीं प्रपंचोन्मुख वर्तता ।
ज्ञातृत्व क्रियत्व आणि तादात्म्य त्रिगुणें असे. ॥ १५
एवं रूपें अविद्या हे कृष्णें गीतेंत बोलिलें, ।
**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते.** ॥ १६
'अविद्यातादात्म्ययोगें सुखदुःखासि भोगितो' ।
ऐसेंही बोलिलें कृष्णें पुरुपात्मक तत्व कीं. ॥ १७
**'पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते'** ।
भोक्तारूपें स्फुरे सत्ता जीवत्वें प्रतिबिंबतो. ॥ १८
स्वरूपोन्मुख होतां ते सत्तास्फूर्ति तधीं घडे ।
तुर्या साक्षी स्वबिंबात्मा प्रत्यक्चैतन्य व्यापक. ॥ १९
बिंबात्मत्वीं स्थीर होतां स्फूर्ति तैं उन्मनी घडे ।
अन्वयें तेचि विश्वात्मा सच्चिदानंद देखते. ॥ २०
एवं विद्या अविद्येच्या योगें हे द्वैयभावना ।
बंधमोक्षद्विधा[12] ऐसा पूर्वी विस्तार बोलिला. ॥ २१
वर्ततां बंधमोक्षीं ही निर्मुक्त असणें सदा ।
नित्य मुक्त चिदात्मा तो स्फूर्तियोगेंचि भासतो. ॥ २२
हे सत्ता स्फूर्ति चिच्छक्ती [13]जीवाद्यलहरीरुपें ।
चिदब्धिमद्रुपानंतीं स्फुरे मुरे प्रवर्तते. ॥ २३

---

१. चार पंचकें आणि अंतःकरणचतुष्टय (मन, बुद्धि, चित्त, अहंकार) मिळून चोवीस तत्वें. सत्व, रज आणि तम हें गुणत्रय. ३. अज्ञान. ४. या सत्तास्फूर्त्तीचे अंगीं (ती) प्रपंचोन्मुख तां त्रिगुणें ज्ञातृत्व, क्रियत्व आणि तादात्म्य असे—असा अन्वय करावा. ५. कार्य, कारण णे कर्तृत्व यांना कारण प्रकृति आहे. प्रकृति म्ह० माया. ६. अविद्येशीं तादात्म्य म्ह० रूपता झाल्याच्या योगानें. ७. आत्मा. ८. हेतुः उच्यते. सुख दुःख इत्यादि भोगण्यास कारण ष आहे. ९. सत्ता म्ह० आत्मा यासच प्रतिबिंबाच्या योगानें जेव्हां जीवदशा प्राप्त होते हां तो भोक्तृत्वरूपानें भासतो. १०. स्वरूपाकडे तोंड फिरविलें आहे अशी. ११. भावनाद्वय. . बंधमोक्षरूपानें द्विधा म्ह० दोन प्रकारची. १३. जीव नांवाच्या लाटांच्या रूपानें.

हे स्फूर्ति अथवा ईचें कार्य तत्वेंहि चोविस ।
ऐसें सकळ हें विश्व लहरीरूप भासतें. ॥ २४
परंतु विश्वऊर्मीचा मद्रूपसुखसागरीं ।
उद्भास लय होतांही वृद्धिक्षय न मद्रुपा. ॥ २५
ऐसा सिद्धांत बोलोनि परादि वाक् चतुर्विध ।
स्फूर्ति तत्वादि वाच्यांश सर्वही हा निषेधुनी. ॥ २६
निर्धर्म मद्रुपानंत चित्सुखाब्धि म्हणोनियां ।
दाविला अन्वयें तोचि विश्वोर्मीत्वें स्फुरद्रुप. ॥ २७
सत्ता स्फूर्ति सधर्मत्वें चिच्छक्ति ज्ञानरूपक ।
तुर्या पराहि सर्वज्ञ जगदंबास्वरूप ते. ॥ २८
साक्षी व्यापकही ब्रह्म इचेनेंचि प्रकाशक ।
होतो तैं बिंबरूपात्मा षड्विंशक शिव स्वयें. ॥ २९
संख्या हे बोलती वेद परि तें ब्रह्म केवळ ।
तेथेंचि या स्फूर्तियोगें ब्रह्मीं विलास भासती. ॥ ३०
ते चतुर्वीध म्हणुनी ऐसें हें श्रुतिवाक्य कीं ।
**'षड्विंशको महाविष्णुर्महागुह्यो महाविभुः'** ॥ ३१
श्रुति स्पष्टार्थ तो ऐसा कीं महागुह्य बोलिलें ।
तेंचि अनिर्वाच्य ब्रह्म निर्धर्म प्रियरूप जें. ॥ ३२
स्फूर्तिच्या सूक्ष्मसंयोगें परमानंद होय तें ।
स्वसत्तात्मक सामर्थ्यें सिद्धांतीं तें अनामही. ॥ ३३
अकर्तृत्वानंद ऐसें म्हणोनी बोलती जया ।
तेंचि महाविभूवाक्यें सत्ता ॐकारपंचकीं. ॥ ३४
त्यापासोनि महाविष्णू वाक्यें तें साधनात्मक ।
मुद्रादि योग साधूनी भ्रमरीधाम पावणें. ॥ ३५
तेंचि बिंदूरुपें ब्रह्म सच्चिदानंद बोलती ।

---

१. उद्भव. १. परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी अशी चार प्रकारची वाणी. नाभिस्थानीं जे प्रथम सूक्ष्म ध्वनि उठतो त्याचें नांव 'परा.' तो ध्वनि उरःस्थानीं आला म्हणजे त्याला 'पश्यंती' अशी संज्ञा देतात. तोच पुढें कंठस्थानीं आला म्हणजे त्याला 'मध्यमा' म्हणतात आणि मुखमार्गानें जेव्हां शब्दरूपानें तो ध्वनि बाहेर पडतो तेव्हां त्याला 'वैखरी' म्हणतात. ३. चोवीस तत्वांमध्यें महाकारण मिळविलें म्हणजे पंचवीस तत्वें होतात, त्यांमध्यें शुद्ध बिंब म्ह० आत्मा हा मिळविला म्ह० सव्वीस तत्वें होतात. हेंच शिवस्वरूप.

असंप्रज्ञा[1] समाधीतें पिंडीं ब्रह्मांडयुक्त तें. ॥ ३६
अनुग्रह स्वरूपात्मा अनाहताख्य[2] वाग्ध्वनी ।
सूक्ष्मत्वें सर्वदा होते कर्तृत्वानंद बोलिजे. ॥ ३७
अथवा तेंचिं उत्थानीं संप्रज्ञातसमाधिक ।
स्फुरद्रूप प्रियद्भाव सच्चिदानंदरूप तो. ॥ ३८
त्वंपदात्मक शुद्धात्मा निर्निमित्त स्वभावता ।
तोही महाविष्णुवाक्यें उन्मन्यात्मक व्यापक. ॥ ३९
तेथूनि शक्तिसामर्थ्य भासे चिल्लक्षणान्वित ।
षड्विंशक नित्यमुक्त षड्गुणैश्वर्य ईश्वर. ॥ ४०
बिंबात्मा सव्विसावा तो सापेक्ष ज्ञानयुक्त तें ।
जीवन्मुक्तहि बोलावा एवं संयोग स्फूर्तिचा. ॥ ४१
अनेक स्वमहत्त्वाच्या उपाधि अंगिकारितो ।
तेव्हां तसतसा भासे षड्गुणैश्वर्ययुक्त तो. ॥ ४२
एकाहूनि एक भाग सूक्ष्म स्थूळत्व पावला ।
तरी जें कां अनिर्वाच्य तेंचि सोपाधि अन्वयें. ॥ ४३
वस्तुस्वभावसत्तेनें षडिंशकहि पासुनी ।
प्रकाशे स्वरुपोल्हास तैंरी बिंबस्वरूप तें. ॥ ४४
त्या बिंबस्वरुपाब्धीची लहरी स्फूर्ति तत्व तें ।
प्रतिबिंब तया अंगीं सापेक्षज्ञान बोलिजे. ॥ ४५
या सापेक्षज्ञानयोगें बिंबात्मा तोचि त्वंपदीं ।
प्रत्यक्चैतन्यसाक्षित्वें जीवन्मुक्तत्व पावतो. ॥ ४६
परि सापेक्ष हें ज्ञान जेथिंचें त्याच त्वंपदीं ।
जाणिजे तें अन्य पिंडीं त्वंपदीं जाणवेचि ना. ॥ ४७
जरी सकळ पिंडांचा त्वंपदात्मक एक तो ।
बिंबात्मा तरिही त्यातें सापेक्ष ज्ञान तें नसे. ॥ ४८

---

१. असंप्रज्ञात समाधि. २. चित्ताच्या सर्व बाह्यवृत्ति बंद होऊन तें अंतर्मुख झालें म्हणजे शरीरांत दहा प्रकारचे नाद ऐकूं येतात. त्याला 'अनाहतध्वनि' म्हणतात. ते नाद येणेंप्रमाणें:— (१) चिण् असा होतो. (२) चिणूचिणू असा. (३) घंटानाद. (४) शंखनाद (भुंभुं). (५) तंत्रीनाद. विण्याच्या तारांचा नाद. (६) तालनाद=टाळ वाजविल्यासारखा. (७) वेणुनाद. पावा किंवा अलगुजें वाजविल्यासारखा. (८) मृदंगनाद. (९) भेरीनाद=नगाऱ्यासारखा. (१०) मेघनाद= मेघाच्या गर्जनेसारखा.

तो निर्लेप नित्ययुक्त सर्व पिंडांत एक तो ।
बिंबात्मा परि ज्या पिंडीं सापेक्ष ज्ञानयुक्त तें. ॥ ४९
स्फूर्तिसंयोग घडला त्या पिंडींच्च प्रकाशक ।
होऊनि ज्ञानरूपत्वें जीवन्मुक्तत्व भोगितो. ॥ ५०
तस्मात् निर्लेप बिंबात्मा सापेक्ष स्फूर्ति तत्व तें ।
प्रतिबिंब भिन्न पिंडीं भिन्नची जीवशक्तिही. ॥ ५१
ऐसें सत्तास्फूर्ति तत्व पिंडात्मा व्यष्टि त्वंपद ।
ऐशा असंख्य पिंडांचा बिंब तो तत्पदात्मक. ॥ ५२
समष्टिरूपही त्यातें बोलिजे षड्गुणेश्वर ।
प्रतिबिंब स्फूर्तिशक्ति भोक्ता जीवहि बोलिजे. ॥ ५३
ऐसें असंख्य स्फूर्तित्वें असंख्य पिंड त्वंपदें ।
व्यष्टिरूपें तदात्मेही असंख्य अंश जीवही. ॥ ५४
प्रतिपिंडीं भिन्न अंश भोक्ते जीव असंख्यक ।
यास्तौं एकास एकाचें नोहे भोक्तृत्व ठाउकें. ॥ ५५
कीं ते परस्परें भिन्न भोक्तृत्व भिन्न यास्तव ।
एकजीवत्ववादाचें मत येणेंचि दूषिलें. ॥ ५६
हे असंख्य त्वंपदात्मे स्वस्वापिंडीं यथास्थित ।
जाग्रत्स्वप्नीं द्वयावस्थीं भोक्तृत्वें वर्तती परी. ॥ ५७
कीं चिद्विषयसौख्यत्वें अनंत सुख होय ना ।
आपलें म्हणुनी वस्तुस्वभावें त्यासि त्यागितो. ॥ ५८
द्वयावस्थानिरासें हे स्फूर्ति तन्मात्र होउनी ।
बीजत्वें राहती तेव्हां सुषुप्त्युत्थान बोलिजे. ॥ ५९
हें उत्थान सुषुप्तीतें विस्मृती म्हणुनी शिवें ।
तमोरूप कळा चारी बोलिला तेथ हें असे. ॥ ६०
त्र्यावस्था अशा त्यांचें महाकारण साक्षि हें ।
स्फूर्ति तत्वाख्य जीवात्मा असतां निर्विकल्पक. ॥ ६१
येथेंही आपुलें जें तें अनंत सुख होय ना ।
यास्तौं पश्चात्तापरूपीं त्र्यावस्थांसि बोलिजे. ॥ ६२
अनंत सुख तें नोहे म्हणोनि स्फूर्तिरूपक ।
वस्तुत्वें जीवभोक्त्याचा महावस्थीं घडे लय. ॥ ६३

तेव्हां निर्धर्म स्वात्मत्व निरुपाधिक केवळ ।
निर्निमित्त प्रियात्मा तो अनंत सुखरूपक. ॥ ६४
होऊनि असतो तेव्हां बिंबोपाधिहि ते लय ।
षड्विंशकादि आत्मत्व परमानंद पासुनी. ॥ ६५
स्फूर्तियोगेंचि जें भासे तल्लयें भासही लय ।
होतो परंतु बिंबात्मा निर्धर्म स्वसुखें असे. ॥ ६६
शिवगीतेमधें हेंचि बोलिलें श्रीसदाशिवें ।
कीं उत्थानत्रयावस्था पश्चात्तापीं म्हणोनियां. ॥ ६७
आणि गाढ महावस्थीं अनंत सुखरूपक ।
होतो आपण ऐसें हें दशमाध्यायिं बोलिलें. ॥ ६८
जरी स्फूर्तिलयो झाला तरी पिंडींच तत्पद ।
युक्त ब्रह्मांड तेथें तो निग्रहानुग्रहात्मक. ॥ ६९
अनाहतध्वनीयुक्त स्वयंज्योतिस्वरूप तो ।
स्वानंदैक सहस्रारीं[1] असे सांब सदाशिव. ॥ ७०
तेथें संयोग स्फूर्तीचा न लागे म्हणुनी तया ।
नाश नोहे महावस्थीं झाली स्फूर्ति जरी लय. ॥ ७१
कीं सत्ता स्फूर्ति हे पिंडीं ब्रह्मांडीं तो सदाशिव ।
अनुग्रहें स्वात्मरूपीं करी स्फूर्तीस तन्मय. ॥ ७२
तैं समाधि निर्विकल्प होते ते न जिवाधिन ।
परि मुद्रादिसंयोगें कर्तृत्वानंद बोलिजे. ॥ ७३
हेंही शिवगितेमध्यें नवमाध्यायिं बोलिलें ।
कीं पिंडीं युक्त ब्रह्मांड तेजोरूप म्हणोनियां. ॥ ७४
निग्रहानुग्रहें तोचि अवतार धरी हरी ।
तस्मात् सकळ पिंडीं तो विराजे तत्पदात्मक. ॥ ७५
म्हणोनि स्फूर्तियोगें तो लय नोहे कदापिही ।
महावस्थीं लयो स्फूर्ति तैं निर्धर्म स्वरूप तें. ॥ ७६
या निर्धर्मस्वरूपीं तो बिंबैक्य प्रतिबिंबही ।
होय भोक्तृत्व जीवाचा लय तैं भेद नासतो. ॥ ७७

---

१. सहस्र+अर=हजार पाकळ्या. मनुष्याच्या मस्तकामध्यें एक चक्र आहे त्याला एक हजार पाकळ्या आहेत. त्याला 'सहस्रदलचक्र' म्हणतात.

ऐशा अनुभवें भेदवादाचें मत दूषिलें ।
तस्मात् निर्धर्म जें ब्रह्म तेंचि सामर्थ्यभूषित. ॥ ७८
होऊनि स्फूर्तिसंयोगें त्रिमहत्वें प्रकाशलें ।
बिंबात्मत्वीं महत्वें हीं एवं षाड्गुशकादिकं. ॥ ७९
बोलिला वेद जीं चारीं तेंची वशिष्ठ राघवीं ।
मनोलयप्रकरणीं बोलिला येथ संमत. ॥ ८०
'महात्मा हा परंज्योती षड्गुणी व्यापकास्तव ।
मनोशक्ति पृथक् जैसी जळास्तौं लहरी निघे.' ॥ ८१
एवं या संमतें जो हा बिंबात्मा षड्गुणेश्वर ।
प्रतिबिंब तयास्तौं हे सत्ता स्फूर्ती सधर्मक. ॥ ८२
त्वंपदात्मक हे स्फूर्ति जीवतत्वाख्य बोलिजे ।
तो भोक्ता निर्विकल्पत्वें म्हणोनि सविकल्पक. ॥ ८३
पंचरश्मी पंचप्राण शुद्धसत्त्वाख्य यास्तव ।
भोक्तृत्व पावतो भोक्ता स्फूर्तितत्वींच जीव तो. ॥ ८४
अविद्या शक्ति ही त्याची अंतःकरणपंचकें ।
रश्मित्वें वर्तते द्वारें ज्ञानकर्मदशेंद्रियें. ॥ ८५
या द्वारें जीवभोक्ता तो रश्मियोगेंचि भोग्य तें ।
स्वसुखांशविस्मृतीनें भोगी विषय पंचधा. ॥ ८६
एवं हा भोग्यभोक्तृत्वें पुरुषभाग जाणिजे ।
पंधरा प्रकृतीतत्वें अंतःकरण आदिक. ॥ ८७
पंधरामाजि हें सूक्ष्म अंतःकरणपंचक ।
त्यामाजि निर्विकल्पत्वें अंतःकरण बोलिजे. ॥ ८८
तेंचि सत्तास्फूर्तितत्व सर्वज्ञत्वें प्रवर्तक ।
परंतु एकदेशित्वें वृत्तिरूप चतुष्टय. ॥ ८९
मनबुद्ध्यादि हीं चारी वृत्त्यात्मकपरी जडें[1] ।
स्वतां प्रेर्यत्व[2] त्यांनाही लाविलीं तेथ लागती. ॥ ९०
परंतु वृत्तिवांचोनि स्फूर्तितत्वास कांहिं ही ।
कर्तव्य न घडे ऐसा परस्परैक्ययोग हा. ॥ ९१
येथें दृष्टांत तो ऐसा जो निर्धर्म कळातित ।

१. चैतन्यहीन. २. प्रेरिलें जाण्याची योग्यता.

सूर्य तें ब्रह्म निर्धर्म कळासंयुक्त तोचि तैं. ॥ ९२
प्रकाशें अर्क तो व्योमीं दशदीशांसि व्यापक ।
तसा सोपाधि बिंबात्मा नित्यमुक्त प्रकाशक. ॥ ९३
बिंबार्क जो तयाचें हें प्रतिबिंब सधर्मक ।
सत्ता स्फूर्ति तसें येथें दृष्टांतीं नेत्र देखणें. ॥ ९४
स्फूर्तिचें कार्य तें वृत्ति तसी नेत्रांस दृष्टि ते ।
लाविली तेथ पाहे ते स्वलोकन नसे तितें. ॥ ९५
ज्या पदार्थीं दृष्टि पाहे त्यातें त्यागूनि आणखी ।
पहाणें न घडे तीतें म्हणूनि जडरूप ते. ॥ ९६
दृष्टिचें लावणें आणि त्यागणें स्वमहत्व जें ।
नेत्रींच देखणी सत्ता तेचि प्रेरक दृष्टितें. ॥ ९७
पदार्थीं पाहणें तैसें जीवां संसारबंधन ।
लक्षी अर्कास जैं नेत्र तैं पदार्थ न दीसती. ॥ ९८
तैसें स्वरुपाबिंबार्की लक्षिते स्फूर्ति तेधवां ।
जीवन्मुक्तदशा होते हेचि जीवासि मुक्तता. ॥ ९९
ऐसा बिंबरूपात्मा[१] तत्पदात्मक तो स्वयें ।
त्वंपदीं स्फूर्तिच्या योगें नाना सामर्थ्य दाखवी. ॥ १००
सर्वज्ञोपाधि ही जेव्हां स्वेच्छत्वें अंगिकारितो ।
दावितो फळदातृत्व तत्पदीं प्रतिबिंब हें. ॥ १०१
फळदातृत्व हे सत्ता बिंबात्मत्वींच वर्तते ।
बीजत्वें परि हे सत्ता प्रतिबिंबात्मरूपिणी. ॥ १०२
जसा हा त्वंपदीं भोक्ता प्रतिबिंब तसाचि तो ।
तत्पदीं फळदाताही प्रतिबिंब परंतु तो. ॥ १०३
बिंबात्मरूपीं बीजत्वें असे तो फळदायक ।
कर्मानुरूप जीवांतें प्रसंगोचित होतसे. ॥ १०४
तोही या स्फूर्तिसंयोगें त्वंपदींच प्रकाशतो ।
पिंडावांचूनि अन्यत्वें नसे त्या स्थान वास्तव. ॥ १०५
ब्रह्मादीक जरी झाले देव ते त्वंपदात्मक ।
पिंडरूपीं परी त्यांतें असे सामर्थ्य ऐश्वरी. ॥ १०६

---

१. एथें छंदोभंग होतो म्हणून 'रूप आत्मा' असा पाठ करावा.

ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व पिंडांस व्यापक ।
म्हणोनि तत्पदात्मा तो समष्टिबिंब बोलिजे. ॥ १०७
एकवृक्ष तसा पिंडव्यष्टिरूपेंचि त्वंपद ।
ऐशा अनेक वृक्षांचें समष्टिवन तत्पद.' ॥ १०८
म्हणोनि तत्पदात्मा तो बिंबात्म्या एक व्यापक ।
जसें असंख्य लोकांतें सूर्य एक प्रकाशितो. ॥ १०९
म्हणोनि स्थान त्या नाहीं एकदेशित्व त्या नसे ।
परि तो स्वलिलायोगें ब्रह्मांड त्रिगुणातित. ॥ ११०
रची वैकुंठ कैलास शुद्धसत्वाख्य धाम[२] तें ।
परंतु बिंबरूपत्वें सर्वपिंडींच वास्तवी. ॥ १११
तेंही वैकुंठ कैलास सत्यलोकहि धाम तें ।
पिंडामध्येंच ब्रह्मांडयुक्त त्रिस्थान बोलिलें. ॥ ११२
तेथें तद्व्यापकात्माही तुरीयस्थान ईश्वर ।
गुंहाभ्रमर[३] तेथें हा सहस्रारीं प्रकाशक. ॥ ११३
ऐसें शिवगितेमध्यें नवमाध्यायिं बोलिलें; ।
तस्मात् व्यापक बिंबात्मा सर्व पिंडीं विराजतो. ॥ ११४
कृष्णेंही भगवद्गीतेमधें हेंचि निरोपिलें ।
'ईश्वरः[४] सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति'. ॥ ११५
म्हणिजे सर्वपिंडींही ज्योतिःस्वरुप ईश्वर ।
मसुराहृदयस्थानीं[५] स्वप्रकाशें विराजतो. ॥ ११६
'सर्वांतर्गर्भवर्तीयं सोहंमात्रं तु बीजकम्' ।
श्रीतारकपटळींही[६] स्पष्टार्थें बोलिलें शिवें. ॥ ११७
त्याचा गर्भार्थ विस्तारें अनुत्तरपथान्वयें ।
छेतीस तत्वभागार्थ वाढेल ग्रंथ बोलतां. ॥ ११८
तस्मात् ईश्वर बिंबात्मा सर्व पिंडांत व्यापुनी ।
प्रकाशे हृदयस्थानीं सत्ता स्फूर्तीस चालक. ॥ ११९
परंतु तत्पदात्मा तो बिंबात्मा स्वप्रकाशक ।

---

१. ब्रह्मापासून स्तंबापर्यंत. स्तंब=गवताची काडी. २. घर. ३. भ्रमरगुंफा. सहस्रदलचक्रास ही एक संज्ञा आहे. ४. हे अर्जुना! सर्व भूतांच्या हृदयस्थानीं ईश्वर वास करितो. ५. मसूर म्हणून एक धान्य आहे त्याची दाळिंबी जेवढी असते तेवढ्या स्थळीं. ६. एक ग्रंथ आहे.

फळदातृत्व ही सत्ता बिंबात्मत्वींच वर्तते. ॥ १२०
फळदातृत्व तत्वाचे अंश जे अधिदैव ते ।
त्वंपदीं इंद्रियांचे, ते पंधरा अधिदैवतें. ॥ १२१
ब्रह्मेंद्रादि जरी देवा अधिदैव म्हणोनियां ।
बोलिले तेहि पिंडात्मे त्यांचेही इंद्रियाधिप. ॥ १२२
हेची अंशरुपी सत्ता बिंबात्मत्वेंचि वर्तते ।
ब्रह्मेंद्रादि नाममात्रें इंद्रियास प्रकाशक. ॥ १२३
जसी व्यापारस्वामित्वसत्ता पुरुषिं वर्तते ।
परी सत्ताच ते नोहे स्वयें पुरुष केवळ. ॥ १२४
एवं समष्टिव्यष्टित्वें सर्वव्यापक बिंब जो ।
सच्चित्सुखांबुधी त्याचें जीवाख्य स्फूर्ति बुद्बुद[1]. ॥ १२५
श्लोकीं बोलोनि हें आदीं मग विश्वाख्यवाचक ।
लहरीच्याच दृष्टांतें दुज्या श्लोकांत बोलिलें. ॥ १२६
तरि विश्वाख्य या वाक्यें चोवीस तत्वभाग तो ।
उत्पत्ति लय होतांही वृद्धि क्षय न मद्रुपा. ॥ १२७
ऐसें सोपाधि बिंबत्वें बोलिलें ते उपाधिही ।
स्फूर्ति जीवाख्य म्हणुनी लहरीत्वें निरोपिलीं. ॥ १२८
त्याचा गर्भार्थ विस्तारें बोलतां ग्रंथ वाढला ।
कृपा करोनि संतांहीं पाहावें माय बाळवत्. ॥ १२९
तस्मात्सर्वात्मक ब्रह्म या ज्ञानें वर्ततां स्थिती ।
सच्चित्सुखरुपी आहे साम्राज्य हेंहि बोलिलें. ॥ १३०
ऐशा अनंतरूपत्वें स्वयें आपण तेधवां ।
पूज्यपूजक हा भाव न उरे द्वैतपूजनीं. ॥ १३१
या भावें दाविलें गुह्य शेखीं अद्वैतभक्तिचें ।
कीं निर्धर्म प्रियद्भाव नित्यमुक्तेश तोहि मी. ॥ १३२
चिद्रूप अथवा प्रत्यक् चैतन्य बिंबरूपही ।
जीवन्मुक्त अशा मातें अद्वितीया नमो नमः ॥ १३३
असें अद्वैतभक्तीचें बीज रामीं निरोपिलें ।
याचा स्पष्टार्थ उक्तीनें पुढां दावील अष्टमीं. ॥ १३४

१. बुडबुडा.

प्रस्तूत आत्ममननें विश्वोर्मींच्या लयोद्भवीं ।
स्वसुखाब्धि अनंतत्वें असे मद्रूप शाश्वत. ॥ १३५
अशा निरंतर ध्यासें स्थितीची रहणी घडे ।
या भावें बोलतों आतां तेचि शुद्धिरुपें असी. ॥ १३६
कीं अशा शुद्धिरूपें हे रहणी जेथ बोलतों ।
जीं होय तीं स्थिती अंगीं वर्तावें त्यांहि त्या रितीं. ॥ १३७
म्हणोनि याच भावार्थं आत्मशुद्धिनिरूपण ।
बोलतो राघवालागीं वसिष्ठ श्लोक जेथुनी. ॥ १३८
टीका समाक्षरी तेथें आत्माराम सदाशिव ।
कर्ता कारयिता साक्षात्, संगतिश्लोक हे पृथक्. ॥ १३९

---

'बाह्य कृत्रिम उद्योगी कर्ताही परि अंतरीं ।
निरुद्योगी अकर्तृत्वें लोकीं विचर राघवा! ॥ १
सर्वाशावासनात्यागी अंतरीं वीतरागिही ।
बाह्य सर्वहि व्यापारी लोकीं विचर राघवा! ॥ २
संग्रहूनि पूर्ण दृष्टि संसारध्येयत्यागिनी ।
जीवन्मुक्तपणें स्वस्थ लोकीं विचर राघवा! ॥ ३
विशुद्ध बोध मी एक ऐशा निश्चयवन्हिनें ।
प्रज्वाळुनी द्वैत मोठें सर्वात्मैक्येंचि हो सुखी. ॥ ४
देह मी या अहंपाशें होसी सर्वत्र बद्ध तूं ।
चैतन्य मी या ज्ञानास्त्रें बंध छेदूनि हो सुखी. ॥ ५
देहात्मत्वरतित्यागें अभेद जग या स्थिती ।
अंतरीं एकनिष्ठत्वें हो सच्चित्सुखतत्पर. ॥ ६
त्र्यावस्थातीत तूझें जें तूर्यरूप शाश्वत ।
शुद्धपरमचैतन्ययुक्त तन्मय हो सदा. ॥ ७
ग्राह्यग्राहक भावात्मा मृगांबु[1]विश्वभावना ।
त्यागूनि तदधिष्ठान[2] ब्रह्मार्कमय हो स्वयें. ॥ ८
संकल्पें स्थूळ संकल्प मनेंचि मन छेदुनी ।
स्वात्मत्वीं मुनि तूं राहे येणें असाध्य काय तें. ॥ ९

---

१. मृगजळवत् जें विश्व त्याची भावना. २. तत्+अधिष्ठान=त्याचा आधार. तें ज्यावर भासतें तें.

मुका निर्जीव हा देह तुज तो कोण होतसे ।
कीं ज्या देहवशें[१] रामा! सुखदुःखार्थ भोगिसी. ॥ १०
चैतन्यरूप तूं कोठें रक्तमांसादि देह वा ।
जाणतांही आत्मबुद्धी देहीं ते कां न टाकिसी? ॥ ११
इतुकाच कळे आत्मा कीं तो देवेश चिद्रुप ।
काष्ठ डिखळसा[२] हा कीं जड देहहि जाणवे. ॥ १२
सत्य तें ब्रह्म नेणोनि मृषा[३] देह अविद्यक[४] ।
त्यातें आत्मा म्हणे ज्ञान अद्भुताश्चर्य हें जनीं. ॥ १३
अपूर्व आणखी हें कीं सत्परं ब्रह्म नेणुनी ।
मृषा जें हें म्हणे माझें दृढ अज्ञत्व तें पुढें. ॥ १४
ज्या मनीं भावना सर्व ब्रह्म हें तेचि मुक्तिदा ।
भेदबुद्धि अविद्या हे तीतें त्यागींच सर्वथा.' ॥ १५
योगवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी करी ।
त्र्यंकटाख्यमुखें आत्माराम सांब सदाशिव. ॥ १६

प्रकरण आठवें.

पूर्वप्रकरणीं शुद्धी बोलोनि रहणी बरी ।
दाविली तेथ पूर्णत्वें आत्मानुभव संचला. ॥ १
त्र्यावस्थातीत जें कीं सच्चित्सुख सनातन[५] ।
तुझें रूप तदात्मत्वीं हो तन्मय वदे असें. ॥ २
ऐशा अनुभवें ज्ञानीं वर्ततां अचळस्थिती ।
न मोडे सर्वथा कीं तो अनंतरुपि यास्तव. ॥ ३
[६]अंतवंतसुखप्राप्ती तौं सुखालागिं वासना ।
करी चंचल चित्तातें म्हणोनि स्थिर होयना. ॥ ४
तें स्वसूख अनंतत्वें लाभलें तइं या मना ।
सेवितांही सरेना जें होय तन्मय सेवितें. ॥ ५
हा अनंत स्वसुखाचा वस्तुस्वभाव यास्तव ।
अनंत स्वसुखप्राप्ती घडे चित्तासि जेधवां. ॥ ६

१. देहाच्या स्वाधीन होऊन. २. डिखळ=ढेंकुळ (मातीचें). ३. खोटें, मिथ्या. ४. 'आविद्यक' हा शुद्ध शब्द होय. अविद्या म्हणजे अज्ञान त्याच्या योगानें झालेलें तें आविद्यक. ५. नित्य असणारें, अविनाशी. ६. अंतवंत म्ह० नाश पावणारें क्षणिक असें जें सुख (विषयसंबंधी) त्याची प्राप्ती.

तेव्हां प्रारब्धभोगींही वर्ततां अचळस्थिती ।
न मोडे सर्वथा तोचि विश्वात्मा बिंब बोलिजे. ॥ ७
सर्वात्मत्वें पूर्णबिंब स्वयें आपण जेधवां ।
पूज्यपूजक तें भाव न दिसे द्वैतपूजनीं. ॥ ८
तेव्हां पूजक तो आत्मा पूज्यही तोचि अद्वय ।
पूजोपचारही सर्व त्यावीण न दिसे दुजें. ॥ ९
ऐसें सर्वैक्य ज्या झालें त्यासीच आत्मपूजन ।
घडलें अद्वयत्वें हें श्रुतिही[1] येथ संमत. ॥ १०
पूज्यपूजकऐक्यत्वें **'शिवो भूत्वा शिवं यजेत्'** ।
श्रुत्यर्थ गुह्य ऐसा कीं **शिव** होनि **शिवा**र्चिजे. ॥ ११
हाचि गुह्यार्थ षष्ठींही आत्ममननिं बोलिला ।
किं निर्धर्म नित्यमुक्त बिंबात्मा त्या मला नमो. ॥ १२
ऐसें प्रकरणीं षष्ठीं अंतीं हें गुह्य बोलिला ।
तेंचि स्पष्ट अष्टमीं या विस्तारयुक्त बोलतो. ॥ १३
म्हणोनि आत्मार्चन हें जेथुनी श्लोक तेथुनी ।
टीका समाक्षरी चाले, संगतिश्लोक हे पृथक्. ॥ १४

---

'जरि देहातीत होनि चिद्रूपीं स्वस्थ राहसी ।
करोनि तृणवत् सर्व होसी ब्रह्मैक्य तें स्वयें. ॥ १
ज्या ज्ञानें जाणसी सर्व तेंचि जाणूनि तन्मुख ।
करीं मन मग स्पष्ट स्वात्मप्रकाश देखसी. ॥ २
ज्याचेनि जाणसी **रामा**! शब्दादी विश्व कीं तया ।
जाण तत्वमसीवाक्यें[2] जीवेश ब्रह्म अद्वय. ॥ ३
पृथ्व्यादिभाव हे जेथें होती ज्याचेनि चेष्टती ।
त्यातें जीवेशं[3] ब्रह्मांतें ऐक्यत्वें जाण **राघवा**! ॥ ४
जें जें ज्ञेयें[4] न हें तत्व ऐसें त्यागूनि युक्तिनें ।
भावी तें मी असें ऐसें चिन्मात्र शेष जें उरे. ॥ ५
तुजहूनि भिन्न नाहीं ज्ञान त्याहूनि ज्ञेयही ।
न कांहीं अन्य यालागीं तस्माद्भेद असेचिना. ॥ ६

---

१. आपण स्वतः शिव होऊन शिवाची पूजा करावी. २. तत्+त्वम्+असि (तें ब्रह्मच तूं आहेस.) या महावाक्यास अनुसरून. ३. जीव, ईश (ईश्वर), ब्रह्म या तिहींस. ४. जाणण्याची वस्तु.

ब्रह्माविष्णुशिवेंद्रादि जें जें करिति सर्वही ।
तें मीचि चिद्रुपें सर्व करितों भावि हें सदा. ॥ ७
परमात्मा अव्ययें मी विश्व हें सर्व मद्रुप ।
मागें आतां पुढेंही जें भावी मजविणें नसे. ॥ ८
एक ब्रह्म चिदाकार सर्वात्मक अखंडित ।
निष्कंप भावि हें यत्नें निर्विशेष अशेषही. ॥ ९
मी माझें हें नसे द्वैत असे ब्रह्मचि शाश्वत ।
आनंद पूर्ण सर्वत्र ऐसें निश्चित सेविजे. ॥ १०
सामान्य सर्व जीवांच्या संबंधीं ग्राह्यग्राहकीं ।
योगियां सावधानत्व जें तेंचि आत्मपूजन. ॥ ११

---

## प्रकरण नववें.

पूर्वाष्टमप्रकरणीं ऐक्यात्मार्चन बोलिला ।
ते मोक्षावरिली[1] भक्ती अनन्याद्वैतरूपिणी[2]. ॥ १
अन्यत्वें भजतां हे तौं अद्वैतभक्ति होयना ।
स्थूळ साधन आरंभीं अज्ञत्वीं द्वैतभक्ति ते. ॥ २
करोनि साधनालागीं द्वैतभाव[3] धरोनियां ।
भजेल देव भक्तत्वें मोक्षाधिकारी होय तैं. ॥ ३
ऐसा मोक्षाधिकारी तो होईल जेधवां तधीं ।
उपजे ऐक्यजिज्ञासा तेव्हां साधक बोलिजे. ॥ ४
मोक्षाधिकारी म्हणिजे भजनें स्थळशुद्धता ।
झाली परंतु सामग्री मिळे तैं पाकसिद्धता. ॥ ५
तैसी सामग्रि ती येथें जे साधनचतुष्टय[4] ।

---

१. मोक्षानंतर प्राप्त होणारी. २. अनन्य असें जें अद्वैत तेंच आहे रूप जिचें अशी म्ह० केवळ शुद्ध अद्वैत. ३. मी भक्त वेगळा आणि मी ज्याची भक्ति करितों तो देव मजहून वेंगळा असें समजणें याला ‘द्वैतभाव’ किंवा ‘द्वैतभक्ति’ म्हणतात. ४. साधनांचें चतुष्टय (चहूंचा समुदाय) म्ह० चार साधनें. तीं अशीं:—(१) नित्यानित्यवस्तुविवेक=अविनाशी वस्तु कोणती आणि विनाशी किंवा नाश पावणारी कोणती या गोष्टीचा निर्णय. (२) इहामुत्रफलभोगविराग=इहलोकींच्या किंवा परलोकींच्या फळाच्या भोगाची इच्छा नसणें. (३) शमादिषट्कसंपत्ति=शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान हीं प्राप्त करून घेणें. (४) मुमुक्षुत्व=मला मोक्ष प्राप्त व्हावा अशी इच्छा.

तद्युक्त संपन्न होतां मग साधक बोलिजे. ॥ ६
जो साधक मुमुक्षू तो ब्रह्मजिज्ञासुही तया ।
बोलिजे कीं तया शीघ्र मोक्ष [1]आतुरता घडे. ॥ ७
ऐसी हे स्थळशुद्धीही झाली सामग्रि सिद्ध ही ।
परंतु न मिळे अग्नी तैं सर्व व्यर्थ होय तें. ॥ ८
यालागीं सद्गुरू साक्षात् प्रदीप्त अग्निरूप तो ।
जाळी शुभाशुभें सर्व [2]संचित क्रियमाणही. ॥ ९
असोनि व्याप्त सर्वत्र निर्धर्म तो सधर्मही ।
होऊनि स्वप्रकाशत्वें गूढत्वें संचरे क्षिती. ॥ १०
तेजें प्रदीप्त तो कोठें कोठें मंदहि होउनी ।
विचरे परि जें अंगीं मिळे तें जाळि तत्क्षणीं. ॥ ११
सजीवें निर्जीवें कांहीं न पाहे भेद भावना ।
अनन्य आपणाठायीं मिळे तें ऐक्यता करी. ॥ १२
ऐसा सद्गुरु अग्नी तो मिळतां तत्कृपान्वयें ।
[3]वाग्युक्तिरूपज्वाळेनें पचवी पाकसिद्धता. ॥ १३
म्हणिजे तोचि शिष्यातें ब्रह्मोपदेश उत्तम ।
पाक पचन तें मुख्य आदीं श्रवण बोलिजे. ॥ १४
झालें जरी श्रवणही मननावीण व्यर्थ तें ।
तें मंतव्यबुद्धिद्वारा घडावें बरवे रिती. ॥ १५
बुद्धि ही दों प्रकारें ती विषयीं वा स्वरूपिंही ।
वर्तणें तें [4]वामसव्य दों भागें कर दोनि ते. ॥ १६
त्या दोंमाजीं सव्यकरें स्वरूपोन्मुख बुद्धिनें ।
किजे मनन पाकाचें तेंचि भोजन बोलिजे. ॥ १७

---

१. आतुरता=उत्सुकता. २. जीवाचें कर्म तीन प्रकारचें:—संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण. अनादि कालापासून प्रस्तुत जन्म प्राप्त होईपर्यंत केलेलीं सर्व कर्मैं मिळून 'संचित' होतें. प्रवासास निघतेवेळीं जसें आपण कांहीं सामग्री बरोबर घेतों तसें सांप्रत जन्म घेतेवेळीं त्या संचितापैकीं जो भाग बरोबर आणिला त्याला 'प्रारब्ध' म्हणतात. प्रस्तुत जन्मामध्यें जीवाच्या हातून जीं कर्में होतात त्याला 'क्रियमाण' असें म्हणतात. ३. वाक्+उक्ति. वाक्=वाणी. उक्ति=बोलणें. तोंडानें शब्द उच्चारणें. ४. वाम=डावें. सव्य=उजवें. सव्य याचा संस्कृतांत डावें असाच अर्थ आहे परंतु मराठींत याचा अर्थ उजवें असा करितात.

भोजनावीण तो पाक केल्याही फळ काय तें ।
तैसें श्रवणही झाल्या मननावीण व्यर्थ तें. ॥ १८
परंतु जें मनन तें, साधकेंचि किजे बरें ।
याचा दोष[1] गुरुत्वातें न लागेचि कदापिही. ॥ १९
**'भावे हि विद्यते देवो'** ऐसें संमतही असे ।
तस्मात् पाक पचवणें अग्नीचें मुख्य लक्षण. ॥ २०
तैसें शिष्यास देशावें गुरुत्वीं हेंचि लक्षण ।
किजे भोजन पाकाचें जेंवि त्याचेंच लक्षण. ॥ २१
तैसें शिष्येंच मनन करावें मुख्य लक्षण ।
जेवितां भोजनीं युक्ती जाणावी जाणत्याकडे. ॥ २२
तैसें गुरूक्तिहीलागीं शास्त्रसंमत घेइजे ।
**'शास्त्रदृष्टिर्गुरोर्वाक्यं'**[2] ऐसें संमतही असे ॥ २३
ऐसें भोजन पाकाचें झालें मनन तें बरें ।
जिरलें पाहिजे अंगीं तो निदिध्यास उत्तम. ॥ २४
निदिध्यास तोचि मोक्ष तत्वमस्यार्थ[3] संमतें ।
कीं ज्या अज्ञान हृद्ग्रंथी[4] तुटणें ज्ञानमोक्ष तो. ॥ २५
ज्ञानावांचुनि अज्ञान न नासे भेदरूप जें ।
तें अज्ञान भेदरूप आत्मज्ञानेंचि नासुनी. ॥ २६
तें ज्ञान जीवशीवैक्य सर्वात्मक अभेद तें ।
निदिध्यासीं स्थीर होतां आत्मा निर्बंध मोक्ष तो. ॥ २७
ऐसा मोक्ष जरी झाला साक्षात्कार पृथक् उरे ।
तो मोक्षावरुती भक्ती घडे तैं लभ्य होतसे. ॥ २८
साक्षात्कार पूर्ण प्राप्ती साधनें होय ना कधीं ।
कृपानुग्रहसामर्थ्यें[5] गुरुदेवेंचि देइजे. ॥ २९
परंतु भक्ति अद्वैत अनन्यरूप होय तें ।

---

१. सांगावें, आज्ञा करावी. २. शास्त्र+दृष्टिः+गुरोः+वाक्यम्. शास्त्रदृष्टिः=शास्त्रांत सांगितलेली गोष्ट. गुरोर्वाक्यम्=गुरूचें सांगणें. ३. 'तत्वमस्यर्थ' असा पाठ असावा. तत्वमसि+अर्थ=तत्वमसि या महावाक्याचा अर्थ. (तें तूं आहेस.) ४. हृदयामध्यें बसलेली गांठ. यालाच 'हृदयग्रंथि, चिदचिद्ग्रंथि' असेंही म्हणतात. चैतन्य म्ह० काय व जड म्ह० काय याचा निर्णय नसल्यामुळें भलत्याला भलतीच संज्ञा देऊन मनांत जो घोटाळा होतो त्याला 'हृद्ग्रंथि' म्हणतात. ५. कृपा आणि अनुग्रह यांचा अर्थ एकच आहे.

कृपा करोनियां साक्षात्कार दावील सद्गुरू. ॥ ३०
अनन्यभक्ति ते ऐसी उपास्योपासकांमधें ।
ऐक्यात्मता भावयुक्त तेचि भक्ति अनन्यता. ॥ ३१
निर्निमित्त स्वयें आत्मा अवीट प्रियरूप जो ।
स्फुरे तोचि प्रियद्वावें ध्येयध्यानादि सर्वही. ॥ ३२
हें रहस्य[1] कळे तेव्हां सहजें ऐक्यभक्ति ते ।
होय कीं आवडी मुख्य प्रिय आपलि आपणा. ॥ ३३
प्रियात्मत्वें आवडी जे निर्निमित्तचि होतसे ।
तेचि ज्ञान[2] भक्ति चौथी गीतेमाजी निरोपिली. ॥ ३४
आर्त जिज्ञासु अर्थार्थी भक्त त्रिविध बोलिले ।
परि अज्ञानरूपी ते त्यांत ज्ञानीच श्रेष्ठ तो. ॥ ३५
म्हणोनि बोलिला कृष्ण भगवान् अर्जुनाप्रती ।
कीं ज्ञानिभक्ति ते एक परमप्रियरूप ते. ॥ ३६
ऐसेंच शिवगीतेंत द्वादशाध्यायिं श्रीशिवें ।
उपासनाविधी[3] चारी बोलिला श्रेष्ठ त्यामधें. ॥ ३७
संपद्विधीच म्हणुनि अद्वैतोत्तम बोलिली ।
ते स्थूल साधनातुल्य न घडे भक्ति केवळ. ॥ ३८
स्थूळसाधन जे भक्ति ते मोक्षप्राप्तिकारण ।
त्या मोक्षावरुती भक्ती ज्ञानी अद्वैत श्रेष्ठ हे. ॥ ३९
या अनन्यभक्तियोगें निदिध्यासींच वर्ततां ।
कृपेनें आत्मरूपाच्या साक्षात्कारासि दाविल. ॥ ४०
साक्षात्कारप्राप्ति हे ते तत्पदात्मक बोलिजे ।
साधनें त्वंपदात्म्याच्या नसे स्वाधीन यास्तव. ॥ ४१
त्वंपदींच स्थुळाधारीं पिंडब्रह्मांड बोलिलें ।
त्या ब्रह्मांड सहस्रारीं[4] स्वसत्तानुग्रहात्मक. ॥ ४२
निग्रहात्मक ही शक्ती घेउनी तत्पदात्मक ।
असे तो सद्गुरू साक्षाद्रूपें सांब सदाशिव. ॥ ४३
कृपेनें त्वंपदात्म्यातें अनेक जन्मसाधनें ।
अनुग्रहशक्तियोगें स्वसाक्षात्कार दावितो. ॥ ४४

---

१. गुह्य गोष्ट. २. ज्ञानानंतरची भक्ति. ३. संपत्, आरोप, संवर्ग आणि अध्यास असे उपासनेचे चार विधि. ४. सहस्रदलचक्रांत.

त्वंपदीं जें सहस्रार तेंचि ब्रह्मांड तत्पद ।
सिद्धांतपक्षें हा मार्ग बोलिला श्रीसदाशिव. ॥ ४५
वेदांतपक्षें जीवाच्या त्रयावस्थाच त्वंपद ।
यांचा साक्षी प्रत्यगात्मा तत्पदात्मक व्यापक. ॥ ४६
समष्टिरूप सर्वात्मा बिंबात्मा तोचि अन्वयें ।
श्रीमत्तारकसिद्धांतीं शिवसंमतही असे. ॥ ४७
एवं वेदांतसिद्धांतें पंचावस्थाच त्वंपदीं ।
तेथेंचि तत्वमस्यार्थ गुरु शिष्यासि बोधितो. ॥ ४८
परंतु त्वंपदात्म्याची उपाधिलय होउनी ।
अनंत चित्सुखात्म्याचा साक्षात्कार घडेल तैं. ॥ ४९
तत्पदात्मक ते प्राप्ती पूर्ण प्रसाद जैं घडे ।
तैं समाधि निर्विकल्प असंप्रज्ञात होतसे. ॥ ५०
मोक्षावरुति हे प्राप्ती जरी हे घडली नसे ।
तरिही तेवीण कांहीं प्रयोजन न खोळंबे. ॥ ५१
परंतु स्वस्वरूपाचें स्वसामर्थ्य अनंत हें ।
स्वयंज्योतिसुखानंद भोगणें अतिदुर्लभ. ॥ ५२
ते त्याचेच कृपायोगें प्राप्ती परम होइजे ।
म्हणोनि भावनायुक्त अनन्य भजिजे तया. ॥ ५३
असो हें बोलतां ग्रंथ वाढेल अपरांपर ।
मोक्षाची प्राप्ति हे तस्मात् निदिध्यासींच होतसे. ॥ ५४
तो निदिध्यास साद्यंत रामीं वसिष्ट बोलिला ।
एवं साता प्रकरणें उपदेश समस्तही. ॥ ५५
झाला संपूर्ण त्या अंतीं मोक्षावरिल भक्ति हे ।
अनन्यात्मार्चन असें बोलिलें गुह्यउक्तिनें. ॥ ५६
येथोनि संपला ग्रंथ परि पारंपराक्रमें ।
गुरुत्व घेउनी अंगीं शिष्योपदेश तो किजे. ॥ ५७
तेव्हांच उपदेशाची प्राप्ति झाली म्हणावि ते ।
पावला जो स्वयें प्राप्ती तेचि शिष्यासि देइजे. ॥ ५८
ऐसा हा मार्ग थोरांचा तो रामीं उपदेशिजे ।
म्हणोनि अन्य शिष्यांच्या हितार्थ क्रम बोलतो. ॥ ५९
परोपदेशीं ज्या युक्ती त्याचि आत्मनिरूपणीं ।

विस्तारें बोलतो आतां वसिष्ठ राघवाप्रती. ॥ ६०
त्याची समाक्षरी टीका जेथूनि श्लोक तेथुनी ।
कर्ता पृथक् चूर्णिका ही आत्माराम सदाशिव. ॥ ६१

---

'देहेंद्रियादि संघातीं स्फुरे तो मी स्वयें असा ।
भाव हा कीं शुद्रजीव तादात्म्य मळवेष्टित ॥ १
सर्व ब्रह्म चिदाकाश अशाच [1]घन निश्चयीं ।
स्थिति होय तई जीव शमे निस्तैलदीपसा. ॥ २
जसा विप्र दुराचारें स्वमहत्त्वास त्यागुनी ।
शूद्रत्वातें अंगिकारी तसें जीवत्व ईश्वर. ॥ ३
भ्रमें कल्पूनि हें देह तें मी मानी मृषाचि जें ।
मूढात्मा जीव तो बाळ मृषा [2]यक्षा भिये जसा. ॥ ४
[3]मृद्गजीं जेंवि हस्तित्व बाळ भाऊनि बोलतो ।
आत्मत्वीं भाउनी मूढ देहादि विचरे तसा. ॥ ५
चित्रसर्प परिज्ञानें न सर्पभय दे जसा ।
जाणिल्या जीव ब्रह्मत्वें तसा दुःखीं न दुःखद. ॥ ६
माळासर्प भ्रमांतीं हा माळेंतचि लयो घडे ।
आत्म्यास्तौं भेद जो भासे आत्मत्वीं लय तो तसा. ॥ ७
नाना नग तरी एक हेम जैसें असे तसें ।
जरी उपाधिनें नाना एकात्मा स्वरुपें तरी. ॥ ८
जसे देहीं अंगभाव मातींत घटविकृती ।
अद्वैत द्वैतसें भासे तसें स्थावरजंगम. ॥ ९
जळीं रत्नीं [4]घृतादर्शी बिंबे ही एक तें मुख ।
तसा आत्माहि बुद्धींत भासे एक अनेकसा. ॥ १०
मेघधूलिधुमें जैसें भासे मळिन तें नभ ।
तसा भासे विशुद्धात्मा [5]समळ प्राकृतीं गुणीं. ॥ ११
अग्निसंगें जसें लोह पावे अग्नित्व त्यापरी ।
आत्मसंगें आत्मतेतें पावतें इंद्रियादिक. ॥ १२

---

१. दृढ. २. यक्ष=भूत, पिशाच. ३. मृत्=माती, गज=हत्ती. मातीचा केलेला हत्ती. ४. घृत+आदर्श. द्वंद्वसमास. ५. मलसहित.

अदृश्य तो दिसे राहु देखिल्या इंदुनें जसा ।
तसा विज्ञानमात्रात्मा दृश्ययोगेंचि देखिजे. ॥ १३
देहादिसंगें आत्म्यातें अनात्मत्व जडासही ।
आत्मसंगेंचि आत्मत्व कीं अन्योन्य जळाग्निवत्. ॥ १४
आत्मा जन्म त्यजी ज्ञानें कीं चित्तांश मृषा जड ।
सागरीं जेंवि उष्णांबु मिळतां उष्णता नुरे. ॥ १५
इक्षूंत गूळ, पाषाणीं लोह, तेल तिळीं, तुप ।
धेनूंत, काष्ठींऽग्नी, यत्नें देहीं आत्मा मिळे तसा. ॥ १६
अच्छिद्रस्फटिकीं जैसें असे तें देखिजे नभ ।
तसा सर्व पदार्थीं हा चिद्रूप परमेश्वर. ॥ १७
बाह्यांतरीं स्फुरे ज्योति रत्नकुंभीं दिपापरी ।
स्वप्रकाशें जसी तैसें आत्मस्वरुप एक तें. ॥ १८
दर्पणीं बिंबला अर्क प्रकाशे बाह्य तो जसा ।
तसा प्रकाशी[1] बिंबात्मा शुद्धबुद्धींत बिंबला. ॥ १९
प्रतिबिंबरुपीं स्फूर्ति विश्वकारण जेथ हे ।
दोरीं भुजंगवत् आहे सच्चिदात्माच तो स्वयें. ॥ २०
व्योमादि बोलिलें जेथें न आद्यंत परात्पर ।
जीव स्फूर्तीस जो आद्य आत्मा सच्चित्सुखैक तो. ॥ २१
विशुद्ध चित्स्वरूपात्मा स्वसत्ता बिंब शाश्वत ।
निर्विकार स्वयंज्योति स्वभावार्क प्रकाशसा. ॥ २२
विज्ञानैकस्वरूपात्मा सर्वाश्रयहि व्यापक ।
न अन्य चित्प्रकाशीं हा अग्निउष्णत्वऐक्यवत्. ॥ २३
निरुपाधिक चिन्मात्र परमात्मा प्रकाशक ।
सबाह्यांतर्विश्वव्यापी निश्चळाश्रय निष्कळ. ॥ २४
आत्मा चिन्मय जो शुद्ध प्रबुद्ध बिंब अक्षय ।
ग्राह्यत्याज्यातीत देशकाळजात्यादि त्या नसे. ॥ २५
अलिप्त वायु ब्रह्मांडीं वर्ते सर्वभुतीं तसा ।
आत्मा तो भगवान् तस्मात् नित्यमुक्तपणें असे. ॥ २६
एवं चिदाकाश ब्रह्मीं चिन्सत्ता तेचि भास्करीं ।

---

१. प्रकाशित करितो.

पाताळीं भूतळीं व्योमीं सूक्ष्मत्वें भूतभौतिकीं. ॥ २७
बंध मोक्ष नसे द्वैत सोपाधित्वें न एकही ।
शाश्वद्ब्रह्म[1] असे तेंचि प्रकाशे ज्ञानविस्तरें. ॥ २८
चिद्ब्रह्म निर्विशेषें जें तेंचि सर्वहि अन्वयें ।
मी मच्छत्रू मित्रबंधु विश्वभूत परंपरा. ॥ २९
चित्तीं संकल्प तैं बंध तन्नाशें मुक्ति बोलिजे ।
चित् चेतव्य सर्व आत्मा शास्त्रसिद्धांत सर्वही. ॥ ३०
मी तूं चिद्रूप हे लोक चेष्टा सर्वहि हें जग ।
चिन्मात्रचि असे एथें मृद्घटापरि संग्रह. ॥ ३१
जें अस्ति जें भाति तदात्मरूप, भासे जरी अन्य मृषा विकल्प।
नसेंचि हें ग्राहक ग्राह्य सर्व,कीं तें स्फुरे केवळ चित्स्वभाव. ॥ ३२
योगवासिष्ठसारीं हे टीका समाक्षरी करी ।
व्यंकटाख्यमुखें आत्माराम सांब सदाशिव. ॥ ३३

---

प्रकरण दहावें.

पूर्वप्रकरणीं बोध विविधा युक्तिनें बरा ।
शिष्योपदेशविषयीं आत्मानुभव बोलिला. ॥ १
प्रथमादि अष्टमांत जें सविस्तर बोलिलें ।
संक्षेपयुक्त तें सर्व कथिलें नवमामधें. ॥ २
व्यतिरेकान्वयें आत्मानात्म बोध प्रतिष्ठिला ।
नाना दृष्टांत देवोनी विशदर्थ निरूपिला. ॥ ३
तेथें केवळ शुद्धात्मा षट्श्लोकें नित्यमुक्तही ।
दाविलीं लक्षणें स्पष्ट बोध होय जयारिती. ॥ ४
बंधमोक्ष नसे जेथें निरुपाधिक केवळ ।
[2]बोलेंनि बंधमोक्षाचें ज्ञान तेंही निरूपिलें. ॥ ५
तस्मात् सर्वात्मक ब्रह्म न तेथें ग्राह्य ग्राहक ।
भासे जें जें असे कांहीं सर्व चिद्ब्रह्म तें स्फुरे. ॥ ६
ऐशा अनुभवें आत्मा जाणोनि तदुपासना ।

---

१. 'शाश्वत' असा शब्द आहे, 'शाश्वत्' असा नाहीं. २. बोलाच्या योगानें.

निदिध्यासींच वर्तावें तें त्याची स्थिति बाणते. ॥ ७
म्हणोनि सांगतों रामा वसिष्ठ गुह्य उक्तिनें ।
कीं जें सर्वात्मक ब्रह्म तें अनन्य उपासितों. ॥ ८
म्हणिजे ब्रह्म तें आत्मा स्वयें आपण केवळ ।
सहजें प्रियरूपात्मा म्हणोनि प्रिय तो सदा. ॥ ९
अवीट आवडी त्याची निर्निमित्त प्रियात्मक ।
तेचि आवडि जे भक्ती ते अनन्य उपासना. ॥ १०
याचा हा भाव कीं आत्मा तो सर्वात्मक जेधवां ।
तेव्हां जीवेशऐक्यत्व निदिध्यास घडेल तैं. ॥ ११
ईश्वरें बोलिलीं जीं कां निर्भयत्वादि लक्षणें ।
तीं सर्वही जिवा अंगीं स्वयें ईशचि प्रेरितो. ॥ १२
कीं हा स्वभाव वस्तूचा अद्वैतभक्त ईश्वरा ।
आवडे म्हणुनी देतो आपलीं लक्षणें तया. ॥ १३
**'अनुकंप्या भवंतीह ब्रह्मविष्णुशिवादयः'** ।
पंचमीं गुह्य हें बोले कीं ज्ञानी भक्त तो प्रिय. ॥ १४
ध्येयाचें करितां ध्यान ध्याता तद्रूप होतसे ।
[1]भृंगीकीटकदृष्टांतें हें तौं प्रसिद्ध लौकिकीं. ॥ १५
ऐसी उपासना ध्यानें स्वयें नित्य उपासितों ।
म्हणिजे त्वांही हे ऐसी उपासावी निरंतर. ॥ १६
परंपरायुक्त शिष्य करिशील तयांसही ।
करावा हाचि [2]आदेश कीं हे उपासना किजे. ॥ १७
म्हणोनि याच गुह्यार्थें करी उपासना असी ।
आज्ञा न करितां स्पष्ट अभिप्रायेंचि सांगतों. ॥ १८
आत्म्याच्याही कळा गुह्य शून्याशून्य निरूपणें ।
सांगेल दशमीं आतां वसिष्ठ राघवाप्रती. ॥ १९
त्याची समाक्षरी टीका जेथूनि श्लोक तेथुनी ।
जगद्गुरू स्वयें कर्ता संगतिश्लोक हे पृथक्. ॥ २०

---

१. आतां भृंग येऊन आपल्याला मारील असा कीटास ध्यास लागतो त्यामध्यें त्याला सर्वकाळ भृंगच दिसूं लागतो तेणेंकरून तो कीटच भृंग होतो, त्याप्रमाणेंच जीवाला ईश्वराचा ध्यास लागल्यानें तो ईश्वररूप होतो. २. आज्ञा.

'दृश्यदर्शन संबंधें अनंतसुख होय ना ।
तेंचि एकांतवृत्तीनें पावे स्वात्मोन्मनीपद. ॥ १
विषयेंद्रियसंबंधीं जें सुख ज्ञान क्षुल्लक ।
दृश्यसंकल्प तो बंध तन्नाशें मुक्ति बोलिजे. ॥ २
जडाजडीं शुद्ध ब्रह्म जाणोनि संग्रहूनि ते, ।
ऐक्य बाह्यांतरीं विश्व त्यागात्याग करूं नको. ॥ ३
नभसें सदसज्ज्ञानी [1]पारमार्थिक तत्व जें ।
सत्सुखानंतहृदय तदाश्रय करीं सदा. ॥ ४
द्रष्टयास दृश्यसंकल्प तोचि हा बंध बोलिजे ।
संकल्पें बद्ध तो द्रष्टा तन्नाशें मुक्त होतसे. ॥ ५
द्रष्टृदर्शनही दृश्य वासनांसह त्यागुनी ।
कारणत्वें दर्शन जें आत्मा तोचि उपासितों. ॥ ६
अस्ति नास्ति द्वयामध्यें नित्य व्यापक अद्वय ।
अर्कादिकां प्रकाशी जो आत्मा तोचि उपासितों. ॥ ७
नि[2]द्रादि जागरांतीं जो सुखाविर्भाव तो स्वयें ।
भोगूनि मग जो साक्षात् अक्षयानंद तो उरे. ॥ ८
सर्वसंकल्पशांतत्वें निर्विकल्प शिळे असी ।
न जेथ जागृती निद्रा ते [3]स्वरूप परा स्थि[3]ती. ॥ ९
जडता टाकुनी पूर्ण शिळेसी हृदयस्थिती ।
[4]उन्मनीरूप जें रामा होई तन्मय सर्वदा. ॥ १०
सत्यानंदचिदाकाशस्वरूप परमेश्वर ।
न अन्य घट मातींत तेंवि सर्वच व्यापक. ॥ ११
[5]नेपरावर या शब्दीं परिपूर्ण चिदंबुधी ।
ज्ञानैकविश्व ऊर्मित्वें स्वयें आत्मा प्रकाशतो. ॥ १२
आकाशवत् दिशाकुंज पूर्ण व्यापक सर्वही ।
विश्वचिन्मात्रैक वस्तु अनंतांबुधि तोयसें. ॥ १३

---

१. खरें. २. जागराचे अंतीं आणि निद्रेच्या आरंभीं सर्व वृत्तींचा लय होतो म्हणून त्या वेळेस सुखाचा अनुभव येतो. ३. स्वरूपस्थिति=स्वरूपामध्यें राहणें असा समास समजून 'परा'=उत्तम हें त्या समासाचें विशेषण समजावें. किंवा 'ते परा स्वरूप स्थिति' असाच पाठ करावा. ४. जागृति, स्वप्न, सुषुप्ति, तुरिया या मनाच्या चार अवस्थांहून भिन्न अवस्था. ५. पर=पलीकडील, अवर=अलीकडील हीं दोन्हीं ज्यास नाहींत असें.

शाश्वत् व्यापक पूर्णत्वें ब्रह्मव्योमा न भिन्नता ।
परि व्योम शून्य यास्तौं ब्रह्म अधिक चित्सुखें. ॥ १४
न हाले अतिगंभीर पूर्णानंद सुधार्णव ।
असे एकचि सर्वत्र माधुर्यैकरसाश्रय. ॥ १५
निश्चयें सर्व हें ब्रह्म श्रुत्यर्थें आत्मप्रत्ययें ।
तेथ मी भिन्न हें भिन्न ऐसें ऐक्य न भेदिजे. ॥ १६
ऐसें व्यापक जें ब्रह्म अखंडरूप जाणिलें ।
तें हा संसारविस्तार परमेश्वररूप कीं. ॥ १७
ब्रह्मची सर्व हें ऐसें भावितां ब्रह्म तो स्वयें ।
पीतां अमृत कीं ऐसा नोहे अमर कोण तो ? ॥ १८
होसी ब्रह्म तरी सर्व निश्चयें ब्रह्म पावसी ।
हें ना तैं मद्वहूक्तीही त्वच्छ्रोत्रीं भस्मि होमिल्या. ॥ १९
ब्रह्मज्ञेंही ब्रह्म मी हें अभ्यासावें तुवां सदा ।
कीं कतकनाममात्रें जलशुद्धी न यास्तव. ॥ २०
वासुदेव परब्रह्म या नामें मीचि अव्यय ।
ऐसा निश्चय तें मुक्ति अन्यथा तेचि बद्धता. ॥ २१
नेतिनेतिनिरासें जें उरे शेष परंपद ।
त्यागकर्ते नुरे तें तें मी हें जाणूनि हो सुखी. ॥ २२
ब्रह्म सच्चित्सुखात्म्यातें एकातें जाण सर्वदा ।
कीं ध्याता ध्येय या भेदें अखंड खंडिसी कसें ? ॥ २३
तो मी चिन्मात्र कीं ऐशा चिंतना ध्यान बोलिजे ।
ध्यानही जें विरे सम्यक् तें ते समाधि बोलिजे. ॥ २४
ज्ञानाभ्यासें तीव्र होय संप्रज्ञातसमाधि कीं ।
ब्रह्माकारमनोवृत्तीप्रवाह हंकृतीविना. ॥ २५
येऊं कल्पांतवायू वा मिळो एकत्र सागर ।
द्वादशादित्यही तापू, परि ज्ञाता न डंडळे. ॥ २६
सच्चित्सुखैक जे सत्ता साक्षि विश्वोद्भवीं लयीं ।
पूर्णानंदघनावस्था स्वात्मत्वें जाणिजे तितें. ॥ २७

---

१. ब्रह्म आणि व्योम(=आकाश) यांना. २. कतक (बीज)=निवळीचें बीं. हें बीं गढूळ पाण्यांत टाकलें असतां गाळ तळीं बसून पाणी तत्काळ स्वच्छ होतें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ३. न+इति+न+इति+निरास=हें ब्रह्म नव्हे तें ब्रह्म नव्हे असा सर्वांचा निषेध करून. ४. डळमळे.

हें चराचर जें कांहीं दृश्य सर्व मनोमय ।
मनाच्या उन्मनीभावें न दिसे द्वैत निश्चयें. ॥ २८

निर्धर्म शिव जे शांत त्या प्रियत्वीं जगस्थिती ।
चिदात्मा एक तो येथें चराचर विलीसक. ॥ २९

अहिकंचुक[1] ते अहि आत्मपणें, त्वगत्याग तदादिस मीच म्हणे ।
त्यजि तीस बिळीं मग हं न मेनी[2], अहि जाण तसें तनु आत्मपणीं. ॥ ३०

जे त्यागा पहिली स्वकंचुक तितें मानी 'अहित्वात्मता
ते बीळीं त्वग टाकितां मग तितें पाहे न सर्पात्मता. ।
एवं हा अहि त्यापरी स्वतनुसी आत्मा जगद्व्यापक
तादात्म्यें तिस मी म्हणे विवरितां तें मी नमी चित्सुख. ॥ ३१

निषिद्धें त्यागिना दोषें विहितें नाचरे गुणें ।
स्वभावें विचरे धर्मीं उभयातीत बाळसा. ॥ ३२

जसी अलेखिता[3] स्तंभीं पुतळी तद्रुपें असे ।
तसें विश्व असे ब्रह्मीं कार्यहीन न कारण. ॥ ३३

पुत्री न कोरित[4] स्तंभीं बीजत्वें ना नसे तसें ।
अन्योन्य विश्व ब्रह्मैक्य सधर्मत्वें न शून्यता. ॥ ३४

शांततोयीं मृषा ऊर्मी स्फुरती मुरती तसे ।
ज्ञानाज्ञानें जगत् ब्रह्मीं शून्याशून्य पदीं लय.' ॥ ३५

**यो**गवासिष्टसारीं हे टीका समाक्षरी करी ।
**व्यं**कटाख्यमुखें **आ**त्माराम **सां**ब **स**दाशिव. ॥ ३६

---

**दशमप्रकरणांतील अवतारिका.**

ॐ नमो तारक ब्रह्म षोडशाक्षरव्यापका ।
ॐकाररूप पंचांगा पंचत्रिंशत्सुपंचका. ॥ १

नमो वेदांतसिद्धांता तत्वमस्यार्थरूपका ।
अनुत्तराख्यमंत्रज्ञा षट्त्रिंशत् तत्वद्योतका. ॥ २

नमो पंचाशत्सुवर्णा तद्बीजा बीज अन्वया ।
पंचाक्षरस्वरूपैक्या एवं मंत्रार्थसंज्ञका. ॥ ३

---

१. सापाची कांत. २. मानितो. ३. कोरून न काढलेली. ४. कोरलेला.

नमो सर्वार्थ सर्वेशा द्वैताद्वैतप्रवर्तका! ।
नमिता नम्य नमना एवं त्रयप्रकाशका! ॥ ४
अथ किं बहुना स्वामी जड चैतन्य अद्वया! ।
वाच्यावाच्यस्वरूपैक्या सर्वानन्या नमो नमो. ॥ ५
एवं दाहा प्रकरणें गुरुशिष्योपदेश जो ।
श्रीरामा श्रीवसिष्ठें हा बोधिला सकळ क्रम. ॥ ६
असंख्य योगवासिष्ठ ग्रंथ हा बोलिला असे ।
परंतु अल्पधीलागीं नाकळे सकळार्थ तो. ॥ ७
म्हणोनि सकळार्थातें आकळूनि स्वकार्य तें ।
व्हावयालागिं हें सार दाहा अध्याय काढिले. ॥ ८
क्षीराब्धि मथुनी जेंवि सार अमृत काढुनी ।
देवांतें प्राशवी विष्णू कृपाळ मोहिनीरुपें. ॥ ९
तैसींच योगवासिष्ठीं जीं हीं प्रकरणें दहा ।
काढिलीं तेथ सर्वार्थ स्वल्पग्रंथींच दाविला.॥ १०
त्यामाजि प्रथमारभ्य नवमावधिपासुनी ।
वेदांततत्वमस्यार्थ सर्व सिद्धांत बोलिला. ॥ ११
एवं ऐक्यात्मबोधातें सच्चिदानंदलक्षणें ।
व्यतिरेकान्वयें पूर्ण प्रातीतें स्पष्ट बोलिलें. ॥ १२
या प्रातीवरुती जे कां अतिगुह्यार्थ ते कळा ।
दाविली दशमीं स्पष्ट जेथें वेद मुकावले. ॥ १३
**'[1]यतो वाचो निवर्तंते अप्राप्यमनसा सह ।**
ऐसें वेदेंचि संज्ञेनें अगम्यत्वासि दाविलें. ॥ १४
तेंही गुरुत्वसामर्थ्यें परमानंदरूप जें ।
तें बोलूनि तयापर्तें अनिर्वाच्यहि दाविलें. ॥ १५
हें निर्धर्म अनिर्वाच्य निर्निमित्त प्रियात्मक ।
प्रियद्रावस्फुरद्रूपें सधर्म तेंचि होउनी. ॥ १६
स्फुरद्रूप अधिष्ठानीं सधर्मत्वीं विवर्त हा ।
विश्वाभास मृषा भासे त्याचें मिथ्यात्व जाणुनी. ॥ १७

---

१. यतः वाचः निवर्तंते. अप्राप्यमनसा सह. मनासह वाणी म्ह० मन आणि वाणी हीं दोन्हीही ज्याला प्राप्य न होतां मागें फिरतात असें तें ब्रह्म अनिर्वाच्य आहे.

अखंडानंद आत्मत्वीं निदिध्यासेंचि स्थैर्यता ।
घडे अनुभवाची तैं साक्षात्कारासि पावणें. ॥ १८
तो साक्षात्कार आत्म्याचा होतां निःशेष वृत्तिचा ।
लयो होय समाधी ते असंप्रज्ञात बोलिजे. ॥ १९
शिळेसी जडतां देहीं निर्विकल्प समाधि ते ।
तिचेंही बोलिलें रूप दशमीं विशदार्थ तें. ॥ २०
होतां समाधिउत्थान सर्वात्मकस्वरूप तें ।
बोलूनि दावी सहज संप्रज्ञात समाधि ही. ॥ २१
ब्रह्माकारमनोवृत्तीप्रवाह हंकृतीविना ।
म्हणोनि बोलिला तेचि संप्रज्ञात समाधि जे. ॥ २२
ऐसें सर्वात्मक ब्रह्म तद्ध्यानें वृत्ति तन्मय ।
अवस्था उन्मनी तेचि संप्रज्ञात समाधि ते. ॥ २३
जें हें सर्वात्मक ब्रह्म सधर्मानंद कोश तो ।
स्फुरद्रूप अधिष्ठान तेथें विश्वविवर्त हा. ॥ २४
अज्ञानें भासतो ज्ञानें मृषा समुळिं होतसे ।
दृष्टांतयुक्त हें बोले दशमींच असे रिती. ॥ २५
कीं न कोरितस्तंभींही बीजत्वें पुत्रिका असे ।
म्हणोनि त्याच स्तंभीं ते कोरितां पुतळी दिसे. ॥ २६
याचा भाव असा कीं हा निर्धर्म काष्ठ जेधवां ।
पुतळीचें चित्र तेथें काढितांही नयेचि कीं. ॥ २७
वृक्षाचें काष्ठ निर्धर्म त्याचा स्तंभ करील तें ।
सधर्म बोलिजे काष्ठ तेव्हां चित्रास आश्रय. ॥ २८
या भावें बोलिला येथें शून्याशून्य पदान्वयें ।
म्हणिजे स्तंभदृष्टीनें चित्रभाव दिसेचिना. ॥ २९
स्तंभविस्मृतिनें भासे चित्र दृष्टीस त्यापरी ।
सधर्म कारणीं कार्य विश्व ब्रह्मीं अभिन्न तें. ॥ ३०
ब्रह्मानुभवदृष्टीनें विश्वाची शून्यता घडे ।
ब्रह्मविस्मृतिनें भास विश्वाचा ते अशून्यता. ॥ ३१
एवं शून्याशून्य पदें ज्ञानाज्ञानें उदोलय ।

---

[illegible] संस्कृतांत पुल्लिंगी आहे. मराठींत स्त्रीलिंगी समजतात.

विश्वाचा होतसे ब्रह्मीं ऐसा सिद्धांत बोलिला. ॥ ३२
तस्मात् सधर्मींच ब्रह्मीं बीजत्वें विश्व बोलिलें ।
तें मायोपाधिचैतन्य सधर्म ब्रह्म बोलिजे. ॥ ३३
येथ संमतही आहे 'समायं ब्रह्म उच्यते' ।
म्हणोनि वाक्यसिद्धांतीं बोलिला श्रीसदाशिव. ॥ ३४
मायामय विश्व तस्मात् मनोकल्पित सर्व हें ।
ब्रह्मीं ब्रह्मत्वही माया उन्मनी ते सधर्मक. ॥ ३५
अवस्था उन्मनी तेंचि बीजत्वें मन बोलिजे ।
स्वरूपोन्मूख म्हणुनी शुद्धविद्या चिदाकृती. ॥ ३६
सधर्मात्मक हा वस्तुस्वभाव सहजें घडे ।
निर्धर्म ब्रह्मीं हें कांहीं न लागेचि कदापिही. ॥ ३७
ऐसा सर्वहि सिद्धांत वसिष्ठें राघवाप्रती ।
स्वरूपाच्या स्थितीचाही बोलिला दशमामध्यें. ॥ ३८
एवं दाहा प्रकरणें योगवासिष्ठसार हा ।
बोलिला ग्रंथ साद्यंत स्पष्ट गुह्यहि उक्तिनें. ॥ ३९
त्याची समाक्षरी टीका आत्माराम सदाशिवें ।
बोलिली ग्रंथ आद्यंतीं कांहीं हे अवतारिका. ॥ ४०
व्याप्य व्यापक सर्वात्मा आत्माराम सदाशिव ।
कर्ता कारयिता तेंव्हां स्वयें तोचि जगद्गुरू. ॥ ४१
सर्वनामें सर्वरूपें नटनाट्यविलास हा ।
सूत्रधारक होवोनि स्वयें तोचि विलासितो. ॥ ४२
तेंव्हां नाट्यरुपें [1]सोंगी सोंग संपादितो जसें ।
त्र्यंकटाख्यमुखें तैसें टीकाकर्तृत्व दाखवी. ॥ ४३
ऐसें असोनि देहत्वें कवित्वअभिमानता ।
जो धरी अल्पबुद्धीनें तेणें महत्त्व तें नये. ॥ ४४
महत्त्व यश जें येणें किंवा अपेश भोगणें ।
ईश्वराधीन तें सर्व जीवाअधीन तें नसे. ॥ ४५
म्हणोनि ईश्वरीसत्तें होणार तेंचि होइल ।
ऐसा विश्वास मानोनी भावार्थ धरिजे बरा. ॥ ४६

---

१. सोंगाड्या, नट.

'**भावे हि विद्यते देवो**' ऐसें संमत हें असे ।
म्हणोनि सर्व सद्भावें ईश्वरीं भार घालिजे. ॥ ४७
यश अपेश देणार भगवंत धनी किजे ।
त्याची इच्छा जसी तैसें तो करीलचि निश्चयें. ॥ ४८
न थोरपण कर्तृत्वीं हा निश्चय कळावया ।
श्रीकृष्ण अवतारीं हें निज लाघव दावितो. ॥ ४९
कीं सद्भक्ति तेचि राधा श्रीकृष्णीं होय मेहुणी ।
लौकिकीं म्हणुनी नित्य अनन्य प्रीति दोहिंची. ॥ ५०
ऐसा बाळपणीं कृष्ण राधा नेऊनि स्वगृहीं ।
सौंदर्य पाहुनी त्याचें मनीं सकाम होय ते. ॥ ५१
तो मनोरथ जाणोनी श्रीकृष्ण भगवान् स्वयें ।
तीच्या मनोरथा तुल्य धरोनि पुरुषाकृती. ॥ ५२
अनन्यभक्तिच्या योगें पूर्ण काम करी तिचा. ।
त्यामध्यें विविधा युक्ति विलासीं खेळ खेळतो. ॥ ५३
तेथें राधा स्वस्तनींच्या मणिअग्रावरी धरी ।
श्रीकृष्ण तोहि स्वानंदें तिच्या कुचाग्रिं खेळतो. ॥ ५४
ऐसें चरित्र श्रीकृष्णें अनेकरिति दाविलें ।
गोकुळीं असतां तेथें अपूर्वाणिक दाविलें. ॥ ५५
कीं इंद्रें अतिवृष्टीतें केलें गोवर्धना तधीं ।
कराग्रीं धरुनी कृष्णें मूळीं गोकूळ रक्षिलें. ॥ ५६
या चरित्रें सदा लोकीं कृष्णातें नाम ठेवुनी ।
गोवर्धनधारि ऐसें वर्णिती संतसज्जन. ॥ ५७
कर्तृत्व पाहतां येथें केवढें सहजें कळे ।
कीं मेरुपर्वतातुल्य नव्हे वा तो हिमाचळ. ॥ ५८
विंध्याद्रीसम हा नव्हे ऐसे कित्येक थोर ते ।
असती मोठमोठेही त्यामाजि लघु केवळ. ॥ ५९
गोवळे वसती जेथें तो गोवर्धन पर्वत ।
उचली भगवान् कृष्ण म्हणोनि यश वर्णिती. ॥ ६०
ऐसे पर्वत हे सर्व ब्रह्मांडीं असती अशीं ।
अनंत कोटि ब्रह्मांडें रोमरंध्रीं जयाचिया ॥ ६१

फिरती तो असा साक्षात् श्रीकृष्ण अवतार हा।
अनंतकोटिब्रह्मांडनायकें म्हणती तया. ॥ ६२
स्वकुचाग्रीं त्यासि राधा उचलोनि धरी परी।
कृष्णधारीं असे तीतें कोणी यश न वर्णिती. ॥ ६३
हें प्रत्यक्ष पहा ऐसे निदर्शन विचित्र कीं।
लघुत्वीं महता दावी महत्त्वींही लघू तसें. ॥ ६४
तस्मात् कर्तृत्व कैसेंही झालें या न महत्त्व तें।
महत्त्व यश ते सत्ता ईश्वराधीन बोलिजे. ॥ ६५
ऐसा हा अल्पधीलागीं विश्वास ईश्वरीं बरा।
धराया बोधविस्तार स्वचित्तासीच बोलिला. ॥ ६६
एवं ग्रंथसमाप्ती हे टीका समाक्षरी स्वयें।
बोलिली चूर्णिकायुक्त आत्माराम सदाशिवें. ॥ ६७
श्रोता वक्ता स्वयें तोचि त्यावांचोनि नसे दुजें।
वस्तुत्वें ईश्वरत्वेंही तोचि चैतन्य चाळक. ॥ ६८
म्हणोनि वाक्पुष्पमाळा मनोसूत्रें ग्रथोनियां।
अनन्यभावनायुक्त नाथपायीं समर्पिली. ॥ ६९
सेव्यसेवक तो एक परंतु भक्तिच्या मिषें।
भजावा देव हें ऐसें श्रुतीचें वाक्य संमत. ॥ ७०
पूर्वींही बोलिलें आहे '**शिवो भूत्वा शिवं यजेत्**'।
ऐक्यत्वें भजतां देव होतसे सुप्रसन्न तो. ॥ ७१
त्याचे कृपेन हें ज्ञान बाणतें स्थितिही घडे।
म्हणोनि ऐक्य सद्भावें भजावाचि निरंतर. ॥ ७२
ऐसें भजन हें नित्य करावें परि प्राक्तनें।
न घडे तेधवां भाव मात्र धरूनि अंतरीं. ॥ ७३
भजनाच्या मिषें ग्रंथीं वाणी पवित्र होउनी।
टीकावर्णन तें पुष्पें गुरुपायीं समर्पिलीं. ॥ ७४
ऐसी समाक्षरी टीका संगतिश्लोकही पृथक्।
असो अनन्य वाक्पुष्पें सद्गुरूपदिं अर्पण. ॥ ७५

---

## २५. निरंजनबुवाकृत

### केशवचैतन्यकथातरु.

जयजया जी मंगलमूर्ति । त्रैलोक्यपावन जयाची कीर्ति । देवासुरमान वर्णिती । विघ्नसमाप्ती व्हावया. ॥१॥ परमात्मा जो प्रकृतिपर[1] । तो विनायकरू धरिला अवतार । तयाचें नाम विघ्नहर । देव यास्तव ठेविती. ॥ २ ॥ ब्रह्मयां[2] सिंदुरासुरासी । वर दिधला अविनाशी । आलिंगन देशील जयासी । तं नाशासि पावेल पैं.[3] ॥ ३ ॥ ऐसें होतांचि वरदान । तेणें ब्रह्मयावरि केलें प्रस्थान[4] । पुढें ब्रह्मा मागें आपण । सिंदुरासुर लागला. ॥ ४ ॥ तेव्हां संपूर्ण देवें तुज प्रार्थिलें । सिंदुरासुरासि वधावया वहिलें । गजाननरूप धारण केलें पार्वतीचे उदरासीं. ॥ ५ ॥ चतुर्भुजव्यक्ति[5] गौरवर्ण । शुंडादंड लंबायमान शूर्पाकृति शोभती कर्ण । भाळ विशाळ नेटकें. ॥ ६ ॥ नेत्र आरक्त जैसे हिरे । वक्र तुंड अतिसाजिरें । मुगुटावरि खोंविले तुरे । दूर्वांकुरांचे लसलसित. ॥ ७ ॥ एकदंत करीं झळाळा । गळां नवरत्नांच्या माळा । पीतांबर वेष्टिला पिंवळा । भाळीं कस्तूरीतिलक. ॥ ८ ॥ सर्वांगीं चर्चिला सेंदुर । कटीतटीं मेखळा फणीवर । रत्नखचित कटकें केयूर । रक्तांबर विलसतसे. ॥ ९ ॥ फरश पाशांकुश रदन । हस्तीं आयुधें शोभायमान । विशाळ दोंद मूषक वहन । गौरिनंदन शोभतसे ॥ १० ॥ ऐसा गणपति देवें वंदिला । जेणें सिंदुरासुर वधिला । तो म्यां आरंभीं स्तवियेला । ग्रंथसिद्धि पावावया. ॥ ११ ॥ मूळ-माया जे चिच्छक्ति । ती हे शारदा सरस्वती । हंसवाहन पुस्तक हातीं । वीणा-वादन करितसे. ॥ १२ ॥ चवदा विद्या चौसष्टि कळा । जिचे ठायीं वसती सकळा । वागेश्वरी ब्रह्मबाळा[6] । ग्रंथारंभीं वंदिली. ॥ १३ ॥ आतां वंदूं श्रीसद्गुरु । जो या भवसागरिंचा तारुं[7] । मोक्षदाता कल्पतरु । अति उदारु

---

१. प्रकृतीहून पर म्ह० निराळा, किंवा श्रेष्ठ. प्रकृतीलाच 'योगमाया' म्हणतात. 'चिदानंदमयब्रह्मप्रतिबिंबसमन्विता । तमोरजःसत्वगुणा प्रकृतिः.' हिचे माया व अविद्या असे दोन प्रकार आहेत. सांख्य शास्त्रांत प्रकृति व पुरुष हे शब्द प्रधान आहेत. प्रकृति आणि पुरुष यांच्या संयोगापासून सकल जडसृष्टीची उत्पत्ति आहे. 'कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते' (भगवद्गीता, १३, २०.) २. हा प्रयोग व्याकरणशुद्ध नाहीं. ३. चाल, हल्ला. ४. सत्वर, लवकर. ५. आकार, आकृति. 'व्यज्यतेऽनया इति व्यक्ति.' ६. सरस्वती ही ब्रह्मदेवाची पत्नी आहे. ब्रह्मदेवानें तिला आपल्या आंगापासून उत्पन्न केलें म्हणून लाक्षणिक अर्थानें कन्या असें म्हटलें आहे, असा मत्स्यपुराणांत (अ० ३,४) खुलासा आहे. ७. 'वारु' असा पाठभेद आहे, पण तें रूपक किती असंबद्ध होतें हें सांगणें नकोच.

सर्वार्थी. ॥ १४ ॥ जनस्थान गोदातीरनिवासी । रघु नामें आनंदरासी । जेणें विज्ञान[1] बोधोनि मजसी । निरंजन नाम ठेवियेलें. ॥ १५ ॥ जो योगींद्र-चक्रवर्ति । लोकत्रयीं जयाची कीर्ति । शांतिक्षमेची केवळ मूर्ति । लोकोद्धारा प्रगटली. ॥१६॥ श्रीदत्तात्रयसाक्षात्कार[2] । व्हावया मजसीं जयाचा वर । तयासी माझा नमस्कार । ग्रंथारंभीं असो हा. ॥ १७ ॥ आतां वंदूं संत सज्जन । जे सच्चिदानंद[3] स्वयें आपण । असोनि उद्धरिती जन । कृपानिधान दयाळ.[4] ॥ १८ ॥ श्रीपरमात्मा जगद्गुरु । जगदाधिष्ठान[5] परात्परु । तया करूनि नमस्कारु । ग्रंथारंभ करितसे. ॥ १९ ॥ जो ब्रह्मरूपें जग अवतारी । विष्णुरूपें पालन करी । रुद्ररूपें सकळ हारी । पुनरपि तें रचावया. ॥ २० ॥ श्रीविष्णू जो वैकुंठवासी । तो चतुश्लोके[6] ब्रह्मयासी । भागवतमिसें उपदेशी । आत्मतत्वालागीं पैं. ॥ २१ ॥ ब्रह्मयानें नारदा कथिलें । नारदें व्यासासीं बोधिलें । पुढें कलियुग प्राप्त जालें । तंव शिष्य न मिळे अधिकारी.[7] ॥ २२ ॥ व्यास चिंतिती मानसीं, । 'जें

---

१. विशेष ज्ञान तें विज्ञान असा धात्वर्थ; 'मनानें मनच ज्ञानाचा विषय केला, म्हणजे जो विचार होतो, तें विज्ञान—मन ज्ञानविषयीभूत होणें, हेंच विज्ञान...... मन ज्ञानाला विषयभूत केल्यानंतर बरें वाईट समजतें आणि त्याची आवडनिवड करितां येते. यालाच विवेक अथवा विज्ञान अशी संज्ञा आहे. यालाच सदसद्विचारशक्ति असेंही नांव अलीकडे दिलेलें आहे......विज्ञानाचा व्याप मनुष्यसृष्टींत ज्ञानापेक्षांही अधिक आहे. शिष्टाचार, राजदंड, दंडनीति, गृहस्थिति यांचा पाया विज्ञान आहे......ज्यांत परब्रह्माचें स्वरूप आविर्भूत होत असतें असा विज्ञानमय कोश मनोमय कोशाच्या पलीकडचा आहे. तेणेंकरून सृष्टि विज्ञानमय आहे अशी प्रतीति होते......आल्हाद व क्लेश परावलंबी आहेत; त्यांच्या पलीकडचें सुखदुःख (आत्म्याचें) हें कांहीं निराळें आहे, आणि तें विज्ञानमय आहे.' (न्या० मू० रानडे यांचीं धर्मव्याख्यानें, विज्ञान). २. हा प्रत्यक्ष दर्शनाचा योग कवीनें 'साक्षात्कार'ग्रंथांत साकल्यानें वर्णिलेला आहे. ३. 'सर्व सजीव व निर्जीव सृष्टीचें कारण 'सत्' म्हणजे जड द्रव्य आहे, 'चित्' म्हणजे आपलें मन व विज्ञान हेंच सृष्टीचें कारण आहे, व 'आनंद' विश्वांत भरला आहे, विश्वाची रचना कल्याणकारक आहे म्हणून विश्वाचें कारण आनंदरूप ब्रह्मच आहे' या मानवी विचाराच्या तीन अवस्थांची 'सच्चिदानंद' शब्दांत व्याप्ति आहे, असा न्या० मू० रानडे यांनीं अनुवाद केला आहे. (रानडे, धार्मिक व्याख्यानें ३८३.) ४. श्रीधर कवीनें अशाच प्रकारें संतांचें महिमान वर्णिलें आहे. (वेदांतसूर्य, प्रक० १, ओ० ७२ ७९.) ५. जगताचें अधिष्ठान म्ह० आश्रयस्थान. ६. या चार श्लोकांचें वामन पंडितांनीं भाषांतर केलें आहे. (वामनपंडित, स्फुटकाव्यें, भाग ३, ७१ पद्य.) एकनाथानेंही चतुःश्लोकी भागवताचें ओंवीबद्ध भाषांतर केलें आहे. ७. अधिकारी शिष्याचें वर्णन श्रीधरांनीं वेदांतसूर्यांत प्र. ५, १०१–१२७ मध्यें फारच मार्मिकपणानें केलें आहे तें पहावें.

सर्वसुखाची राशी । तें आत्मतत्त्व कोणासी । सांगू आतां या काळीं ?' ॥ २३ ॥
तंव **राघव** नामें द्विजसत्तम । जो उत्तमामाजी उत्तम । अनुष्ठानांतीं अ
निःसीम । व्रतालागीं आचरे. ॥ २४ ॥ उत्तमूनाम[1] नगरी । **मांडवी पुष्पाव**
तीचे तीरीं । राहोनियां बहुकाळवरी । तप आचरता जाहला. ॥ २५ ॥ व्हा
**व्यास**[2]ाचें दर्शन । हेचि इच्छा धरुनी पूर्ण । वातांबु पर्णाशन । करुनि देह शुध्द
केला. ॥ २६ ॥ जाल्या नखांच्या चुंबळी । आंगावरी वाढली धुळी । जट
लोंबती भूतळीं । देह शुष्क जाहला. ॥ २७ ॥ तंव **सत्यवतीहृदयनंदन**
**श्रीव्यास** येऊनि आपण । देऊनियां अभयदान । मस्तकीं हस्त ठेविला
॥ २८ ॥ जो तत्त्वज्ञानाचा उपाय । **'नमो भगवते वासुदेवाय'** । प्रणव-
युक्त हा मंत्रराय । कर्णामाजीं सांगितला. ॥ २९ ॥ परमहंसदीक्षा देऊन ।
बोधिते जाले तत्त्वज्ञान । तेणें मूळ अविद्या निरसुन । परमानंद जाहला.
॥ ३० ॥ उठले अष्ट सात्त्विक[3] भाव । चंचळ मनाची मोडली धांव[4] । कल्प-
नेनें सांडिली हांव । ब्रह्मवस्तु अनुभवितां. ॥ ३१ ॥ अष्टांगयोगाच्या[5] कळा ।
**द्वैपायनें** कथिल्या सकळा । अगोचरी[6] मुद्रा डोळां । आखंडित बाणली.
॥ ३२ ॥ मावळोनि गेली बुद्धि । जाली निर्विकल्प समाधि । गेल्या सर्वही
आधिव्याधी । सुखसमृद्धि जालिया. ॥ ३३ ॥ मग जयजयकार बोलुन ।
केलें श्रीगुरूचें स्तवन । करूनियां साष्टांग वंदन । चरणीं मस्तक ठेविला.
॥ ३४ ॥ शिष्य पाहुनी परम धन्य । नाम ठेविलें **राघवचैतन्य** । संपूर्ण
जगीं होशिल [मान्य] । ऐसा वर दिधला. ॥ ३५ ॥ **व्यास** निजाश्रमीं गेल्यावरी ।
**राघवचैतन्य** त्या वनामाझारी । व्याघ्रादिक नाना वनचरीं । वसते जाले नि-
र्भयें. ॥ ३६ ॥ तें स्थान अति गहन । अनेक जातींचे पक्षीगण । नाना
वृक्षांचें निबिड वन । चिंचिनी आम्र असती. ॥ ३७ ॥ स्वस्तिकादि नाना

---

१. हें पुणें जिल्ह्यांत जुन्नर तालुक्यांत जुन्नरापासून चार पांच कोसांवर –'ओतूर' या नांवानें प्रसिद्ध आहे. पुष्पावती ऊर्फ कुसुमावती ही मांबोरीच्या डोंगरांतून निघून ओतूराहून चार मैलांवर हिंवरें बुद्रुक येथें कुकडी नदीस मिळते. २. राघवचैतन्याचे गुरू व्यास नसून वडवाळसिद्ध नागनाथ होते अशी माहिती नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. ३. 'स्तम्भः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः । वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्विकाः स्मृताः ॥.' ४. 'हाव' असा पाठभेद आहे, पण वरील पाठ सयुक्तिक वाटतो. ५. हीं आठ अंगें–यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधी होत. ६. अंतरंत पाहाण्याची धारणाप्रकरणांतली चौथी मुद्रा.

आसनें[1] । नित्य करावीं निश्चळपणें । पूरक[2] कुंभक रेचन । प्राणायाम[3] करावा. ॥ ३८ ॥ जालंदर[4] आणि उडयान[5] । तिसरा मूलबंध[6] जाण । अपानातें ऊर्ध्व करून । अधोगमन[7] प्राणाचे. ॥ ३९ ॥ करूनि कुंडनीप्रबोध[8] । सुषुम्नेचा[9] शोधिला मार्ग । कर्णी अनुहाताचा[10] शब्द । श्रवण करित असावा. ॥ ४० ॥ नासिकांतरीं वाहे श्वास । नित्य सहस्त्रदळीं[11] सहवास । पद अविनाश । जया

---

१. अभ्यासाच्या वेळेस मांड्यापासून खालच्या अंगाची जी स्थिति होते, तीस 'आसनें' म्हणतात. हीं ८४००० असून ८४ प्रमुख मानितात. २. 'पूरक,' 'कुंभक' व 'रेचक' हीं प्राणायामाचीं तीन अंगें आहेत. बाहेरचा वायू नासिकाद्वारें हळू हळू आंत ओढणें तो 'पूरक'; ह्या आंत ओढलेला वायू मस्तकरूपी कुंभांत सांठवितात, त्या क्रियेला 'कुंभक' म्हणतात; आणि कोंडलेला वायू हळू हळू बाहेर सोडण्याच्या क्रियेस 'रेचक' म्हणतात. ३. 'सुमारें साडेबारा सेकंड पूरक करून पन्नास सेकंड कुंभक करावा व मग पंचवीस सेकंड रेचक करावा म्हणजे कनिष्ठ प्रतीचा प्राणायाम होतो.' ४. 'कंठमाकुंच्य हृदये स्थापयेच्चिबुकं दृढम् । बंधो जालंदराख्योऽयम्'; कंठ आकुंचन करून हनुवटी वक्षस्थलावर दाबून बसविली असतां 'जालंधर बंध' होतो. (ज्ञानेश्वरी, ६,२०७–२०८.) ५. बेंबीच्या वरच्या उदरप्रदेशाचें पाठीकडे आकर्षण करण्याच्या क्रियेला 'उड्डियान बंध' म्हणतात. (ज्ञानेश्वरी, ६,२०९–२१०.) ६. पायाच्या खोटेनें गुदस्थान व लिंग याच्यामधील शिवण जोरानें दाबून गुदस्थानाचें आकुंचन करून अपानवायूचें अधोगमन बंद करून त्याला ऊर्ध्वगामी करणें, या क्रियेस 'मूलबंध' म्हणतात. (ज्ञानेश्वरी, ६,१९२–१९९.) ७. 'कुंडलिनी' जागृत झाली म्हणजे नासिकेबाहेर जाणाऱ्या प्राणवायूला अधोगमनी करिते. ८. ही नाभीखालीं साडेतीन वेटोळीं घालून बसलेली सर्पाकार शक्ति. ही साऱ्या योगोपायांचा आधार समजतात व ही जागृत झाल्यानें हृदयांतील सर्व चक्रें व गांठी शिथिल होतात. (हठयोगप्रदीपिका, ३,१–२.) ज्ञानेश्वरी, ६,२२२–२४१ पहा. ९. देहामध्यें साडेतीन लाख नाड्या आहेत, त्यांपैकीं १४ मुख्य मानितात, व त्यांतही इडा, पिंगळा, व सुषुम्ना या श्रेष्ठ. 'सुषुम्ना' ही सर्वांत मुख्य असून परमपदाची दात्री आहे. हिचें स्थान 'इडा' व 'पिंगळा' यांच्यामध्यें असून दुसऱ्या साऱ्या नाड्या हिच्या आश्रयानें राहतात. हिचे 'शून्यपदवी,' 'ब्रह्मरंध्र,' 'महापथ,' 'स्मशान,' 'मध्यमार्ग,' 'शांभवी' इत्यादि पर्यायवाचक शब्द आहेत. १०. 'अनाहत' असा शुद्ध शब्द. 'अनाहत' नामक हृदयस्थ चक्र आहे. षण्मुखीकरण करून ध्यान केल्यानें अनाहत ध्वनि उमटून समाधि लवकर लागते. (ज्ञानेश्वरी, ६,२७४–७६.) हा अष्टांगयोग श्रीधरांनीं 'वेदांतसूर्यां'त थोडक्यांत वर्णिला आहे. (प्रक० ७,२२०–२३४ पहा.) ११. योग्यांनीं आपल्या शरीरांत पिंडांत सहा व ब्रह्मांडांत सहा अशीं बारा चक्रें कल्पिलेलीं आहेत. यांच्याही वर सहस्त्रदल चक्र आहे. हें मेंदूच्या वरतीं अधर असें चक्र आहे, व याची कांति अवर्णनीय आहे. मनुष्यदेहांतील परमात्म्याचें विश्रांतिस्थान येथेंच असून यास त्रिकूटशिखर, मेरुशिखर अशीं अन्यनांवें आहेत. सत्रावी जीवनकळा येथेंच असून या सहस्त्रदळी कमळांत विसांवा घेणें हेंच योग्याचें आद्यकर्तव्य आहे.

म्हणती. ॥ ४१ ॥ सर्वदां असावे निवृति । भूतमात्रीं समान स्थिति । आंगा-वरी सर्प पक्षी बैसती । निर्भयत्वें येऊनि. ॥ ४२ ॥ अष्ट महासिद्धींचा[1] पोळा[2] । भोंवता होऊनि गोळा । आज्ञा मागती वेळो वेळां । स्वामीलागीं प्रार्थुनी. ॥ ४३ ॥ धैर्याचा मेरू अचळ । अंगीं वैराग्याचें बळ । कदाचित् प्राशन करावें जळ । अन्न न खावें सर्वथा. ॥ ४४ ॥ एकमासपर्यंत एका वृक्षीं । द्वितीयमासीं दुसरे वृक्षीं । उडोनि जातो जैसा पक्षी । तैसें जावें निजांगें. ॥ ४५ ॥ नग्नवृत्ति[3] दिगंबर । शयन करावें वृक्षांवर । एका वृक्षीं ठेवूनि शिर । दुज्या वृक्षीं चरण पैं. ॥ ४६ ॥ कदाचित् सिद्धासन[4] घालुन । वृक्षाग्रीं बैसावें जाउन । करावें शीतोष्णाचें सहन । ऐसा काळ बहु गेला. ॥ ४७ ॥ राघवचैतन्य यापरी । एकाकी वसतां वनामाझारी । पुढें कथा वर्तली ते चतुरीं । श्रवण केली पाहिजे. ॥ ४८ ॥ राघवचैतन्यालागुन । केशवचैतन्य[5] गेले शरण । त्याची विस्तारें करून । पूर्वकथा वर्णिली. ॥ ४९ ॥ पूर्वकथेचें अनुसंधान । श्रोते विचारोत भाविक जन । नृसिंहभट परम सुजन । पूर्वकथा त्याची परिसावी. ॥ ५० ॥ कर्नाटक[6] देशाचे अंतरीं । तृणामल्ल[7] नामें नगरी । देशपांडे तेथील अधिकारी । असते जाले निर्धारें. ॥ ५१ ॥ तेथें शिवगंगा[8] महान सरोवर । त्याचे आग्नेयकोनास त्रिंबकेश्वर । नित्य पूजा उपचार । करीत होते बहु जन. ॥ ५२ ॥ ब्राह्मणीं करावें पूजन । नित्य रुद्रावर्तनेंकरून । त्रिंबकेश्वरापासीं जाऊन । करिते जाले सर्वही. ॥ ५३ ॥ कांहीं दिवस जाल्यावर । शिवालय पाहुनियां थोर । यवनें[9] त्रास[10] मानूनि क्रूर । होता जाला तये

१. अणिमा आदिकरून अष्टमहासिद्धी. ज्ञाने० ६,२९६–९७ पहा. २. समुदाय, घोळका. ३. मूळ पोथींत 'नम्रवक्ति' असें आहे. 'नग्नव्यक्ति' असाही पाठ आहे. ४. 'वाम पायाचा तळवा गुदाच्या आणि उपस्थानाच्या मध्यप्रदेशीं ठेवून दक्षिण पाय शिश्नावर ध्यावा, आणि हनुवटी होईल तितकी छातीवर ठेवून इंद्रियें विषयांपासून परावृत्त करून दोन्ही भिवयांमध्यें दृष्टी ठेवून राहणें' हें सिद्धासन. (हटयोगप्रदीपिका.) ५. हेच राघवचैतन्याचे शिष्य व तुकारामाचे गुरू. याच्या कुलाचा वृत्तांत येथून पुढें वर्णिलेला आहे. ६. प्राचीन दक्षिणदेशविभागांत हा 'दारुजल फर' ऊर्फ विजापूर सुभ्यांतला एक सरकार होता. ७. हें हल्लींचें 'तिनेवल्ली' आहे असें म्हणतात. ८. या नांवाचा कर्नाटक सरकारांत एक महाल होता, तेथेंच 'तृणामल्ल' व उपरिनिर्दिष्ट सरोवर असावें. (भारतवर्ष, वर्ष १,८, 'दख्खनचे प्राचीन देशविभाग' पहा.) ९. हा यवन बहुधा तेथील अधिकारी असावा, अगर छोटा जमीनदार संस्थानिक असावा. १०. पीडा-हा प्रकार बहुधा ब्राह्मणी बादशाही स्थापन होण्याच्या सुमाराच्या धामधुमीच्या काळांत घडलेला असावा. तत्कालिन मुसलमान हिंदूंचा भारी छळ करीत असत.

वेळीं. ॥ ५४ ॥ मनीं आणिलें सत्वर । ब्राह्मणाचा मोडावा थार[1] । अवघे मिळोनि करिती विचार । त्रास द्यावा निश्चयेंसी. ॥ ५५ ॥ ऐसें आणोनि मनांत । शिवालयावरी घुमट बांधूं लागत[2] । सर्व ब्राह्मण नृसिंहभट । गेले बोलावया तेथें. ॥ ५६ ॥ यवनाप्रति बोलते जाले जाण, । 'आम्ही येथील[3] अधिकारी पूर्ण । शिवालय मोडूं जाणतोसी पण । होईल मोठा घात पैं येथें.' ॥ ५७ ॥ इकडे यवनानें काय केलें । गंवडी पाथरवट बोलाविले । 'खणा रे! खणा, वहिलें[4] । बोलता झाला निष्ठुरत्वें. ॥ ५८ ॥ कामगार लागती खणावयासी । ब्राह्मणी स्त्री पुरुष योगराशी । अवघे मिळाले उपवासी । शिवालयासंनिध. ॥ ५९ ॥ सर्व ब्राह्मण देवावर । पडते जाले सत्वर । 'या दुःखाचा परिहार । निवारण करीं देवराया!' ॥ ६० ॥ पायीं धरूनियां ब्राह्मणां । ओढूनि टाकिती ते क्षणां । ब्राह्मण म्हणती, 'नारायणा! । काय संकट आम्हां पैं केलें?' ॥ ६१ ॥ यवनास दुर्धर क्रोध येऊन । ब्राह्मणांच्या स्त्रिया आणून । त्यांचे शिरावरी पाषाण देऊन । ताडिता जाला निजांगें. ॥ ६२ ॥ कित्येक स्त्रियांचें गर्भपतन । लहान बाळकें भूमीं आपटून । स्त्रियांचे स्तनीं सांडस[5] लावून । हाहाकार पैं केला. ॥ ६३ ॥ ब्राह्मणांच्या कंठास दोर बांधून । कुपांत घालूं लागला जाण, । 'आतां आठवा शिवालागून' । ऐसें बोले सक्रोधें. ॥ ६४ ॥ तेव्हां स्त्रिया म्हणती, 'न[6] हे आमचे पती । आम्हां देऊनि यवनाचे हातीं'. । महान सरोवराच्या भोंवतीं । हाहाकार पैं जाहला. ॥ ६५ ॥ ब्राह्मणांस संकट पडलें गाढें । शिवासी प्रार्थिती निजकोडें, । 'धांव रे! धांव आम्हांकडे' । उच्चस्वरें रुदन करिती. ॥ ६६ ॥ असो. ब्राह्मणास त्रास देऊन । त्यांचें हिरूनि घेतलें धनधान्य, । वतनेंही हस्तगत करून । घालवूनि दिधले तेथूनियां. ॥ ६७ ॥ वृद्ध ब्राह्मण नृसिंहभट । तेथुनी निघाले अवचट । नारायणगिरीवरी[7] चोखट । तप करिते जाहले. ॥ ६८ ॥ येरीकडे काय वृत्तांत । यवन शिवालय खणीत । रक्ताचा स्राव भडभडत । निघता जाला तेधवां. ॥ ६९ ॥ यवनें आश्चर्य मानूनि थोर । बंद केले सकळ कामगार । पूजाउपचार करून थोर ।

---

१. आश्रय; रहिवास. २. हा त्या काळचा भाषणसंप्रदाय (Idiom) असून 'देवालयाची मशीद करणें' अशा अर्थी याचा उपयोग होत असावा. ३. शिवालयांतील. ४. स्वयें. ५. चिमटा. ६. मूळांत 'नव्हे' आहे; पण त्यामुळें अर्थबोध होत नसल्यामुळें वरील दुरुस्ती (आमच्या समजुतीप्रमाणें) केली आहे. ७. हा बालाजीचा 'गिरि' असेल काय? जुन्नराजवळ नारायणगांवानजीकच्या 'नारायणगडा'स भाविक लोक या कथेंतला 'नारायणगिरी' समजतात, पण हें चुकीचें दिसतें.

भजनगजर पैं केला. ॥ ७० ॥ 'शिव कोपला आम्हावर । जाळून टाकिल सकळ नगर' । ऐसी भीति मानूनि सत्वर । स्तब्ध होता जाहला. ॥ ७१ ॥ यवनीं करुनी विचार, । 'येथुनि ब्राह्मण गेले गिरीवर । आतां त्यांसीं घेऊनि येऊं सत्वर' । असा निश्चय मनीं केला. ॥ ७२ ॥ आपण दूत पाठवुनि सत्वर । घेऊनियां पूजाउपचार । दंडवत नानाप्रकार । करिता झाला तमे- वेळीं. ॥ ७३ ॥ दूत सांगे वर्तमान, । 'राज्य देतों तुम्हांलागुन । द्रव्य घरें वैतनें आपण । देऊं निश्चयार्थी ब्राह्मणां.' ॥ ७४ ॥ ब्राह्मणीं संतोष मानुन । नगराप्रति आले जाण । शिवगंगाभोंवतीं संपूर्ण । बोलते जाले आनंदें. ॥ ७५ ॥ त्यावरी जाऊनियां देवालयांत । शिवस्तव करिते जाले अद्भुत, । प्रेमाश्रुपूर लोटत । स्वानंदसुख अनुभवितां. ॥ ७६ ॥ ब्राह्मणांस देऊनि धनधान्य । त्यांचें [1]संतोषलें मन, । 'आम्हावरीं शिव त्रिनयन । प्रसन्न जाला वाटतसे.' ॥ ७७ ॥ वाजत गाजत आणिले गृहासी । सर्व जन येती भेटावयासी । ब्राह्मणीं सं- तोष मानुनी चित्तासीं । परमानंद पैं केला. ॥ ७८ ॥ सर्व ब्राह्मण गिरी- वरून । आले तेथें असें करून । तेथें नृसिंहभट राहून । तप करिते जाहले. ॥ ७९ ॥ वृत्ती जाली उदासीन । अष्टांगयोगसाधन । करूनियां पूर्णपणें । देह शुष्क पैं केला. ॥ ८० ॥ प्रथममासीं निराहार । दुसरे मासीं प्यावें नीर । ऐसें तप करूनियां थोर । शुकयोगींद्रासारखें. ॥ ८१ ॥ करूनि [2]पंचाग्नीसाधन । [3]धूम्रपानीं होऊनि निमग्न । जटा पादपरियंत [4]लेंबुन । नारायणीं बुद्धि ठेली. ॥ ८२ ॥ घालोनियां सिद्धासन । नित्य करावें [5]भस्मधारण । अक्षयीं नारा- यणाचें [6]ध्यान । आदरेंसीं करावें. ॥ ८३ ॥ 'देवा! देह करवतीं घालीन । कीं जीव पर्वतीं देईन । किंवा [7]फेनीं जाईन बुडोन । देवराया! श्रवण करीं. ॥ ८४ ॥ नलगे मज पुत्र धन । तुझें नलगे मज धनधान्य । आतां हा किंकर जाण । पायातळीं ठेवावा.' ॥ ८५ ॥ देवास संकट पडलें गाढें, । 'याचें निवारावें कोडें । [8]याहीं घातलें आम्हां [9]सांकडें । प्राणनाश करिल हा.' ॥ ८६ ॥ ऐसा करूनि विचार जाण । नृसिंहभट निद्रासंपन्न । होतांच स्वप्नीं येऊन । बोलता जाला निर्धारें. ॥ ८७ ॥ ब्राह्मणाचा वेष धरून । स्वप्नीं येऊनि नारायण ।

---

१. संतोषविलें; किंवा संतोष पावलें. २. चारी बाजूंस अग्नी पेटवून सूर्य हाच पांचवा अग्नी कल्पून तपश्चरण करणें. ३. मूळांत 'धूम्रपाणी' असें आहे. ४. वाढून; लांब होऊन. ५. पोथींत 'भस्मोद्धारण' आहे. ६. चित्ताला कोणत्याही स्थानीं बांधून ठेवणें म्ह० धारणा, तिचा जो एकसारखा अनुभव त्याला 'ध्यान' म्हणतात. ७. येथें लक्षणेनें 'समुद्रांत किंवा जलसंचयांत' असा अर्थ घ्यावयाचा. ८. पोथींत 'नाहीं' आहे. ९. संकट.

भक्ताचें वाढवावया महिमान । करुणावचनें बोलत. ॥ ८८ ॥ 'अगा माझ्या बाळका! । तुजलागीं शिणविलें फुका, । तुझ्या निवारावया शोका । होईन पुत्र तुझा मी. ॥ ८९ ॥ तुझिया तपें करून । बहु संतोषलें मन, । आतां तुवां येथुन । जावें' ऐसें आज्ञापिलें. ॥ ९० ॥ ऐसें बोलोनि नारायण । स्वप्न म्हणूनि संतोषलें मन । नारायणगिरिवरी जाण । ब्राह्मणभोजन बहु केलें. ॥ ९१ ॥ कांहीं दिवस जाल्यावर । प्रस्थान करिते जाले सत्वर, । नृसिंहभट पूजा उपचार । घेऊनि गेले देवालयीं. ॥ ९२ ॥ पूजा करूनि त्वरित । सांष्टांग केला प्रणिपात, । 'आतां देवराया! त्वरित । येतों' पुसोनी. ॥ ९३ ॥ मार्गीं चालतां सत्वर । तों अकस्मात् पाहिलें गंगातीर, । मध्यान्हासीं आला दिनकर । क्षुधा बहुत लागली. ॥ ९४ ॥ नृसिंहें मनामाजी आणिलें । आतां गंगास्नान करावें वहिलें । ऐसें बोलुनि सिद्ध जाले । स्नानालागीं करितसे. ॥ ९५ ॥ गंगेमाजीं उभे राहुन । करीत होते अघमर्षण[1] । नृसिंहमूर्ति[2] हातां लागुन । परम संतोष पावले. ॥ ९६ ॥ नृसिंह हातामाजीं घेऊन । षोडशोपचारें पूजा करून । चरणीं मस्तक ठेवून । परमानंदें डुल्लतसे. ॥ ९७ ॥ नृसिंहभट गमन करित । स्त्री आनंदीबाईसहित । आले पुणेवाडीस निश्चित । परमानंदें करोनियां. ॥ ९८ ॥ कांहीं दिवस जाल्यावर । आनंदीबाईस जाला कुमर । शंख चक्र आयुधें सुंदर । पीतांबर वनमाळा. ॥ ९९ ॥ रम्य मूर्ति पीतवर्ण । कटीतटीं मेखळा दिव्य जाण । 'सोडोनियां वैकुंठभुवन । आलों येथें तुजलागीं.' ॥ १०० ॥ ऐसें बोलोनियां वचन । हृदयीं आनंदी आनंदली जाण । गर्भा नाहीं आली वेण[3] । प्रत्यक्ष नारायण उभे ठेले. ॥ १०१ ॥ 'तुझे उदरास आलों आतां । तुवां न करावी सर्वथा चिंता' । ऐसें बोलोनि तत्त्वतां । अदृश्य होता जाहला. ॥ १०२ ॥ आनंदी देहावरी येऊन । पाहे तंव जाला नंदन । अति हर्ष[4] करोनि पूर्ण । मुखचुंबन करितसे. ॥ १०३ ॥ तेरावा दिन होतां पूर्ण । नाम ठेविलें विश्वनाथ जाण, । स्नान घालुनी निंबलोण । करिती जाली आदरें. ॥ १०४ ॥ नारायण प्रत्यक्ष येऊन । आपलें नाम विश्वनाथ ठेवून । ज्येष्ठ बंधु त्रिंबक पूर्ण । तृतीय पुत्र बापु जाला. ॥ १०५ ॥ त्रिंबकबापुनें करावा संसार । विश्वनाथ बाबा पुजेसी तत्पर । संसार न करोनी

१. उदक मंत्रावयाच्या वेदऋचेनें पाणी मंत्रून पापक्षयार्थ त्याचें अवघ्राण करण्याची नित्यब्रह्मकर्मांतली ऐक क्रिया. २. अजून यांच्या वडील घराण्यांत देवपूजेंत एक नृसिंहमूर्ति आहे, व ती हीच अशी दंतकथा वंशजांच्या ऐकण्यांत आहे. ३. वेदना, कळा. ४. 'हास्य' असा पाठभेद आहे.

उदार । ऐसे असते जाहले. ॥ १०६ ॥ त्यावरी लोटले दिवस कांहीं । नृसिंहभट कैलासवासी जाले पाही । त्रिवर्ग बंधु एके ठायीं । राहाते जाले सर्वदां. ॥ १०७ ॥ कांहीं काळ राहोनि तेथें । पुढें गमन होईल ओतूरातें । [1]ते कथा ऐकिजे स्वस्थचित्तें । द्वितीयाध्यायीं सज्जनीं. ॥ १०८ ॥ निरंजन रघुनाथ जनस्थानवासी । कथा वर्णिली पुण्यराशी । श्रवणमात्रें गुरुभक्तांसीं । [2]आल्हाददायक निश्चयीं. ॥ १०९ ॥ श्रीचैतन्यविजयकल्पतरू । संपूर्ण फलदायनी उदारू । श्रवण पठणें दुःखपरिहारू । होईल श्रोत्यावक्तयांचा. ॥ ११० ॥

---

## अध्याय दुसरा.

ऐसें गुरुभक्तांचें महिमान । ऐकतां संतोष पावे मन । त्रिवर्ग बंधू एके ठायीं जाण । असतां अद्भुत वर्तलें. ॥ १ ॥ बंधु त्रिंबकभटजीसहित । विश्वनाथभट बाबा [3]तेथ । राहते जाले निवांत । तंव पुढें [4]कलह वर्तला. ॥ २ ॥ बाबांची वृत्ती उदासीन । त्रिकाळ करावें संध्यास्नान । [5]धर्मालागीं उदार पूर्ण । गृहकृत्य कांहीं करूं नये. ॥ ३ ॥ [6]बंधूनें करूनि अनादर । भाषण केलें बहु कठोर । हस्त धरूनि गृहाबाहेर । विश्वनाथभटजीस घातलें. ॥ ४ ॥ त्याची पत्नी गिरिजाबाई । समागमें निघाली ते समयीं । बरोबर कांहीं घेतलें नाहीं । एका वस्त्रें निघालीं. ॥ ५ ॥ करुनी तीर्थयात्रेचा उद्देश । निघते जाले त्रिंबकेश्वरास । येऊनि राहिले ओतूरास । वस्तीलागीं उभयतां. ॥ ६ ॥ वस्त्र नाहीं नेसावयासी । अन्नही न मिळे खावयासी । ऐशा विपत्तीनें त्रासासीं । स्त्रीनें बहुत दिधलें. ॥ ७ ॥ म्हणोन घोर वनामाझारीं । बाबाजी निघाले सत्वरीं । मांडवी पुष्पावतीचे तिरीं । स्नानसंध्येसी बैसले. ॥ ८ ॥ वज्रप्राय स्त्रियेचें वचन । स्मरोनियां अंतःकरण । होऊनियां अतिदैन्यवाणें । रुदन करूं आरंभिलें. ॥ ९ ॥ तंव नारद भेटतां भुवाला । बहुतांपरि संतोष जाला । तैसें पूर्व पुण्य आलें उदयाला । विश्वनाथभटजींचें. ॥ १० ॥ जैसा व्यासपुत्र शुकयोगींद्र । तपोनिधि ज्ञानसमुद्र । तैसा राघवचैतन्य यतींद्र । पाठीं उभा राहिला. ॥ ११ ॥ म्हणती, 'तूं कोण आलासी येथें ? । किमर्थ करितोसी शोकातें ? । खेद सोडुनि स्वस्थ चित्तें । वृत्तांत सांगें सर्वही.' ॥ १२ ॥ करुनि साष्टांग

---

१. 'ते कथा चित्त देऊनि ऐकिजे स्वस्थें' असा पाठ आहे. २. 'आल्हाददायो' असा दुसरा पाठ आहे. ३. पुणेंवाडीस. ४. भांडण. ५. दानधर्माविषयीं. ६. हा अपमान करणारा भाऊ बाबाहून वडील अगर लहान होता हें कळत नाहीं.

नमस्कार । बाबाजी सांगती दुःखाचा प्रकार । म्हणती, 'महाराज! हा संसार । घोरांदर मज जाहला. ॥ १३ ॥ मीं रुगुशाखाध्यायी ब्राह्मण । विश्वनाथ माझें अभिधान । पुण्यग्रामीं वृत्तीलागुन । बंधूसहित राहिलों. ॥ १४ ॥ तेथें कांहीं काळ असतां । बंधूनें करुनि अतिनिर्दयता । आम्हां स्त्रीपुरुषां उभयतां । गृहाबाहेर घातलें. ॥ १५ ॥ तेथूनि ओतूरासी आलों । एका ब्राह्मणाचे गृहीं राहिलों । तेथेंही स्त्रीभाषणें पीडिलों । तें काय किती सांगावें? ॥ १६ ॥ भार्या म्हणे, 'अहा रे दैवा! । दुःख जालें माझिया जिवा । पती मिळाला नाहीं बरवा । कैसें आतां करावें ? ॥ १७ ॥ पोटीं नाहीं पुत्रसंतान । पदरीं नाहीं कांहीं धन । वस्त्र फाटूनि जालें जीर्ण । पोटभरी अन्न मिळेना. ॥ १८ ॥ कानीं नाहीं बाळीबुगडी । मिळालीं नाहीं चांगलीं लुगडीं । सुख नाहींच अर्धघडी । जालें याचे संगतीनें. ॥ १९ ॥ आपण मिळविना अधेला। मिळालें दे ब्राह्मणांला । म्हणुनि बंधूनें घालविला । हात धरुनि बाहेरीं. ॥ २० ॥ हा कोणाचें आर्जव न करी । नाक धरुनि बसतो घरीं । जाईना कां गिरिगव्हरीं । स्नानसंध्येलागीं पैं'. ॥ २१ ॥ ऐसीं स्त्रियेचीं दुर्भापणें । समक्ष ऐकूनियां कर्णें । त्रास घेतला माझिया मनें । म्हणोनि आलों या स्थळीं. ॥ २२ ॥ कोणाची स्त्री ? कोणाचा बंधू ? । हा अवघा दुःखसंबंधु । तुम्हां ऐसा दयासिंधु । भेटतां सुख होतसे. ॥ २३ ॥ या त्रैलोक्याचे ठायीं । स्वामी! मजला कोणी नाहीं । पुढें संततीही कांहीं । जाली नाहीं सर्वथा.' ॥ २४ ॥ ऐसें ऐकुनि दीन वचन । श्रीराघवचैतन्य आपण । या दुःखासीं विभागी होऊन । बोलते जाले आदरें. ॥ २५ ॥ 'विश्वनाथा! ऐकोनि घेईं । मजलाही पुत्र नाहीं । याचें उत्तर लवलाहीं । सांगें मजलागीं तूं. ॥ २६ ॥ तूं म्हणसी मज कोणी नाहीं । तरी तुज मी आहें सर्वस्वही' । ऐसें म्हणोनि लवलाहीं । पूर्णकृपा पैं केली. ॥ २७ ॥ विश्वनाथासी आपुले । स्वामींनीं मांडीवरी बैसविलें । मुखालागीं कुरवाळिलें । निजहस्तें करुनियां. ॥ २८ ॥ कृपादृष्टि अवलोकिलें । बहुतांपरी संबोखिलें । परी चित्त बाबाचें उबगलें । स्त्रियेविषयीं सर्वथा. ॥ २९ ॥ म्हणती, 'पुरे हा संसार । माझी भार्या क्रोधी फार । जैसी तरवारीची धार । तैसी तीव्र बोलती. ॥ ३० ॥ मज नाहीं प्रपंचाचें

---

१. भयंकर समर (हंसकोश); 'घोरंदर' असाही शब्द आहे व 'अत्यंत घोर,' 'भयंकर' अशा अर्थी या शब्दाचा कवितेंत प्रयोग आढळतो. २. ऋग्वेदी. ३. हा चरण एका प्रतींत गळला आहे. ४. समजाविलें. ५. कंटाळलें; त्रासलें. याला तोडीचे अमृतरायाचे श्लोक (का० सं० ग्रंथमाला, २६, पृ० ९७) पडताळून पहावे.

ज्ञान । मिळवितां न ये धन । न सोसवे स्त्रियेचें बोलणें । म्हणोनि आलों सोडोनियां.' ॥ ३१ ॥ स्वामी बोलती कृपानिधी, । 'तुजसी स्त्रीत्यागासी आहे अवधी । मी सांगतों शास्त्रविधी । ऐकोनियां घेई पां. ॥ ३२ ॥ पाणिग्रहित[1] स्त्रियेसी । नेम केला विवाहदिवसीं । तुजसह धर्मार्थ[2]कामासी । सेवन करिन म्हणऊनी. ॥ ३३ ॥ मोक्षइच्छा[3] होती जेव्हां । स्त्रियेसी सोडोनि जावें तेव्हां । नाहीं तरी पितरां देवां । द्वेष होईल सर्वथा. ॥ ३४ ॥ पंचविसावें वर्ष तुजलागून । नाहीं फिटलें स्त्रियेचें ऋण[4] । जाल्लिया एक पुत्रसंतान । त्याग करीं तियेचा. ॥ ३५ ॥ माझिया आशिर्वादेंकरून । पुत्र होईल तुजलागुन । मज करीं अन्नप्रदान । क्षुधा फार लागलीसे.' ॥ ३६ ॥ मग आज्ञा मागुनी स्वामिसी[5] । विश्वनाथभट आले ग्रामासी । साद्यंत वृत्तांत स्वस्त्रियेसी । कथन केला ते काळीं. ॥ ३७ ॥ 'राघवचैतन्य प्रसन्न जाले । पुत्र होईल ऐसें वदले । परि नेऊनियां घातलें । पाहिजे त्यांना[6] भोजन.' ॥ ३८ ॥ गिरिजाबाई संतोषली । उत्तम प्रकारचीं अन्नें केलीं । ते विश्वनाथें घेऊनि वहिली[7] । स्वामीसन्निध पातले. ॥ ३९ ॥ नखांच्या चुंबळी जाल्या म्हणुन । घातलें विश्वनाथें भोजन । स्वामी होउनि अतिप्रसन्न । अक्षयी वर दिधला. ॥ ४० ॥ 'तुज होईल उत्तम पुत्र । पुढें वंशवृद्धी करील पवित्र । तुज मोक्ष होउनि चरित्र[8] । प्रगट होईल भूमंडळीं.' ॥ ४१ ॥ 'तथास्तु' म्हणोन वंदन केलें । विश्वनाथभट गृहासी आले । उभयतां स्त्रीपुरुषें सेवन केलें । शेष अन्न उरलें तें. ॥ ४२ ॥ गिरिजाबाई जाली गार्भिणी । नव मास भरतां क्रमें करुनि । जाली पुत्राची जननी । उत्तम नगरीं द्विजगृहीं. ॥ ४३ ॥ कांहीं साहित्य[9] पडतां उणें । सर्वदां संतापुनियां मनें । भर्त्यालागीं कठोर भाषणें । गिरिजाबाई करितसे. ॥ ४४ ॥ दशम[10] दिवस लोटल्यावरी । विश्वनाथ सोडुनी नगरी । जाते जाले वनामाझारीं । राघवचैतन्यासन्निध. ॥ ४५ ॥ प्राप्त होतां तेरावा दिवस[11] । मिळोनी सुवासिनी ब्राह्मण । करिते जाले नामकर्ण[12] । नृसिंहभट म्हणुनी. ॥ ४६ ॥ श्रीचैतन्यपदकमळीं । विश्वनाथें ठेऊनि मौळी[13] । उभा हात जोडोनी जवळीं । प्रार्थनेसी करितसे. ॥ ४७ ॥ 'सरली संसाराची

१. विवाहित. २. 'धर्मे च अर्थे च······नातिचरामि' इत्यादि. ३. मोक्षसाधन करण्याची इच्छा झाल्यावर. ४. हें पुत्रोत्पत्ति झाल्यावर फिटतें. ५. येथें चतुर्थीचा षष्ठीप्रमाणें उपयोग केलेला आहे. ६. 'आतां' असा पाठभेद आहे. ७. तत्क्षणीं, लागलीच. ८. तुझें, विश्वनाथभटाचें. ९. संसारांत लागणारें. १०. दहावा. ११. 'दिन' असा पाठ असावा; नाहीं तर यमकें साधत नाहींत. १२. नामकरण. १३. 'मौळ', मस्तक.

कथा । मजला संन्यास द्यावा आतां । दूर करावी जी! भवव्यथा । स्वामीराया! दयाळा!' ॥ ४८ ॥ वैराग्यें चित्त शुद्ध जालें । स्त्रीचें ऋणही फिटलें । ऐसें पाहुनि प्रसन्न जाले । राघवचैतन्य ते काळीं. ॥ ४९ ॥ संन्यासपद्धतीचे प्रकारें । मांझे नामाचेनि अनुसारें । केशवचैतन्य नाम बरें । विचार करुनि ठेविलें. ॥ ५० ॥ मग शिष्यातें सन्मुख बैसवून । करिती महावाक्याचें बोधन । शक्तिपातप्रभावेंकरुन । साक्षात्कार केला पैं. ॥ ५१ ॥ होतां ब्रह्माकार वृत्ती । मनाची मोडली प्रवृत्ति । मावळुनी गेली देहस्मृती । जीवभ्रांती उडाली. ॥ ५२ ॥ जाली निर्विकल्प समाधी । विलया गेली चित्तबुद्धि । सुख पावले निरवधि । केशवचैतन्य ते काळीं. ॥ ५३ ॥ ऐसे बहुत दिवस गेले । कोणातें ठाऊकें नाहीं जालें । पुनरपि स्मृति विसरले । करूं आदरिलें स्तवनासी. ॥ ५४ ॥ 'धन्य धन्य जी श्रीगुरुराया! । मज पाविलें आपले ठायां । काय उतराई होऊं पायां । श्रीगुरुमूर्ति! तुमचे. ॥ ५५ ॥ अनुपम्य सुखातें पावलों । ब्रह्मरस पिउनी धालों । जन्मा येवोनि कृतार्थ जालों । स्वामीप्रसादें करुनि.

---

१. 'ऐहिक वस्तूंचा ज्यानें सम्यक् (चांगल्या रीतीनें) न्यास (त्याग) केला तो संन्यासी' हा धात्वर्थ; सामान्यतः ज्यानें श्रौतस्मार्तादि अग्निसाध्य कर्मांचा त्याग केला आहे अशाला 'संन्यासी' असें समजतात, पण कर्मफलांची आसक्ति सोडून कर्तव्यकर्म करणारास गीता खरा संन्यासी म्हणते. संन्याशानें लोकेषणा, पुत्रेषणा, व वित्तेषणा यांचा त्याग करून भिक्षावृत्तीनें रहावें, असें बृहदारण्यकांत दिलें आहे. 'सहांतें जो नाशी । साधी नारायण । संन्यासी तो जाण । धन्य एक. ॥' तुकाराम, गाथा (निर्णयसागर, १९०३) २१९२, पहा. २. आपलें. राघवचैतन्याचें. ३. 'तत्वमसि' याचा अर्थ 'त्वं तत् असि' म्ह० तूं तें ब्रह्म आहेस. या गूढ तत्वाचा उलगडा म्ह० जीवात्म्याचा परमात्म्याशीं संबंध. याची फोड श्रीधरांनीं वेदांतसूर्याच्या आठव्या प्रकरणांत केली आहे, ती मुमुक्षूंनीं पहावी. ४. महावाक्योपदेशानें जो अज्ञानशक्तीचा निरास तो शक्तिपात, त्याच्या प्रभावामुळें. ५. ब्रह्मात्मैक्य. श्रवणमनननिदिध्यासादिकांच्या परिपाकामुळें हें स्वरूपावस्थान प्राप्त होतें. ६. ब्रह्माकार–ब्रह्ममय वृत्ती. ७. बहिर्मुखवृत्ति. ८. निर्विकल्प म्ह० कल्पनारहित, म्हणजे समाधिस्थितींत 'चरमवृत्ति' (वेदांतसूर्य, २,१७४–१८०) बाणल्यावर–तीस निर्विकल्प समाधी म्हणतात. 'जैसें जलधींत विरे लवण । तैशी कल्पना विराली पूर्ण । निर्विकल्प समाधी हे खूण । ·········॥ १८३ ॥ जैशी जान्हवी आणि भागीरथी । एकची अर्थ हा निश्चितीं । तैसी निर्विकल्प समाधी चरमवृत्ति । एकरूप जाण पां ॥ १८४॥' या समाधीला लय म्ह० निद्रा, विक्षेप म्ह० भ्रांतचित्त, कषाय म्ह० स्तब्धता, आणि रसास्वाद अशीं चार विघ्नें येतात. ९. अत्यंत. १०. आणून पोंचविलेंस; स्वस्वरूपीं मिळविलेंस. ११. 'रस' म्हणजे ज्ञानमय आनंद; ब्रह्मज्ञानाच्या अनुभवामुळें प्रतीत होणारा आनंद तो 'ब्रह्मरस.'

॥ ५६ ॥ मी मातें[1] चोरिलें होतें । तें सांपडलें तुमचेनि हातें । निज धन पाउनी निरुतें[2] । संपन्न जालों सर्वदां. ॥ ५७ ॥ स्वामी! पूर्वींचा मी कोण । भुललों होतों कैसियानें[3] । तुम्ही कैसें पाववलें नेऊन । हें मजलागीं सांगावें.' ॥ ५८ ॥ 'अरे! तूं ब्रह्म निर्विकार । सत्य ज्ञानानंत अपार । परि अनादि अविद्येस्तव[4] संसार । तुजलागीं प्राप्त जाला. ॥ ५९ ॥ अविद्या तम आणि माया । तिचींचि नामें असति गा प्रिया! । नसतां भासली सेवाया । केशापरि ऐके तें. ॥ ६० ॥ जैसें आकाशीं अभ्रपडळ[5] । कीं सूर्यरश्मिवरी मृगजळ । तैसा शबलब्रह्मीं[6] हा सकळ । भासता जाला चिद्विवर्ते[7]. ॥ ६१ ॥ चिच्छक्तिसहित ब्रह्मचैतन्य । त्यासि परमात्मा ऐसें अभिधान । तोचि प्रकृतीपुरुषरूपेंकरून । नटाचे परि जाहला. ॥ ६२ ॥ अर्धनारीनटेश्वर[8] । जया म्हणे सांख्यशास्त्र । तो जीवेश्वरत्वें द्विप्रकार । जाला प्रतिबिंबत्वें. ॥ ६३ ॥ प्रकृती माया अविद्या जाली । माया त्रिगुणांतें विसरली । गुणक्षोभिणी[9] ऐसी बोली । जियेलागीं असे पैं. ॥ ६४ ॥ मायाप्रतिबिंब तो ईश्वर । अविद्या प्रतिबिंब जीव थोर । अविद्या जाली नाना प्रकार । म्हणोनि जीव नाना जाले. ॥ ६५ ॥ माया ईश्वरें अवलोकिली । ती महातत्वातें व्याली । महातत्वापासुनि जालीं । अपंचीकृत[10] भूतें पैं. ॥ ६६ ॥ शब्दस्पर्श रूप रस गंध । पंच तन्मात्रा[11] नामें विविध । त्याचें पंचीकरण[12] करितां प्रसिद्ध । पंचमहाभूतें जाहलीं. ॥ ६७ ॥ आकाश वायु तेज पाणी । पांचवी भुतें ही मेदिनी । त्यामाजी ईश्वर प्रवेशुनि । धारण केली स्वसत्ते. ॥ ६८ ॥ ऐसें निर्मुनी ब्रह्मांड । त्यामाजी चतुर्दश[13] भुवनें प्रचंड । तेथें स्थावर जंगम जिवाचे पिंड । निर्माण केलीं अनुक्रमें. ॥ ६९ ॥

---

१. माझ्या खऱ्या स्वरूपाला. गमावून बसलों होतों. २. सत्य, तात्विक; 'निश्चयेंकरून' असाही अर्थ होईल. ३. कशानें; कशामुळें, कोणत्या कारणामुळें. ४. मायेमुळें. ५. अभ्रांचा पडदा. ६. यालाच 'महामाया' किंवा 'प्रकृति' म्हणतात. शबल म्ह० औपाधिक. ७. चित्+विवर्त= चैतन्याचा भोवरा. 'जालाचि द्विवत्' असा पाठभेद आहे. ८. 'त्रिगुणापरता जो ईश्वर । अर्धनारीनटेश्वर । सकळ सृष्टीचा विस्तार । तेथून झाला ॥' दासबोध, १३,१,२५. ९. दासबोध, १३,३,५ पहा. १०. अ+पंचीकृत भूतें=पंचतत्वांचा परस्परानुप्रवेशामुळें पंचीकरण होऊन जीं प्रत्यक्ष दिसणारीं व भासणारीं पृथिव्यादि भूतें तीं पंचीकृत भूतें; तशी अवस्थ प्राप्त न झालेलीं. ११. शब्दस्पर्शादि पंच विषय. १२. 'प्रति सूक्ष्मभूतांचे दोन दोन भाग करून एकेक भाग त्याचा त्यांतच ठेऊन दुसरा भाग अन्य चार भूतांस वांटून देणें' तेणेंकरून ईश्वरेच्छेनें भूतांचें पंचीकरण होतें. १३. सप्तस्वर्ग व सप्तपाताल मिळून चवदा भुवनें

महाभूताचे [1]स्थूळदेह घडिले । आपची कृताचे [2]लिंगदेह जाले । अविद्या [3]कारणदेह या बोलें । सांगितलें शास्त्रानें. ॥ ७० ॥ येथवरी चैतन्य जें व्यापिलें । तें जीवदशेतें पावलें । म्हणुनि आपणातें भुलले । स्वप्नाचियापरी. ॥ ७१ ॥ मी [4]भुललों कासयानें । ऐसें तुवां पुसिलें म्हणून । सांगितलें अनुक्रमालागुन । [5]बाळअल्याईसारिखें. ॥ ७२ ॥ ब्रह्मा उत्पत्तिचा अभिमानी । विष्णु प्रवृत्त असे पालनीं । रुद्र संहारालागुनी । गुणव्यक्ति प्रगटला. ॥ ७३ ॥ आतां सांगतों उपसंहार । तो ऐकोनि घेईं परिकर । संहारइच्छा धरी ईश्वर । तेव्हां रूपें संहारी. ॥ ७४ ॥ सूर्य तपोनि द्वादशकळीं । शेष विषातें वमी पाताळीं । तेव्हां पृथ्वीची होऊनि होळी । राखोंडी होय सर्वांची. ॥ ७५ ॥ [6]संवर्त मेघांच्या धारा । पडती गजशुंडाकारा । पृथ्वीवरी जैशा गोरां[7] । साकरेच्या विरतसे. ॥ ७६ ॥ तेज शोषुनि घे आपातें । वात नाहींसें करी तेजातें । आकाश वायू नाहींसें करीत । पोकळी आंत सर्वस्वें. ॥ ७७ ॥ गुण नाहींसें करिती आकाश । गुण प्रकृतींत होती [8]समरस । तेव्हां गुणसाम्या ऐसें तीस । नामकर्ण होतसे. ॥ ७८ ॥ अविद्या आणि काम्य कर्म । संपूर्ण जिवाचे तेथें उपरम । बीजभाव तो गा ! उत्तम । पुनरपि सृष्टि व्हावया. ॥ ७९ ॥ ऐसा [10]उपक्रमोपसंहार । होत जात वारंवार । परि न चुके जिवाचा संहार । तत्त्वज्ञानावांचुनि. ॥ ८० ॥ हें उपक्रमोपसंहारद्वय । अवघा [11]अध्यारोपचि होय । आतां अपवादाची सोय । धरुनियां सांगतों. ॥ ८१ ॥ परि आधीं [12]नित्यानित्यविवेचन । करावें लागे युक्तिकरून । जेणें [13]अन्वयव्यतिरेकें लक्षण । टायीं पडे निश्चयीं. ॥ ८२ ॥

---

१. पंचमहाभूतात्मक देह. २. यालाच सूक्ष्मदेह म्हणतात. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें-पंचप्राण, मन व बुद्धि मिळून जें सूक्ष्मशरीर त्याला लिंगदेह म्हणतात. ३. 'कारण महाकारण हा विचार । अज्ञानज्ञानालागीं म्हणती ॥ (वेदांतसूर्य. ८.) ४. या प्रश्नाचा उलगडा श्रीधरांनीं वेदांतसूर्यांत पहिल्या तीन प्रकरणांत आपल्या दृष्टांतरम्य वाणीनें वर्णिलेला आहे. रामदासांनींही दासबोधांत आठव्या दशकांत (स० ३) व नवव्या दशकांत याचा उत्तम खुलासा केला आहे. ५. मुलांस सांगितलेल्या गोष्टींप्रमाणें. ६. 'सर्वांचि वर्षे' असा पाठभेद आहे. ७. 'पृथ्वी विरे जैसा वोरा' असा पाठभेद आहे. ८. हें महाप्रळयाचें वर्णन आहे. दासबोध, १३,४ व वेदांतसूर्य, ८, १५२ पहा. ९. एकरूप. १०. प्रतिपाद्य जी ब्रह्मवस्तु, जी एक, अद्वितीय, स्वगत, सजातीय, विजातीय भेदरहित आहे (छांदोग्य, ६ वा अध्याय.) तिचा 'हें जग आत्मरूप आहे, हा उपसंहार. ११. जगदुत्पत्तीचा आरोप. १२. 'देह अनित्य आत्मा नित्य । हा विवेक नित्या नित्य । ........जड तितुकें अनित्य । आणि सूक्ष्म तितकें नित्य । याहीमध्यें नित्यानित्य । पुढें निरोपिलें ॥' दासबोध, १३,१. १३. कार्य आहे तेथें कारण आहे हा अन्वय. कारण नाहीं तेथें कार्यही नाहीं हा व्यतिरेक.

ज्ञानमात्र जो शुद्धात्मा[1] । तोचि ब्रह्मांडीं परमात्मा । पिंडीं म्हणती जीवात्मा । साक्षी द्रष्टा तोचि पैं. ॥ ८३ ॥ स्थूळदेह जो भूतकार्य । तो आत्म्यासि दृश्य होय । म्हणोनि अनात्मा तो स्वयें । द्रष्टा त्याहुनि वेगळा. ॥ ८४ ॥ अपंचीकृतभूतांपासुनि । जाला सप्तदशकलेंकरुनी । लिंगदेह जो अनात्मपणीं । दृश्य होय सर्वथा. ॥ ८५ ॥ अविद्याकार्य कारणदेह । जो आपणांना अन्य पाहे. । आत्मा तयाचा साक्षी पाहे । यास्तव त्याहुनि वेगळा. ॥ ८६ ॥ जागृत अवस्था आणि स्वप्न । तिसरी अवस्था सुषुप्ति जाण । या आत्मयासी दृश्य म्हणुन । अनात्मरूप जाणाव्या. ॥ ८७ ॥ विश्व तेजासी अभिमानी । तिसरा प्राज्ञ नामें करूनि । हे प्रतिबिंबरूप म्हणुनि । अनात्में होत निश्चयें. ॥ ८८ ॥ देह अवस्था अभिमानी । हें संपूर्ण मायाकार्य म्हणुनि । ओळखावें व्यतिरेकेंकरूनि । यांत अन्वय आत्म्याचा. ॥ ८९ ॥ आतां पदार्थ शोधुन । ऐक सांगतों तुजलागुन । विराट मायाकार्य म्हणुन । मिथ्या होय सर्वथा[3]. ॥ ९० ॥ संपूर्ण लिंगदेहाचा अभिमानी । हिरण्यगर्भ[4] या नामेंकरुनि । आणि संपूर्ण कारणदेहाची जननी । अविद्या तेहि टाकावी. ॥ ९१ ॥ उत्पत्ति स्थिति संहार । या तत्पदींच्या अवस्था परिकर । अभिमानी ब्रह्मा विष्णु रुद्र । हे संपूर्ण माईक पैं. ॥ ९२ ॥ तत्पदींची सर्वज्ञता । आणि त्वंपदींचो किंचिज्ज्ञता । या माईक म्हणुनि सर्वथा । टाकुन द्याव्यः उभयही[5]. ॥ ९३ ॥ जहद् आणि अजहद् । तिसरे ते जहदाजहद् । या लक्षणेंकरूनि ब्रह्म अभेद । वस्तु तेचि जाणावी[6]. ॥ ९४ ॥ जैसें घटमठीं अभिन्न । एक अखंड असे गगन । तैसें पिंडब्रह्मांडीं चिदाकाश पूर्ण । व्यापुनी उरलें पुष्कळ. ॥ ९५ ॥ हे वस्तु गा! तुजप्रति । पूर्वींच बोधिली या निगुंति । तेथें लीन जाली तुझी मती । जीवभ्रांति निमाली. ॥ ९६ ॥ हें सर्व साधनांचें सार । महावाक्याचें जिव्हार । ऐक्य पावती

---

१. 'जड अनेक आत्मा एक । ऐसा आत्मानात्मविवेक ।'. २. सोहिरोबा, सिद्धांतसंहिता, ७, ३०; २४१–४७ पहा. ३. 'विराट–स्थूलदेह तत्वतां । या दोहींचा तूं साक्षी पाहतां । जैसा लोकवर्तणुकीसी सविता । वेगळाची प्रकाशुनी ॥' वेदांतसूर्य, ८,४४; या आठव्या प्रकरणांत श्रीधरांनीं 'तत्वमसी'चा उत्कृष्ट उलगडा केला आहे तो वाचकांनीं अवश्य पहावा. ४. माया प्रतिबिंबित ईश्वर लिंगशरीराचा अभिमानी होतो तेव्हां त्याला हिरण्यगर्भ म्हणतात. ५. 'जीवचतुष्टी नांव 'त्वं'पद । ब्रह्मचतुष्टीतें 'तत्'पद । दोहींचें ऐक्य हें 'असि'पद । तूं आनंदकंद साक्षी यांचा ॥' वेदांतसूर्य, ८,९३. ६. मागें निरंजनकृत पतिव्रताख्यान–ओ० ३८ वरील टीप पहा. वेदांतसूर्य २,५९–७५ मध्येंही तेंच विवरण आहे. ७. निभ्रांत, यथार्थ. ८. अंतःकरण. येथें मूळ खूण, तत्व, असा अर्थ घ्यावा.

असो तया स्थळालागुन । लोक म्हणती दस्तुरखान । तेथें मशिदं बांधिली म्हणून । असे वदंता आजवरी. ॥ १२७ ॥ वर्तमान कळतां जुन्नराला । यवनाचे घरीं कल्पांत जाहला । म्हणती मोठा सैतान निघाला । त्याणें मारिलें सर्वांसीं. ॥ १२८ ॥ यापरी जालिया वर्तमान । उत्तमनगरींचे जन संपूर्ण । श्रीसमाधीपासीं जाऊन । प्रार्थना करिते जाहले. ॥ १२९ ॥ म्हणती, 'जय जया जी स्वामिराया! । आम्हांवरी करावी पूर्ण दया । आम्ही समस्त पडतों पाया । क्षमा केली पाहिजे. ॥ १३० ॥ यवनानें अपराध केला । त्याचें फळही तो पावला । तयासीं जो दंड केला । तोही उचितचि श्रीस्वामी!' ॥ १३१ ॥ मग शिष्ट ब्राह्मण मिळाले । स्थळशुद्धीसी करिते जाले । वेदपारायण केलें । ब्राह्मणभोजन घालुनी. ॥ १३२ ॥ मग केशवभट दुसरे दिवशीं । जाऊनियां समाधीपाशीं । सांगते जाले भागवतासी । अतिआदरें करुनी. ॥ १३३ ॥ तंव समाधींतुनी भाषण । स्वामी न करिती आपण । करिते जाले दृढ मौन । सर्पही होन देईना. ॥ १३४ ॥ ऐसा प्रकार जाल्यावरी । केशवभट खेदातें करी, । म्हणे, 'श्रीगुरु! मजवरी । रागें नका भरूं जी! ॥ १३५ ॥ मी तुमचें लेंकरूं लहान, । तुम्हींच केलें संगोपन, । पिता पूर्वींच गेला मरून । आई बाप तुम्हीच माझे. ॥ १३६ ॥ मीं आतां काय करावें? । कोणालागीं शरण जावें? । कैशी धांव घेतली दैवें? । विपरीत काळ पातला.' ॥ १३७ ॥ गडबडा लोळे धरणीवरी, । मोठ्यानें आक्रोश करी, । एकला तया वनामाझारीं । शोक करूं लागला. ॥ १३८ ॥ सप्रेम भजन आरंभिलें । बहुतां प्रकारें स्तवन केलें, । मग समाधींतुनी बोलते जाले । केशवचैतन्य ते काळीं. ॥ १३९ ॥ म्हणती, 'लेंकुरा! तुझें पुराण । ऐकुनि संतुष्ट माझें मन, । तुवां सप्रेम केलें भजन । तें मजसीं आवडलें. ॥ १४० ॥ सखया! इतुके दिवसवरी । तुजसीं बोललों बहुतांपरी । म्हणुनि उपाधि जाली भारी । लोक दुष्ट असती. ॥ १४१ ॥ आतां तुजसीं बोलणार नाहीं. । तूं घरीं जाऊनि स्वस्थ राहीं । जेव्हां संकट पडेल कांहीं । तेव्हां समीप आहें मी.' ॥ १४२ ॥ मग केशवभटजींनीं नमस्कार । करूनी घरीं आले सत्वर । मातेसी कथुन जाला प्रकार । स्वस्थ राहते जाहले. ॥ १४३ ॥ काशीमाजी एक ब्राह्मण । इच्छित होता स्वामिदर्शन । तयाचे मनोरथ केले पूर्ण । काशींत प्रगट होऊनी. ॥ १४४ ॥ पुढें शत वर्षांनंतर । होता जाला चमत्कार । तो षष्ठाध्यायीं परिकर । वर्णियेला जाईल पैं. ॥ १४५ ॥ निरंजन रघुनाथ जनस्थानवासी । कथा वर्णिली

---

१. दस्तुरखान नांवाचें एक मुसलमानी पीराचें स्थान अद्यापि ओतुराजवळ आहे.

पुण्यराशी । श्रवणमात्रें गुरुभक्तांसी । आल्हाददायक निश्चयीं. ॥ १४६ ॥ श्रीचैतन्यविजयकल्पतरु । संपूर्ण फलदायनी उदारु । श्रवणपठणें दुःखपरिहारू । होईल श्रोत्यांवक्तयांचा. ॥ १४७ ॥

---

## अध्याय सहावा.

आतां नमूं श्रीकेशवचैतन्य । जे सकळ साधुजनांसीं मान्य । कीर्ति ऐ-कतां श्रवणीं[1] धन्य । प्राणी होती सर्वही. ॥ १ ॥ ज्ञान वैराग्य प्रगट केलें[2] । तेणें अनेक जन उद्धरिले । परि भक्तितत्त्व राहिलें । प्रगट करणें सर्वही. ॥ २ ॥ मग तुकाराम वाणी । भक्ति कथिली तयालागुनी । ते विस्तारपूर्वक जनीं । श्रवण केली पाहिजे. ॥ ३ ॥ नदी इंद्रायणीचे तीरीं । देहुग्रामा-माझारीं । विश्वंभरबाबा भक्ति करी । अखंडित विठ्ठलाची. ॥ ४ ॥ त्याची भार्या आमाबाई । तिची भक्ती श्रीविठ्ठलपायीं । भोळी भाविक होती पाही । अखंड भजनीं तत्पर. ॥ ५ ॥ ते जातीचे कुणबी वाणी[3] । परि विठ्ठल कुल-

---

१. कानानें. २. तुकारामाचा अवतार कलियुगांत सर्वसुलभ असें भक्तिमार्गाचें रहस्य तें प्रगट करण्यासाठीं होता, असें महिपतीनें 'भक्तलीलामृतां'त सांगितलें आहे. 'आतां सद्गुरू तुकाराम समर्थ। तयासीं माझा प्रणिपात । ज्याणें अवतार घेऊन मृत्युलोकांत । दाविला भक्तिपंथ साधकां ॥ योग याग आणि व्रत । कलियुगीं नव्हेचि यथास्थित । नामसंकीर्तनीं तरतील बहुत । वचन व्यासोक्त भागवतीं ॥ याचा अर्थ सखोल परम । जडमूढांसीं नकळे वर्म । यास्तव अवतार तुकाराम । साधकांसी नेम लावावया ॥' भक्तलीलामृत— अ० १,१४–१६; विश्वंभरबाबाला 'आंबियाचे वनीं' श्रीविठ्ठलाची मूर्ति सांपडली तेव्हां आकाशवाणी झाली. त्यांतही 'पुढें याचे वंशीं थोर । अवतरेल वैष्णववीर । तयाचेनि कीर्तनगजरें । जगदोद्धार होईल ॥' असा महिपति उल्लेख करितात. हा 'सकळसंतांचा मुगुटमणी' नामदेवाचा अंशावतार होता अशी आख्या आहे. महिपतीनें तिसऱ्या अध्यायांत वैकुंठींच्या संतसमाजाचें वर्णन देतांना भगवं-तांनीं नामदेवास अवतार घ्यावयास सांगून खालील उपदेश केला आहे. 'आणि तुम्ही अवतार घेउनी क्षितीं । सप्रेम करावी माझी भक्ति । दीनजन उद्धरती । तें भजन प्रीतीं सांगावें ॥ तरी आतां ऐक भक्तसखया । माझ्या सप्रेम विसांविया । तुवां अवतार घेऊनियां । भजनक्रिया सांगावी ॥ चहूं मुक्तींवरी भक्ती । बोलिलों गीताभागवतीं । ते करूनियां यथास्थिती । माझी कीर्ति वाखाणी ॥......॥ शब्दब्रह्म गूढार्थ थोर । तो तूं मथूनि काढीं सविस्तर । सप्रेम क्षुधित जेवणार । तयांसी आदरें वाढी कां ॥ भक्तिमार्गावरी साचार । हरीनामावरी पोही घाली सत्वरें । सप्रेम भक्ति हें निरंतर । देऊनि चराचर निववीं तूं ॥ ९३ ॥ या वरील विवरणावरून तुकारामाची देवानें भक्तितत्त्वस्थापन करण्यासाठीं योजना केली होती असा भाविकांचा समज आहे, हें लक्ष्यांत येईल. ३. 'भक्तविजयां'त तुकारामाचें उपनांव 'आंबळे' दिलेलें आहे (अ० ४८,२३). 'कुणबवाणी' असा पाठभेद आहे.

देवता त्याचे सदनीं । तयासी पुत्र जाले दोन्ही । हरि मुकुंद या नामें. ॥ ६ ॥ ते दोघे निघाले रोजगारीं । [2]चंदीचंदावरकराचे पदरीं । तयांसी होऊनि सरदारी । काम फौजेचें सांगितलें. ॥ ७ ॥ ते महापराक्रमी शूर । चंदीचंदावरास राहती निरंतर । संपत्ती वाढविलिसे थोर । म्हणुनी तेथें राहिले. ॥ ८ ॥ [3]मागें विश्वंभरबाबा वारले । म्हणुन देहूस राहणें सोडिलें । मातोश्री आणि कुटुंब नेलें । चंदीचंदावरासी. ॥ ९ ॥ तेथें आमाबाईचिये स्वप्नीं । वारंवार विठोबा येऊनि । सांगे, 'तूं मजला टाकुनी । आलीस येथें कशासी ? ॥ १० ॥ मी देहुग्रामीं उपवासी, । नैवेद्य मिळेना मजसीं, । तूं तरी तया स्थळासी । चाल आतां सत्वरीं.' ॥ ११ ॥ आमाबाई सांगे स्वपुत्रासी, । 'देव मरतो उपवासी । म्हणुन देहुग्रामासी । बोलावितो मजलागीं.' ॥ १२ ॥ पुत्रांनीं तियेतें वेडी ठरवून । नायकती तियेचें वचन, । मग एके दिवशीं जालें स्वप्न । तेंही सांगे आमाबाई. ॥ १३ ॥ 'देव माझे स्वप्नीं येऊन । बोलता जाला मजलागुन । तुझे पुत्र पावतील मरण । शत्रुहस्तें करुनि.' ॥ १४ ॥ तें पुत्रांतें सत्य न वाटून । पुत्र बैसले होते जाण । तंव राजाचें आलें पाचारण । परशत्रूवरी जावया. ॥ १५ ॥ मातेसी करुनि नमस्कार । हरि मुकुंद निघाले सत्वर । होऊनि घोड्यांवरी स्वार । रणांगणीं पातले. ॥ १६ ॥ परशत्रूचा होऊनि [5]चंड । यांचे सैन्याचा जाहला मोड । हरिमुकुंदांचे सोडवूनि धड । मस्तकें नेलीं [6]कापोनी. ॥ १७ ॥ ऐसा प्रकार जालि-

१. विश्वंभरबाबाची अखंड निष्ठा, व प्रत्येक पंधरवारीं पंढरपूरची वारी, हें पाहून श्रीविठ्ठल प्रसन्न झाले व 'देहूजवळील आंबेवनांत असलेली विठ्ठलाची प्रतिमा आणून तेथेंच श्रीचरण चिंतित असावें, पंढरीस येऊं नये,' असा विश्वंभरबाबाला दृष्टांत दिला—ही कथा महिपतीच्या 'भक्तलीलामृतां'त दुसऱ्या अध्यायांत वर्णिली आहे. २. अद्यापपावेतों हे हरि व मुकुंद कोणत्या राजाच्या पदरीं होते याचा पत्ता नव्हता; नुसतें राजाच्या पदरीं क्षात्रवृत्तीनें होते असा मोघम उल्लेख ग्रंथांतरीं आढळत असे. या प्रकृत ग्रंथावरून वरील संदिग्धतेचा उलगडा प्रथमतः झालेला आहे. ३. भक्तलीलामृतांत ही गोष्ट विश्वंभरबाबांच्या मृत्यूनंतर झाली असें लिहिलें आहे. (अ० २,१४८–१५७.) येथें विश्वंभरबाबांचा मृत्यु पुत्रांचें चंदीचंदावरास प्रयाण झाल्यावर झाला असें विधान केलें आहे. ४. पहिला दृष्टांत व हें स्वप्न यांच्यामध्यें आणखी दोन दृष्टांत झाल्याचा महिपतीनें उल्लेख केला आहे. ५. चढ; वरचढ; जय; सरशी. ६. भक्तलीलामृतांत याचा उल्लेख नाहीं.

यावरी । उभय सुना घेऊनि बरोबरी । आमाबाई गेली श्रीपंढरी । देवदर्शन घेतलें. ॥ १८ ॥ आमाबाई म्हणे देवासी, । 'तूं कां लागलासी पाठिसी ? । बुडवूनि आमचे वंशासीं । दिवेलावण मोडली.' ॥ १९ ॥ देव म्हणे, 'तुझे कुळीस । भक्तराज होईल, ऐसा पुरुष । भक्तिमान करिल भूमंडळास । कीर्तनघोषें करुनि.' ॥ २० ॥ ऐसें ऐकुनी आमाबाई । बिऱ्हाडीं आली लवलाहीं । सुषा गर्भिणी होती हेंही । ठाउकें होतें तियेसी. ॥ २१ ॥ नवमास भरतां सायासीं । सून प्रसूत जाली [2]पंढरिसी । हर्ष न माये मानसीं । आमाबाईचे ते काळीं. ॥ २२ ॥ मुलास तेरा दिवस जाले । विठोबा ऐसें नाम ठेविलें । पुढें कांहीं दिवसां आले । देहुलागीं सर्वही. ॥ २३ ॥ देवाचे पूजानैवेद्यालागुन[3] । विठोबा करिता जाला आपण । तयालागीं संतान । पदाजी होता जाहला. ॥ २४ ॥ त्या पदाजीचे पोटीं । शंकर जाला भक्तकिरिटी । तयाचिये उदरसंपुटीं । कान्हया होता जाहला. ॥ २५ ॥ त्या कान्हयासी पुत्र । बोल्होबा जाला जगन्मित्र । त्याची पत्नी परम पवित्र । कॅणकाबाई या नामें. ॥ २६ ॥ ते उभयतां बहुत भलीं । देवाची सेवा बहुत केली । दैवयोगें संपत्ती वाढली । उदीम व्यापारें करूनि. ॥ २७ ॥ तयांसीं जाले तिघे[6] पुत्र ।

---

१. महिपतीनें दिलेला वृत्तांत याहून भिन्न आहे. धाकटा जो मुकुंद त्याची बायको सती गेली (अ० २५,१९९), व हरीची बायको गर्भार होती तिला घेऊन आमाई देहूस गेली (२०३). नंतर त्या गर्भार सुनेस माहेरीं ('नवलाखयांच्या उंबरांत' महिपती, भक्तलीला०— अ० २५,२५१) पाठवून (अ० २५,२१८) आमाईनें 'क्षेत्रवास' (पंढरिवास?) केला. तेथेंच देहूस असतां तिला दिसेनासें झालें व विठ्ठलांनीं सगुणरूप घेऊन तिची सेवा केली व पुढें तिचें उत्तरकार्यही त्यांनींच केलें. आपल्या सासूची निधनवार्ता ऐकून सून आपल्या आतां मोठ्या झालेल्या पुत्रासह देहूस आली, व तेथें सर्व विस्मयकारक वृत्तांत तिला कळला. या महिपतीच्या वृत्तांतांत व निरंजनाच्या हकीगतींत बराच फरक आहे. येथें आमाबाईची सून पंढरीस प्रसूत झाली असें आहे, व बाळंतिणीला घेऊन कांहीं दिवसांनीं दोघेंही देहूस गेलीं असा भिन्न वृत्तांत आहे. ही गोष्ट शोधक लोकांच्या नजरेस आणण्यासारखी आहे. २. मागील टीप पहा. ३. महीपतीनें देवाचा व विठोबाचा पहिला भेटीचा प्रसंग निराळ्या तऱ्हेनें वर्णिलेला आहे. विठोबाला आपल्या आईकडून सारी पूर्वकथा कळतांच तो देहूंतील विठ्ठलमंदिरांत जाऊन आपल्या बापाला त्वां मारिलेंस म्हणून देवाला दूषण देऊन पोटांत सुरी भोंसकून घेऊं लागला (अ० २६,२२–२९). तेव्हां देवांनीं मोठ्या प्रयासानें त्याची समजूत करून त्याचें निवारण केलें. तेव्हांपासून मागील दुःख विसरून विठोबा पंढरीची वारी चालवूं लागलें (अ० ४०). ४. महिपतीनें 'कनकाइ' असें नांव दिलें आहे. ५. चाळीस वर्षें पंढरीची वारी केल्यावर बोल्होबांना संतती झाली (अ० २६,५७). ६. हे तिघे पुत्र ब्रह्मा, विष्णु व रुद्र यांचे अवतार होते (अ० २६,६०).

होते जाले परम पवित्र । वडिल सांवजी वैराग्यस्वतंत्र । सेवूनि गेला तीर्थ-यात्रे. ॥ २८ ॥ त्याचे पाठिचा तुकाराम । जो विठ्ठलभक्त अतिनिःसीम । कान्हया ठेविलें जयाचें नाम । तो कनिष्ठ असता जाहला. ॥ २९ ॥ त्यांत तुकारामाचें चरित्र । जें परम पावन आणि पवित्र । श्रवण करिती त्यांचे श्रोत्र । पुनीत होती निश्चयीं. ॥ ३० ॥ जन्मल्या दिवसापासून । विठ्ठलचर-णीं जयाचें मन । महान सिद्धाचें लक्षण । जयाचे ठायीं वर्ततसे. ॥ ३१ ॥ तयानें केल्या दोन स्त्रिया । रखमाई आवली नामें जयां । सावध संसार करावया । दोघीही असत्या जाहल्या. ॥ ३२ ॥ बोल्होबा निवर्तल्यावरी । संसारओझें तुकयाचे शिरीं । अत्यंत पडतें जालें. परि । विठ्ठलचरणीं लक्ष

---

१. 'वैराग्यस्वातंत्र्य' असा शुद्ध पाठ असावा. २. सावजी हा बायको मेल्यावर तीर्थयात्रेस गेला. आईबाप वारल्यावर तीनचार वर्षांनीं सावजीची बायको वारली. (इंदुप्रकाशगाथा, चरित्र, पृ० ५ पहा.) ३. हा तुकारामाचा धाकटा भाऊ तुकोबाच्या प्रेमळ भक्तमंडळापैकीं होता. 'तुकयाबंधू'चे जे अभंग ते याचेच. तुकारामाच्या प्रयाणानंतरचे याचे शोकपर अभंग प्रसिद्ध आहेत. ४. तुकारामाचें गुप्त झाल्याचें साल शके १५७१ याखेरीज यांच्या आयु-ष्यक्रमाबद्दलची सालवार माहिती नाहीं. पण प्रयाणकालीं ते ४२ वर्षांचे होते अशी संतमंडळीं-तली व वंशजांमध्यें असलेली प्रसिद्धी, व महिपतीचें तुकारामाच्या पूर्वार्धाचा शेवट २१ व्या वर्षी झाला (भक्तलीला०–अ० २८,१३८) हें विधान, यांवरून शके १५३० हें जन्मवर्ष असावें असा अंदाज करितात. पण रा० राजवाडे यांनीं सबळ पुराव्यावरून जन्म शके १४९० असा ठरविला आहे. (ग्रंथमाला ११६.) ५. दोन बायका करण्याचें कारण पहिली रखमाई ही दम्याच्या व्यथेनें आजारी होती हें होय. महीपतीप्रमाणें ही तुकारामाच्या विसाव्या वर्षी (शके १५५०) दुष्काळांत अन्नावांचून मेली. हिला दोन पुत्र होते असें महिपती 'भक्तविजयां'त (अ० ४८,३०) म्हणतो. ६. ही पुण्याचे प्रसिद्ध सावकार अप्पाजी गुळवे यांची कन्या. 'जिजाई' असें हिचें नामांतर होतें. ही एक कर्कशा होती व तुकारामास वैराग्य येण्यास हिचा स्वभाव बराच कारणीभूत झाला होता. (गाथा–अ० ४४२४.) ती महासाध्वी असून संसार-यातनेमुळें त्रासत असे इ०. दुसरी बाजू आवटे यांच्या प्रतींत चांगली प्रतिपादन केली आहे. ७. 'बोधोबा' असा पाठभेद आहे. ८. हें संसाराचें अत्यंत ओझें महिपतीनें पुढीलप्रकारें वर्णिलें आहेः–'तेरावे वर्षी पितयानें । संसार गळां घातला जाण । तेथें दक्ष येतां दिसोन । समाधान वडिलांसी ॥ सतरावे वर्षी तत्वता । क्रमोनि गेलीं मातापिता । वडीलबंधूची कांता । तेही अवचिता निमाली ॥ अठरावे वरुषीं जाणा । सांवजी गेला तीर्थाटना । त्याच्या वियोगें-करुनि जाणा । शोक निजमना वाटत ॥ विसाव्यांत पुत्रकांता स्वयमेव । देखोनि संसारीं धरिली हांव । आतां येथोनि मन विटवावें । मग देवाधिदेवें काय केलें ॥ एकविसाव्यांत विपरित काळ । तुकयासी पातला तत्काळ । तेव्हां निघतांचि दिवाळें । सोइरे सकळ हांसती ॥ अज्ञान प्रकृति

त्याचें. ॥ ३३ ॥ देऊळामाजीं जाऊन । नित्य करावें भजन । श्रीज्ञानेश्वरीचें पठण । परम आदरें करावें. ॥ ३४ ॥ 'अमानित्वा'दि लक्षण । जयाचे ठायीं आलें संपूर्ण । तीं लक्षणें कैसीं, हें श्रवण । श्रोतेजनीं करावीं. ॥ ३५ ॥ प्रथम लक्षण अमानित्व असे । तें तुकयाचे ठायीं वर्ते कैसें । हें ऐकूनि घेईजे स्वस्थ मानसें । साधकांनीं निजप्रीतीं. ॥ ३६ ॥ नामस्मरणीं अति आदर । त्यावरी विठ्ठलसाक्षात्कार । कवितेचा जाला प्रसार । लोक मानूं लागले. ॥ ३७ ॥

---

ते स्त्री निश्चित । तेही निमाली अन्न अन्न करीत । महामोह पुत्र समस्त । लौकिकीं विपरीत हे वार्ता ॥ पूर्वार्ध संपलें ऐशा रीतीं । दुःखें देखिलीं नानारीती । संसाराची आशा होती । तेही भ्रांती निरसिली ॥' भक्तलीला०—अ० २८; १३२-१३८. या उताऱ्यांतील पूर्वार्ध याचा अर्थ अभिधेनें न घेतां लक्षणेनें घ्यावयाचा आहे.

१. भक्तली०—अ० ३०,२८—५४ पहा. २. भगवद्गीता—अ० १३,७—११. ३. स्वगुणश्लाघाराहित्य म्हणजे स्वगुणांची स्तुति न करणें. ४. विठोबा तुकारामास प्रत्यक्ष दर्शन देत असत, हें प्रसिद्ध आहे. कवित्व करण्याविषयीं तुकारामाला स्वप्नांत नामदेव व पांडुरंग यांची आज्ञा झाली याविषयींचे अभंग प्रसिद्ध आहेतच. ही कवित्वाची स्फूर्ति तुकारामास गुरूपदेश मिळाल्यावर झाली ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. आणि या विधानावरून गुरूपदेशाचें साल गणितानें काढतां येण्यासारखें आहे (भक्तलीला०—अ० ३२,३३—८१ अ० ३३,१४३—१७८ पहा, व अभंग ४४२२ निर्णयसागर प्रत, १९०३ पहा. यासंबंधानें रा० राजवाडे यांनीं महिपतीच्या अभंगांचा एक अत्यंत महत्वाचा उतारा ग्रंथमालेंतल्या लेखांत दिलेला आहे. ते अभंग प्रथमतः निबंधमालेच्या ६४ व्या अंकांत रा० रा० वामन विष्णु लेले यांनीं एका पत्रांत दिले होते. त्यांना हे अभंग एका जुन्या रुमालांत सांपडले. ते अभंग आपल्या प्रकृत ग्रंथास अत्यंत महत्वाचे असल्यामुळें, व त्यांची अद्यापपावेतों विशेष प्रसिद्धी नसल्यामुळें आम्ही येथें समग्रतः देत आहोंत:—'अभंग ॥ श्रीकेशवचैतन्य प्र० ॥ (हेंच तुकारामाच्या गुरूचें नांव.) (१) अनाथाचा नाथ कृपाळू उदार । विश्वीं विश्वंभर पांडुरंग ॥ १ ॥ भक्तिप्रेमयुक्त भक्त तो निःसीम । धन्य तुकाराम कलियुगीं ॥ २ ॥ पाहुनि तयाचें वैराग्य उत्तम । तया मेघश्याम संतोषला ॥ ३ ॥ म्हणे, 'तुकया! तूं करीं आतां एक । जाणे विश्वात्मक सर्व मातें ॥ ४ ॥ सद्गुरूवांचूनी कळेना हें वर्म । द्रव्यमायाभ्रम निरसेना' ॥ ५ ॥ म्हणे पांडुरंग, 'बोलसी तें खरें । परी शरण जारे सद्गुरूसी ॥ ६ ॥ होसी ब्रह्मरूप भोगीसी स्वानंद । तोची ब्रह्मानंद जाण सख्या!' ॥ ७ ॥ महीपती म्हणे तुकया विचारून । सद्गुरूचें स्थान सांगा मज ॥ ८ ॥ (२) उदारांचा राणा सांगे तुकयासी । केशवचैतन्यासी शरण जाई ॥ १ ॥ उत्तम तें ग्राम पुष्पावतीतीरीं । असे निर्विकारी समाधीस्थ ॥ २ ॥ ऐसें बोलोनीयां तुका तो निघाला । ओतुरासी आला स्वामीपाशीं ॥ ३ ॥ समाधी वंदोनी बैसे तयेस्थानीं । स्वामींचे चिंतनीं मन सदा ॥ ४ ॥ स्वप्नीं सांगितला मंत्र रामकृष्ण । बावाजी हें नाम खूण माझी ॥ ५ ॥ महीपती म्हणे झालों सावधान । विस्मित पाहून चमत्कार ॥ ६ ॥ (३) समाधीजवळी बैसे तुकाराम ।

तेव्हां नित्य प्रात:काळीं उठावें । ब्राह्मणाचे गृहीं जावें । सडासंमार्जन करावें । नदीचें पाणी आणुनी. ॥ ३८ ॥ मनुष्यमात्रें भेटतां वाटेंत । तयांसी करावा प्रणिपात । अवमानिती स्वजन आप्त । तैशापरि वर्तावें. ॥ ३९ ॥ वाटसरासी ओझें होतां भारी । तें ओझें घेऊनि आपले शिरीं । प्रविष्ट करावें त्याचे घरीं । सेवकाचे प्रकारें. ॥ ४० ॥ कोणी करितां स्तुतिस्तवन । त्रास पावे ज्याचें मन । वारंवार करितां अपमान । संतोष बहु वाटतसे. ॥ ४१ ॥ सन्मान करितां सर्व जनीं । होय साधकाची पुण्यहानी । हें मर्म तुकारामालागुनी । विदित असे पुरतें. ॥ ४२ ॥ आतां अदंभित्व कैशापरी । तें श्रवण

---

ज्याचें भक्तिप्रेम वर्णवेना ॥ १ ॥ प्रत्यक्ष दर्शन स्वामी मज द्यावें । पावन करावें पतीतासी ॥ २ ॥ होवोनी निश्चळ शुद्ध त्याचें मन । केशवचैतन्य प्रगटले ॥ ३ ॥ पायीं घाली मीठी झाला सद्गदीत । प्रेमाश्रु स्रवत नेत्रांतूनी ॥ ४ ॥ अभय करातें ठेविलें मस्तकीं । उठवून अंकीं बैसवीला ॥ ५ ॥ संशय छेदोनी केलें समाधान । मन तें उन्मन झालें सदा ॥ ६ ॥ महीपती म्हणे द्वैताचें खंडन । ब्रह्मानंद पूर्ण सांठवलें. ॥ ७ ॥ (४) बाबाजी चैतन्य योगीराज धन्य । तुकयालागून प्रगटले ॥ १ ॥ शालिवाहन शके चौदाशे त्र्याण्णव । प्रजापती नाम संवत्सरीं ॥ २ ॥ वैशाख वद्य द्वादशीचे दिनीं । समाधी स्वामींनीं घेतलीसे ॥ ३ ॥ तेथूनि तिस वर्षां भेटी तूकयासी । देऊनि तयासी पूर्णपण ॥ ४ ॥ महीपती म्हणे झाले समाधिस्थ । तुकया क्रीडत ब्रह्मानंदें ॥ ५ ॥ (५) धन्य ते सद्गुरू धन्य शिष्यनिष्ठा । देहेसी वैकुंठा तुकया गेला ॥ १ ॥ कायावाचामनें झाला ब्रह्मरूप । भक्तीच्या साक्षेपें ब्रह्म झाला. ॥ २ ॥ चैतन्याच्या कृपें चैतन्यची झाला । कीर्तनें भरला ब्रह्मगोळा ॥ ३ ॥ महिपती ऐसा संताचिये पायीं । राहीला अक्षयीं अद्वैत ॥ ४ ॥'—या निबंधमालेंतल्या पत्राची महती रा० राजवाड्यांनीं निदर्शनास आणून दिली आहे. निबंधमालाकारांच्या लक्ष्यांत हें कसें आलें नाहीं याचेंच आम्हांस आश्चर्य वाटतें. महीपतीला तुकारामाचा अनुग्रह झाला असल्यामुळें वरील विधानाबद्दल शंकाच घ्यावयास नको. आमच्या ग्रंथांतल्या अध्याय ४,१२१–२३ मधील शकाचीच चुकी दिसते; बाकी महिना तिथी व संवत्सरनाम बरोबर जुळतात. शिवाय त्या दिवशीं 'गुरुवार' होता हें अधिक विधान केलेलें आहे.

१. भक्तलीला०–अ० ३१, १६६ पहा. २. 'अमानित्वा'चें लक्षण देताना ज्ञानेश्वर म्हणतात:–'जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयचि न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहू ॥' १९४. ३. भक्तलीला०–अ० ३१,१०३–११५ पहा. ४. 'पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी (न व्हावी) । सेचि (आठवण) लोकां ॥ तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी । मरणेंसीं साठी (बरोबरी)। नमस्कारिता ॥...... ॥ चातुर्य लपवी । महत्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनी ॥ लौकिकाचा उद्वेग । शास्त्रांवरी उबग । उगेपणीं चांग । आथीभर ॥' ज्ञानेश्वरी–१३, १८९–९३. ५. आपल्या अंगांतील गुण मुद्दाम लपवून बाहेरून वेडसरपणा दाखविणें.

करावें साधकचतुरीं । संग्रह होता जो तुकयाचे घरीं । तोळून दिधला स्वहस्तें. ॥ ४३ ॥ मग माध्यान्ह समय जाल्यावरी । भिक्षा मागावी घेरोघरीं । केव्हां करावी मंजुरी । उदरनिर्वाहाकारणें. ॥ ४४ ॥ वक्तृत्व असतां बृहस्पतीपाडें । परि लोकीं आपणास म्हणावें वेडें । यास्तव नाचे वेडें वाकुडें । मुखालागीं करूनी. ॥ ४५ ॥ करितां कीर्तनसमारंभ । लोकीं वाढेल आपला दंभ । जैसा वेडा असतो स्वयंभ । तैसा विचुक चावळे. ॥ ४६ ॥ अहिंसा तरी सर्वांपरि । येऊनि राहिली तुकयाचे घरीं । प्राणिमात्रांसीं पीडा न करी । सर्व परमात्मा म्हणऊनि. ॥ ४७ ॥ भजन करितां एकांत स्थानीं । शेतकरी म्हणे तुकयालागुनी, । 'शेत खाती पांखरें येऊनि । त्याची राखणी करीं तूं. ॥ ४८ ॥ मी जातों ग्रामासीं । एक महिना लागेल मजसीं । तोंपावेतों पाखरें राखिसी । तरि आदमण धान्य देईन मी.' ॥ ४९ ॥ मग तुकया माळ्यावरी बैसुन । पक्ष्यांचें न करितां निवारण । उलटें पक्ष्यांसि बोलावून । शेत चारित असावें. ॥ ५० ॥ शेतकरी ग्रामाहूनि आला । तंव जोंधळा पांखरांनीं खाल्ला । कृषिवळ शिव्या देऊं लागला । तुकारामासी वेळोवेळीं. ॥ ५१ ॥ तुकया म्हणे कुणब्यालागुन, । 'तुवां सांगितली पांखरांची राखण । तसें केलें आदरेंकरुनि । पांखरें संतुष्ट

१. तुकारामानें संसारास कंटाळून निर्जनवास पत्करिल्यावर दोन महिन्यांनी त्याची व जिजाबाईची गांठ पडून व समजुतीच्या गोष्टी होऊन स्वारी देहूस परत आली व बायकोस विरक्तीचा उपदेश करून सर्वस्वदान करावयास सांगितलें. ( निर्णयसागर गाथा–१९०३, अभंग ४३०६–४३१४, तसेंच अ० ४४२३ पहा.) भक्तलीला०–अ० ३४ भक्तविजय–अ० ४९ पहा. २. तुकाराम भिक्षा मागून कित्येक प्रसंगीं उदरनिर्वाह करीत असे, पण तसा प्रसंग वारंवार येत नसे, व तुकारामास निवळ भिक्षेवर जीवन करणें आवडत नसे. (अभंग, ८७४ पहा.) ३. या विधानास आधार भक्तलीला०–अ० ३१, १७७–१८१ आहे, तथापि असा प्रकार नेहमीं होत नसावा असें वाटतें. भक्तविजय–अ० ४८–५४ पहा. ४. वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजि दडे । महिमे मेणें ॥' ज्ञानेश्वरी–१३, १९१. ५. 'वाङ्मनोदेहैरपीडनं प्राणिनां अहिंसनं तदेवाहिंसा;' परपीडानिवृत्ति. ही अहिंसा ज्ञानेश्वरींत उत्कृष्टपणें निरूपिली आहे. ६. 'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् । विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥' भगवद्गीता–१३,२७. ७. भक्तलीला०–अ० २९ पहा. ८. अदमण, अर्धमण. ९. अशाच प्रसंगास अनुलक्षून, 'भक्तासाठीं तो जगजेठी बसुनी माळ्यावर, पांखरें उडवी शारंगधर' हें तुकारामाचें पद (अनेककविकृत पदसंग्रह–भाग १, १३७ पद पृ० ६९) स्मरणांत आल्यावांचून राहत नाहीं. धामणगांवचे पाटील खेधलेबोवा यांच्या वरील पदांतल्या वर्णिलेल्या प्रसंगाचीच तुकारामाच्या या गोष्टींत पुनरावृत्ति झाली, असें म्हणावयास हरकत नाहीं.

झाली.' ॥ ५२ ॥ सर्वांघटीं वासुदेव । ऐसा जयाचा दृढ भाव । जिवासी पिडा करण्याचें नांव । ठाऊक नाहीं जेयासी. ॥ ५३ ॥ ऐसेंच कोणे एके अवसरीं । पित्याचें श्राद्ध आल्यावरि । तुकयाची कनिष्ठ अंतुरी । सांगती जाली तयातें. ॥ ५४ ॥ 'आजी पितृतिथी आहे म्हणुनि । गहुं आणिले पाहिजेत कोठुंनि । तेणें कृषिवळासि मागुनि । गव्हाच्या पेंढ्या आणिल्या. ॥ ५५ ॥ मार्गीं येतां वृक्षाचे ठायीं । मोहोळ लागलें होतें पाहीं । त्यासी ढका लागतां कांहीं । मक्षिका तोडूं लागल्या. ॥ ५६ ॥ मग आंगावरिल वस्त्र टाकुन । तेथें उभा राहिला आपण । म्हणे, 'माझ्या विठोबालागुन । दुःख जालें मजयोगें.' ॥ ५७ ॥ नखशिखांत माशा बैसून । तोडिल्या जाल्या तुकयालागुन । परि तितुकें केलें सहन । हिंसा न व्हावी याकरितां. ॥ ५८ ॥ कोणाचें दुखवेल मन । म्हणून कठोर न बोले वचन । न करी तृणाचें छेदन । हिंसा होईल म्हणवुनि. ॥ ५९ ॥ परम शांत वर्णिला वसिष्ठ । परि तयांहिपेक्षां तुकया वरिष्ठ । दुसऱ्यानें आपणांस देतां कष्ट । फिरुनि त्यासीच प्रार्थितसे. ॥ ६० ॥ देहुग्रामापाझारी । साधु बाजीबाबा वेषधारी । तयाचे शेताभीतरीं । तुकयाची म्हैस जाऊनि ॥ ६१ ॥ तिणें कांहीं धान्य खालें । म्हणून माणुस सांगत आले । बाजीबाबांसी निमित्य जालें । लोकांप्रति सांगावया. ॥ ६२ ॥

१. शेतकऱ्यानें हा तंटा गांवकऱ्यांपाशीं नेला व तुकारामाकडून दोन खंडी गल्ल्याच्या किंमतीचा रोखा करून घेतला. नंतर शेताची खरी स्थिती पाहण्यासाठीं गांवकरी जातात तों अतोनात पीक लोटलेलें त्यांना दिसलें. शेतकरी रोखा परत देऊं लागला, पण गांवकऱ्यांनीं तसें करूं न देतां त्याला दोन खंडी दाणा देऊन बाकीच्या पंधरा खंडी तुकारामास देऊं केल्या, पण त्यानें तो दाणा स्वीकारिला नाहीं. सबब गांवचा देशपांड्या महादजीपंत यानें तो दाणा सांठविला, व त्याच्या साह्यानें तुकारामाच्या पूर्वजांनीं बांधलेल्या विठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार केला. देऊळाच्या जीर्णोद्धाराचा उल्लेख तुकारामाच्या अभंगांत (४४२२) आहे. २. भक्तलीला०—अ० ६,१०१—१०५. ३. भक्तलीला०—अ० ३१,१७०—२२४ पहा. ४. 'जिवाचेनि नांवें । तृणातेंहि नोलांडवे । मग न लेखितां जावें । हें कें गोठी ॥' ज्ञानेश्वरी—१३,२५९. ५. हा मंबाजी या नांवानें प्रसिद्ध आहे. हा ब्राह्मण असून चिंचवडास कांहीं दिवस होता व महापुरुष गोसाव्याचा डौल मिरवून देहूस आला. तेथें तुकारामाची कवित्वाविषयीं व कीर्तनाविषयीं कीर्ति पसरत जात असल्यामुळें मंबाजीची व्हावी तशी मान्यता राहीना. म्हणून तो तुकारामाचा द्वेष करूं लागला. 'सिंधुबाजी बावा वेषधारी' असा पाठभेद आहे. ६. 'वेषधारी' म्हणण्याचें कारण मंबाजीनें महापुरुष असल्याचें नुसतें स्तोम माजविलें होतें. ७. महीपतीनें या मारहाणीचें निमित्त, तुकारामानें देवळाच्या वाटेवरच्या मंबाजीच्या कुंपणाच्या काठ्या काढल्या, असें दिलें आहे. म्हशीनें भाजी खाल्ल्यानंतर कांहीं दिवसांनीं हा प्रकार झाला, असें महीपति लिहितो.

तुकयासि बहुत शिव्या दिल्या । मग दहावीस[1] काठ्या मारिल्या । आपले हातासि मुंग्या आल्या । तेव्हां गेला सोडुनि. ॥ ६३ ॥ तुकारामाचें शरीर । काठ्यांखालीं जालें चुर । परि न बोलतां एकहि उत्तर । विठ्ठलस्मरण करितसे. ॥ ६४ ॥ म्हणे, 'बाजीबाबा बहुत भले । परि तयांचे हात असती दुखवले' । म्हणुन रात्रीं जाऊनि येकलें । त्यांचे हात रगडीतसे. ॥ ६५ ॥ म्हणे, 'मोठ्यानें काठ्या मारितां । क्लेश जाहले तुमचे हाता । मजवरी क्षमा करावी आतां । मनांतिल राग टाकुनि.' ॥ ६६ ॥ ऐसें करूनि त्याचें समाधान । देवळासि आले आपण । करित बैसले नामस्मरण । विठ्ठलाचें आनंदें. ॥ ६७ ॥ आपणालागीं जो अपकारी । तयासि उलटा संतोष करी । ऐसा तुकारामापरि । नसे शांत [2]कोणीही. ॥ ६८ ॥ आतां पांचवें आर्जवलक्षण । तें तुकयाचे ठायीं असे जाण । कोणां न करितां वक्र भाषण । सरळपणें असावें. ॥ ६९ ॥ मार्गी जातां मेंढवाड्यांत । धनगराचा कुत्रा भुंकत । आला तुकयावरी चवताळत । चावा-वयाकारणें. ॥ ७० ॥ त्यासी तुकया बोले उत्तर, । 'तुम्ही कशासी करितां गुरगुर । येथें कांहीं नसतां गुरगुर?' । मग तो मुकाट्या राहिला. ॥ ७१ ॥ इतुकें सरळ अंतःकरण । जें पशुकडून धरविलें मौन्य । सर्वी[4] वासुदेव ही विभावन । दृढ असे जयाच्या. ॥ ७२ ॥ आपणास घडावें आचार्यसेवन[5] । यास्तव गुरु करावा कोण । हें पुसावें देवालागुन । म्हणुनि गेला [6]पंढरीसी. ॥ ७३ ॥

१. महीपति 'दहावीस काठ्या मोडल्यावर' असें सांगतात. २. अभंग ४२९२–९७ पहा. ३. भक्तलीला०–अ० ३७,४०–४७ व ४५४ पहा. दुसऱ्या प्रतींत तिसरा चरण दुसरा घेतला आहे. ४. सर्वत्र. 'सर्वां वासुदेव ही भावन' असा अन्य पाठ. ५. (मोक्षसाधनाचा मार्ग दाखविणाऱ्या) गुरूची शुश्रूषा वगैरे. ही आचार्योपासना कशी प्रत्ययास येते हें ज्ञानेश्वरींत उत्कृष्टपणें सांगितलें आहे. ६. येथें तुकाराम गुरूबद्दलची सल्ला घ्यावयास पंढरीस विठ्ठलाकडे गेले असा उल्लेख आहे. पण 'भक्तलीलामृतां'त महीपतीनें निराळें विधान केलें आहे. तुकारामाचा वडील मुलगा महादेव हा मुतखड्याच्या व्यथेनें मरणोन्मुख झालेला पाहून आवलीनें त्याला विठोबाच्या देवळीं नेऊन देवावर मुलाच्या मरणोन्मुख अवस्थेचें अपयश घातलें. इतक्यांत परमेश्वरकृपेनें मुलगा बरा झाला. हें वर्तमान तुकारामाला कळतांच तो अत्यंत सद्गदित झाला व देवाची स्तुति गाऊं लागला. त्या प्रसंगीं कीर्तनांत तुकाराम देवाला आळवूं लागला व 'माझा अंगीकार करा' असें म्हणूं लागला. इतक्यांत रुक्मिणीनें सूचना केली कीं, 'याला आपण उपदेश केल्यास तुकाराम अमर होईल.' त्या वेळेस 'तुकारामास काळाचा घात न लागेल असा मंत्र देऊं' असें पांडुरंग म्हणाले, व माघ शुद्ध दशमी गुरुवार हा दिन पाहून तुकाराम रात्रीं पांडुरंगमूर्ति ध्यानांत आणून निजला असतां त्याला स्वप्न दिसलें, तेंच महीपति तुकारामाकडून असें वदवितोः—'जागृत अवस्थे येऊन देखा । चित्तीं पस्तावे वैष्णव तुका । म्हणे, 'मज भेटूनि

करुनि साष्टांग नमस्कार। उभा राहिला जोडुनि कर। विनंती करी वारंवार। श्रीविठ्ठलमूर्तिस. ॥ ७४ ॥ 'देवा! तूंचि माझी माता। आणि तूंचि माझा पिता। तूं माझा बंधु चुलता। आप्तसोईरा तूं सर्व. ॥ ७५ ॥ देवा! तूं परम गुरु। करावा माझा अंगिकारू। मज उपदेश करुनि परिकरु। जन्म मरण चुकवावें.' ॥ ७६ ॥ मग बोले रुक्मिणीकांत, । 'माझेंच स्वरुप असे ओतुरांत। तेथें केशवचैतन्य साक्षांत। उपदेश करतिल तुजलागीं. ॥ ७७ ॥ म्या वेदवाणी करून। मर्यादा केली असे जाण। जावें [1]महानुभावासीं शरण। माझें स्वरूप समजावया. ॥ ७८ ॥ म्या रामअवताराचे ठायीं। वसिष्ठ गुरु केला पाहीं। तैसा कृष्णअवताराचे समयीं। [2]संदिपन गुरु केला. ॥ ७९ ॥ माझी वेदआज्ञापालन। मीं याची केली असे जाण। गुरुरूपही मीच होऊन। उद्धार करी जगताचा. ॥ ८० ॥ नामया माझा भक्त पाही। तयासीं मीं सांगितलें लवलाही। [3]विसोबा खेंचरास जाई। शरण गुरुउपदेशा.' ॥ ८१ ॥ ऐसें देवें सांगितल्यावरी। तुकया येता जाला ओतुरीं। बाजारांत जानु तेल्याचे द्वारीं। बखळेमध्यें राहिला. ॥ ८२ ॥ हा वेडा आहे म्हणून। तयासीं कोणी न देती ठिकाण। मुखें करितां नामस्मरण। अन्य भाषण न करितां. ॥ ८३ ॥ रात्रौ तेथें करितां शयन। स्वप्नीं येऊनि एक ब्राह्मण। पावशेर

सद्गुरूसखा। भवसागर देखा उतरीला॥ भोजनासी तूप पावशेर। निजमुखें मागती साचार। घरीं कलह वाढला थोर। यास्तव सत्वर देव गेले॥ केशवचैतन्य राघवचैतन्य। बाबाजी आपुलें सांगितलें नामाभिधान। रामकृष्णहरी मंत्र जाण। मजकारणें सांगितला॥ माघ शुद्ध दशमी साचार। सुदिन पाहोनि गुरुवार। माझा करून अंगीकार। गेले सत्वर सद्गुरू॥' भक्तलीला०-अ०३३,१७१-१७५. या उताऱ्यावरून महीपतीच्या मतें तुकारामास देहू मुक्कामींच पांडुरंगाचा ब्राह्मणाच्या रूपानें स्वप्नांत अनुग्रह झाला, हें ध्यानांत येईल. महिपतीच्या मतें केशवचैतन्य हे मिथ्या असावेसें दिसतें, पण खुद्द केशवचैतन्याचे वंशज हल्लीं ओतुरास हयात असल्यामुळें ही शंका येण्याचें हल्लीं प्रयोजन नाहीं. शिवाय केशवचैतन्याचा ज्या यादवबावास अनुग्रह झालेला पुढें वर्णिलेला आहे त्यांचेही वंशज हयात आहेत, तेव्हां नुसत्या तुकारामा-साठींच हा चैतन्यावतार नव्हता हें उघड होतें. शिवाय मागील ओवी ३७ वरील टीप पहावी म्हणजे महिपतीच्यावरील असंबद्धता उलगडण्यासारखी आहे. भक्तविजय-अ० ५२,२३८-२५३ मध्यें हा गुरूपदेशाचा प्रकार लोहगांवीं महिनाभर कीर्तनें केल्यावर वर्णिला आहे, पण महिपतीच्या ग्रंथांत कालसंगती नीट नसल्यामुळें त्यांत सांगितलेल्या कथेवरून कालनिर्णय ठर-विणें भ्रामक होईल.

१. पोथींत 'महानुभवासी' आहे. २. सांदिपिनी. ३. हा बार्शी येथील साधू, नामदेवाचा गुरू. ४. ओ० ८३ आणि ८४ यांचा पोथींतील क्रम उलट आहे.

तूप भोजनालागुन । मागता जाला तुकयासी. ॥ ८४ ॥ मग उठोनियां प्रात:काळीं । जाऊं लागला समाधीजवळीं । तंव मार्गी भेटले तयेवेळीं । केशवचैतन्य आपण. ॥ ८५ ॥ जात होते मांडवीस्नाना । तेव्हां तुकयानें केलें साष्टांगनमना । आणि करिता जाला प्रार्थना । उपदेश करावा म्हणऊनि. ॥ ८६ ॥ तुकयाचा उत्तम अधिकार । पाहुनि मस्तकीं ठेविला कर । 'राम कृष्ण हरि' हा मंत्र । तयालागीं सांगितला. ॥ ८७ ॥ त्या मंत्राचा अर्थ सांगुन । तुकयासि ठसविलें पूर्ण ज्ञान । जेथें मायेचें नसे आवर्ण[१] । तेंचि स्वरूप दाखविलें. ॥ ८८ ॥ तुकयातें जाला परमानंद । सरला देवभक्ताचा भेद । साध्यसाधनाचा खेद । सेवापरि[२] मावळला. ॥ ८९ ॥ तुकया पुसतां गुरुपरंपरेशीं । गुरुराय सांगति तयासी । 'केशवचैतन्य नाम मजसी । गुरु राघवचैतन्य. ॥ ९० ॥ व्यासप्रसाद तयावरी । व्यासातें नारद उपदेश करी । नारद ब्रह्मयातें वरी । श्रीविष्णु गुरु विधात्याचा.' ॥ ९१ ॥ ऐसी परंपरा सांगितल्यावरी । मागुति तुकया प्रार्थना करी, । 'हे गुरुपरंपरा समजलियावरी । पूर्वाश्रमींचें काय नाम ?' ॥ ९२ ॥ स्वामी म्हणती, 'तुकारामा ! । सांगूं नये पूर्वाश्रमींच्या नामा । तुझ्या पाहुनि अतिप्रेमा । सांगतों तें ऐक पां. ॥ ९३ ॥ काशीक्षेत्रींचा अधिपती । जया विश्वनाथ ऐसें म्हणती । तेंचि नाम होतें मजप्रति । बाबाही म्हणती पूर्वाश्रमीं.' ॥ ९४ ॥ ऐसें तुकयातें सांगुन । स्वामी अदृश्य जाले आपण । तुकया वृत्तीवरी येऊन । विस्मय करिता जाहला. ॥ ९५ ॥ 'गुरूनीं मजवरी कृपा केली । परि सेवा कांहीं नाहीं घडली । स्वप्नीं तुपाची याचना केली । पडला विसर तयाचा.' ॥ ९६ ॥ माघ शुद्ध दशमी गुरुवासर । ते दिनीं तुकयाचा केला अंगिकार । मग विठ्ठलनामीं ठेऊनि आदर । देहूप्रति पातला[३]. ॥ ९७ ॥ मग जे साधुसंत भेटती । तयांसीं मानुनी सद्गुरुमूर्ति । सेवा करितसे अतिप्रीति । पादसेवन करूनि. ॥ ९८ ॥ ऐसें आचार्यसेवन । उपासन[४] घडतसे तुकयालागुन । अंतर्बाह्य शुचिष्मंतपण । शौचें[५] वर्ते जयासी. ॥ ९९ ॥ परमार्थ करावा जन्मवरी । विठ्ठल स्मरावा निजनिर्धारी । हेंचि धैर्य[६] जया अंतरीं । अखंडित वर्ततसे. ॥ १०० ॥ कर्मेंद्रिय आणि ज्ञानेंद्रिय । नामीं रूपीं लावावी सोय । हा जयाचा आत्मविनिग्रह[७] । होऊनियां राहिला. ॥ १०१ ॥ लावण्यलतिका रूप-

---

१. आवरण; पटल; पडदा. २. सर्वतोपरी; अशेष. ३. गाथा—अभंग ४२८८–४२९१ पहा. ४. 'उपासना' असा पाठभेद आहे. ५. 'शौचं च द्विविधं प्रोक्तं बाह्यमाभ्यंतरं तथा । मृज्जलाभ्यां स्मृतं बाह्यं भावशुद्धिस्तथान्तरम् ॥' ६. हेंच स्थैर्य—एकनिष्ठता. ७. इंद्रियसंयम.

वती । परस्त्रीनें प्रार्थितां एकांतीं । तुकयानें त्यागुनि निश्चिती । मातेसमान मानिली.[1] ॥ १०२ ॥ अहंकार[2] ज्याचा जाला गलित । जन्ममरणासी त्रासलें चित्त । म्हणें व्हावें किती फजीत । जन्मालागीं येऊनि. ॥ १०३ ॥ विषयाचे ठायीं नसे प्रीति । विठ्ठलदास्यत्व सर्वदां चित्तीं । स्वजन धन गेलियाची खंती । नाहींच जयालागुनी. ॥ १०४ ॥ इष्टानिष्ट आलिया घडुन । चित्तवृत्ति सुमसमान[3] । नेणें दैवत विठ्ठलाविण । अव्यभिचारिणी भक्ति पैं. ॥ १०५ ॥ इंद्रायणीचे तिरीं जाऊन । नित्य करावें भगवद्भजन । बहु आवडे तया विजन । जनसमुदाय रुचेना. ॥ १०६ ॥ ऐसीं अष्टादश लक्षणें । गीतेमाजीं[4] बोलिले भगवान । ते तुकारामाचे ठायीं संपूर्ण । यथासांग देखिली. ॥ १०७ ॥ हीं लक्षणें व्हावया सुलक्षण । एक श्रीगुरुची कृपा जाण । श्रीकेशवचैतन्य आपण । भेटले तेणें सांग जाहलीं. ॥ १०८ ॥ केशवचैतन्याची समाधी । जालियावरी शतावे[5] अब्दीं[6] । तुकारामातें ज्ञानसमृद्धी । प्रत्यक्ष येऊनि पैं केली. ॥ १०९ ॥ एकादशी प्राप्त होतां । स्वामीचे दर्शनाकरितां । यावें देहूहुनि तत्वतां । भजनगजर करावा. ॥ ११० ॥ रात्रंदिवस करितां भजन । स्वामी संतोषोनियां पूर्ण । समाधींतुनी आपण । डोलत असावें निरंतर. ॥ १११ ॥ ऐसा वृत्तांत जाल्यावरी । तया उत्तम नाम नगरीं । यादव[7]बाबा ब्रह्मचारी । रामदासी पैं होता. ॥ ११२ ॥ तो सदाचारसंपन्न । श्रीरामचरणीं जयाचें मन । परि तत्त्वज्ञान नसे म्हणुन । तळमळ होती अंतरीं. ॥ ११३ ॥ स्वामी तुकयासी प्रत्यक्ष होऊन । बोधिलें शुद्ध तत्त्वज्ञान । उपदेशालागीं देऊन । आनंदरूप पैं केलें. ॥ ११४ ॥ असें आणुन मानसीं । जाऊनि बैसला समाधिपासीं । फळ मूळ न भक्षितां उपवासी । निग्रह करिता जाहला.

१. भक्तलीला०–अ० १३,४०–४६, व अभंग ४३६३–४३६४ पहा. २. दुसऱ्या प्रतींत पुढील ओंवी अधिक आहे–'त्यजिले स्रक्चंदनादि भोग । स्वर्ग मानला जैसा रोग । ऐसें वैराग्याचें भाग्य । ज्याचे ठायीं वर्ततसे ॥' ३. गीता–१२,१३–१४ व अ० १०,४–५ पहा. ४. अध्याय ३६,७–११ मध्यें. ५. मागें ओ० ३७ वरील टीप पहा. 'तिसावें' बद्दल 'शतावें' आणि मागें अ० ४,१२१ मध्यें '१४९३' बद्दल '१३९३' असल्यामुळें हा घोंटाळा होतो. ६. 'आब्दि' असा अन्य पाठ. ७. यादवसाधूंची समाधी जिल्हा बीड, ता० अष्टी, कोयाळगांव येथें आहे. हें नगरापासून दहा कोस आहे. यादवबुवांचे वंशज अद्याप हयात आहेत. त्यांची वंशावळ:–यादवबुवा–दत्तात्रय–रामचंद्र–गोपाळ–नारायण अशी आहे. शेवटले नारायणबुवा

११९ ॥ पुढें कांहीं दिवस जाल्यावरी । फळ मूळ भक्षुनि हटयोग[1] करी । आमीनीं कृपा करूनि बरी । उपदेश मजला करावा.' ॥ ११६ ॥ ऐसें ातुनिया मनीं । बसता जाला अनुष्ठानीं । सर्वांगासी भस्म लावुनी । त्रालागीं टाकिलें. ॥ ११७ ॥ ऐसा एक वर्षपर्यंत । राहाता ाला देउळांत । मग स्वामी येऊनि स्वप्नांत । तयालागीं सांगती. ११८ ॥ 'माझा उपदेश होणार नाहीं । तूं आतां येथुनि जाईं' । रि तो तैसाचि राहिला पाही । न जाईच सर्वथा. ॥ ११९ ॥ द्वितीय दिनीं ुगे आणि मुंगळे । येते जाले तांबडे काळे । तोडिती त्याचे पादमुळें । रक्त ाहूं लागलें. ॥ १२० ॥ तैसेच आवघे पाय फोडून । अस्थिपर्यंत गेले ादून । खाते जाले मांसालागुन । दुःख तेणें जाहालें. ॥ १२१ ॥ परि तेणें ावघेंच केलें सहन । न उठता जाला तेथुन । देऊळामाजीं राहिला पडुन । जायेचि सर्वथा. ॥ १२२ ॥ मग रात्रींचिये अवसरीं । उचलुन टाकिला ादीमाझारीं । सर्वांग भिजल्यावरी । सावध होता जाहला. ॥ १२३ ॥ म्हणे, मी येथें कोठुनि आलों? । नदीमाजी येऊन पडलों । स्वामिसी न आवडता ालों । म्हणोनि टाकिलें मज येथें.' ॥ १२४ ॥ पुनरपि खरडत खरडत । ेऊन बैसला देवालयांत । मोठा आक्रोश करुनि रडत । स्वामीप्रति बोलतसे. । १२५ ॥ 'चैतन्यस्वामी देवाधिदेवा ! । एक वर्ष केली तुमची सेवा । त्याचें ळ माझ्या जिवा । दुःख दिलें हें काय ?' ॥ १२६ ॥ मग चैतन्यमूर्ति गट होऊन । तयालागीं दिधलें दर्शन । म्हणती, 'पाहिलें तुझें मन । धैर्य असे कीं नाहीं हें.' ॥ १२७ ॥ मग तयाचे मस्तकीं ठेवितां कर । वृत्ती होती जाली स्थीर । करूनि उपदेश परिकर । ब्रह्मसाक्षात्कार पैं केला. ॥ १२८ ॥ स्वामी तयासी आशीर्वाद देती, । 'पृथ्वीभरी होईल तुझी कीर्ति' । मग लावितां स्वामी तीर्थाप्रति । शरीर दिव्य जाहालें. ॥ १२९ ॥ करूनि स्वामीसी वंदन । यादोबा आले गृहालागुन । दर्शना येती संपूर्ण जन । अति महिमान वाढलें. ॥ १३० ॥ श्रीराघवचैतन्य केशवचैतन्य । तया स्तवितां ग्रंथेंकरून । तेव्हां ते स्वमीं येऊन । बोलते जाले मजलागीं. ॥ १३१ ॥ 'तुवां हा जो ग्रंथ केला । तो आम्हांसी मान्य जाला । आतां वर देतों या ग्रंथाला । पठणकर्त्यासीं

---

१. 'ह' म्ह० सूर्य व 'ट' म्ह० चंद्र, या दोन नाड्यांतून वाहणाऱ्या वायूंचा म्ह० प्राण व अपान यांचा प्राणायामांत योग करावा लागतो म्हणून 'हटयोग' हें नांव पडलें आहे. 'निरोधः सर्ववृत्तीनां हटयोगः प्रकीर्तितः । हटिनः सिद्धिदाः सर्वा इंद्रियाणां तु देवताः ॥' सोहिरोबानाथ अंबिये, सिद्धांतसंहिता, अ०५,३२ (का० सं० ग्रंथमाला २२).

फळेल तो. ॥ १३२ ॥ माझे समाधीपाशीं बैसुन । जो शतवार करिल ग्रंथपठण । तो होईल द्रव्यसंपन्न । दरिद्र जाईल तयाचें. ॥ १३३ ॥ जो सहस्रवेळ पाठ करील । तयातें पुत्रसंतान होईल,। [1]अयुतसंख्या जो वाचील । रोग जातील तयाचे. ॥ १३४ ॥ जो करिल नित्य पठण । दशसहस्र आवर्तनें करून । त्यासीं रूपवती कांता जाण । प्राप्त होईल निश्चयीं. ॥ १३५ ॥ जें ज्यास संकट पडेल कोणतेंही । त्याचें निवारिन मी आंगें पाही, । जो ग्रंथातें [2]संग्रहाहोनी पाही । पिशाचभय त्या नाहीं. ॥ १३६ ॥ जें जयासी इच्छित काम । जो पाठ करिल नेमें करून । त्याचे पूर्ण होती मनोधर्म । निश्चयीं वाक्य अवधारीं. ॥ १३७ ॥ समाधिपासीं न होतां ग्रंथपठण । त्याणें असावें कोणत्या रीतिकरुन । शुचिष्मंत होऊनियां पूर्ण । आदरें पठण करावें. ॥ १३८ ॥ लक्ष वेळ ग्रंथ वाचितां । चैतन्यप्रसाद होईल निश्चितां, । दश लक्ष वेळ जपतां । राज्यप्राप्ती होय त्यासी. ॥ १३९ ॥ असंख्य करितां ग्रंथपठण । तयांसि होईल तत्त्वज्ञान.' । ऐसा श्रीकेशवचैतन्य । आशीर्वाद देते जाले. ॥ १४० ॥ कृष्णदासबैरागी परमभक्त । तेणें वर्णिला हा वृत्तांत । शके [3]पंधराशें शहाण्णवांत । ग्रंथ पूर्ण पैं जाला. ॥ १४१ ॥ त्या ग्रंथाचेनि आधारें । बोलिलों वेडींवांकुडीं उत्तरें । परिसोत भावीक भोळे । कृपा करूनि मजलागीं. ॥ १४२ ॥ शके सैंत्राशें नव । प्लवंगनाम संवत्सराचें नांव । ते कार्तिक शुद्ध येकादशी पर्व । ते दिनीं ग्रंथ पूर्ण जाला. ॥ १४३ ॥ श्रीरघुनाथगुरुप्रसादेंकरून । गिरिनार पर्वतावरी जाऊन । जालें श्रीदत्तात्रयदर्शनें । तो निरंजन विनवितसे. ॥ १४४ ॥ ऐकोनि ध्यावें श्रोतेजनीं । केशवचैतन्य याचा अभिमानी । जैसें वदविलें तयांनीं । तैसें लिहिता जाहलों. ॥ १४५ ॥ निरंजन रघुनाथ जनस्थानवासी । कथा वर्णिली पुण्यराशी । श्रवणमात्रें गुरुभक्तांसी । आल्हाददायक निश्चयीं. ॥ १४६ ॥ श्रीचैतन्यविजयकल्पतरु । संपूर्ण

---

१. दशसहस्र. २. संग्रह करून. ३. इ० स० १६७४; म्हणजे तुकारामाच्या मृत्यूनंतर पंचवीस वर्षांनीं. ज्या कृष्णदास बैरागीकृत ग्रंथावरून हा ग्रंथ लिहिला आहे त्याचा अगर कृष्णदासाच्या वृत्तांताबद्दलचा शोध अजून लागला नाहीं. इकडे शोधक वाचकांनीं लक्ष्य द्यावें. ४. आपणांस गुरूपदेश शके १७२३ मध्यें झाला व त्यानंतर कवित्वस्फूर्ति झाली असें याच कवीच्या 'आत्मप्रचीति' या ग्रंथात अनेक ठिकाणीं स्पष्टपणें म्हटलें आहे, त्यावरून हा शकांक [illegible]

फळदायनी उदारु । श्रवणपठणें दुःखपरिहरु । होईल श्रोत्यांवक्तयांचा. ॥ १४७ ॥ श्रीराघवचैतन्य केशवचैतन्यार्पणमस्तु ॥

---

१. ज्या प्रतीवरून हा ग्रंथ छापला आहे ती नारो गणेश घाटपांडे यानें शके १८१२ विकृतिनाम संवत्सरे माहे चैत्र कृष्ण अष्टमी मंदवासरे लिहिली; आणि ज्या प्रतीवरून पाठभेद मिळाले ती शके १७६६ क्रोधीनाम संवत्सरीं लिहिली आहे. केशवचैतन्य स्वामीचे औरस वंशज हल्लीं ओतूर, धारवाड व मुंबई येथें आहेत. श्रीच्या नैवेद्य नंदादीपाप्रीत्यर्थ एक चाहूर (चार पायली) जमीन इनाम मिळालेली आहे. व जुन्नर कचेरींतून दरसाल रु० ११ रोख मिळत असतात. सदहू इनाम मुसलमान बादशहापासून मिळालेलें आहे. सनदा वंशजांच्या ताब्यांत आहेत. कांहीं सनदा छत्रपती शाहूच्या वेळच्या आहेत. केशवचैतन्यस्वामीची वंशावळ येणेंप्रमाणें आहे:—



वंशावळी व इनामाबद्दलची माहिती रा० रा० विष्णु आत्माराम राजर्षी व नारायण आत्माराम राजर्षी (केशवचैतन्याचे वंशज) या बंधुद्वयांनीं दिल्याबद्दल त्यांचे उपकार झाले आहेत. शिवाय आमची हस्तलिखित प्रत श्रीपतबुवांनीं लिहिलेल्या प्रतीवरून शुद्ध केलेली आहे, व या कामीं रा० रा० विष्णु आत्माराम राजर्षी यांनीं आम्हांस फार साहाय्य केलें, व आपल्या आजोबाच्या प्रतीवरून आम्हांस पाठभेद कळविले, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. कोणी 'पांडुरंग' कवीनें केशवचैतन्याची आरती केली आहे, ती रा० रा० नारायण आत्माराम राजर्षी यांनीं आमच्याकडे पाठविली आहे, ती येणेंप्रमाणें:-'जयजयाजी महाराज सद्गुरु चैतन्या। विश्वाद्या गुणमान्या अद्वैता धन्या ॥ ध्रु० ॥ पदनतपालनशील अद्भुत तव करणी। जडमूढांप्रति तारिसि लावुनियां चरणीं ॥ भवसागरतरणातें तव नामचि तरणी। निजतेजें शोभसि तूं प्रभु अद्वयतरणी ॥ १ ॥ शांतिक्षमादयेचें केवळ तूं सार। भक्तिस्तव निजलीलें होसी साकार ॥ स्वानंदानें क्रीडसि तारिसि परिवार। द्वंद्वातीत विराजसि प्रभु निरहंकार ॥ २ ॥ सच्चित्सुख तो आत्मा प्रेरक सकलांचा। अचलामल जगसाक्षी रक्षक दासाचा ॥ तारी तारी तारी साधकजन साचा। पांडुरंग तव चरणा नमिं कायावाचा ॥३॥,' तसेंच रा० रा० नरहर लक्ष्मण मोहोळकर वकील, गुलबर्गा, यांनीं आमच्या विनंतीस मान देऊन पुढील हकीगत केसरींत प्रसिद्ध केली याबद्दल आम्ही त्यांचे आभार मानतों. त्यांनीं पाठविलेलें पत्र येणेंप्रमाणें:-'वि. वि. केसरीचे ता. १।१२।०३ चे अंकांत रा. रा.···यांनीं 'साधुश्रेष्ठ तुकाराम यांचे गुरू' या सदराखालीं माहिती विचारिली आहे. मजला जी माहिती आहे, ती खालीं देतों. साधुश्रेष्ठ तुकाराम यांचे गुरू केशवचैतन्य नसून बाबाचैतन्य हे होत; आणि ही गोष्ट 'बाबाजी आपुलें सांगितलें नाम। मंत्र दिला रामकृष्णहरी।' या त्यांच्या स्वतःच्या वचनावरूनच स्पष्ट होतें. मान्यहाळ गांवांत 'बाबाचैतन्य' यांची समाधी आहे. हा गांव गुलबर्गाच्या दक्षिणेस सुमारें १७ मैलांवर भीमातटाकीं आहे. केशवचैतन्य यांची समाधी गुलबर्ग्यांतच आहे, तशीच राघवचैतन्य यांची समाधी कसबे आळंद येथें असून हा गांव येथून वायव्येस सुमारें २० मैलांवर आहे. हे चैतन्यत्रय परस्पर गुरुबंधू असून या तिघांचे गुरू, श्रीवडबाळसिद्ध नागनाथ हे होत. या सिद्धांचें मुख्य स्थान श्रीक्षेत्रवडवाळ हें जी. आय्. पी. रेलवेवर मोहोळ स्टेशनानजीक दक्षिणेकडे सुमारें एक मैलावर आहे. या तिघांच्याही समाध्या हिंदू चालीच्या नसून केवळ मुसलमानी तऱ्हेच्या दरगाह आहेत. मुसलमान लोक बाबा चैतन्य यांस 'शेखसाहेब', केशवचैतन्य यांस 'गेसूद राजबंदेनवाज', आणि राघवचैतन्यास 'लाडलेम शायख' म्हणतात. केशवचैतन्यास सरकारांतन सुमारें एक लक्षाची जहागीर असून राघवचैतन्यास १५ हजारांची आहे; आणि बाबाचैतन्यास म्हणण्यासारखी सरकारांतून कांहीं देणगी नाहीं. कारण ते पुरे निस्पृह होते, म्हणून त्यांनीं तिचा स्वीकार केला नसावा. या तिघांचाही वार्षिक उत्सव (उरूस) मोठ्या समारंभानें होत असतो. या तिघांनाही हिंदुमुसलमान सारखेच पूज्य मानतात. त्यांत केशवचैतन्याचे समाधीस तर मुसलमान लोक प्रतिमक्का म्हणून समजतात व तेथें दूरदूरचे मुसलमान नेहेमीं यात्रेकरितां येतात. कळावें.' वरील पत्रांतील वादग्रस्त भागाबद्दल येथें लिहिणें योग्य नव्हे, पण वकील साहेबांनीं जी माहिती दिली आहे त्यानें ग्रंथांतल्या गोष्टींची सत्यता व्यक्त